हिंदुहृदयसम्राट

## स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर



### यांचे आम्ही प्रकाशित केलेले ग्रंथ

- ★ १८५७ चे स्वातंत्र्यसमर
- ★ सहा सोनेरी पाने
- ★ काळे पाणी
- ★ जोसेफ मॅझिनी
- ★ जातीभेद
- ★ हिंदुराष्ट्रदर्शन
- ★ हिंदुपदपातशाही
- ★ हिंदुत्व
- ★ क्रांतीघोष
- ★ मोपल्यांचे बंड
- ★ अग्निनृत्य

मनोरमा प्रकाशन
१०२/सी, माधववाडी, खोली नं. ११, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग, दादर (मध्य रेल्वे) स्टेशनसमोर, दादर, मुंबई - ४०० ०१४. दूरध्वनी : २४१४८२९९

महाभारतातील गूढ रहस्ये ★ ग.वा. कवीश्वर ★ मनोरमा प्रकाशन

# महाभारतातील गूढ रहस्ये



ग.वा.कवीश्वर

# महाभारताची गूढ रहस्ये


प्रा. ग. वा. कवीश्वर

'गीतातत्त्वदर्शन'

या पुस्तकाचे लेखक


सुधाकर वाढवेकरी तृतीय आवृत्ती

पुणे 2006


मनोरमा

प्रकाशन

प्रकाशक :
अनिल रघुनाथ फडके
मनोरमा प्रकाशन
१०२/सी, माधववाडी, खोली नं. ११,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर ( मध्य रेल्वे ) स्टेशनसमोर,
दादर, मुंबई - ४०० ०१४



सुधारून वाढविलेली तृतीयावृत्ती : जुलै २००६

मुखपृष्ठ : अरविंद पाटील

संगणकीय अक्षरजुळणी :
एस. एस. आचार्य
विलेपार्ले ( पूर्व )

मुद्रक :
सौ. शामला अनंत चिंचणीकर
माधुरी मुद्रण
४४३, शिवाजीनगर,
पुणे - ४११ ००५

मूल्य : २५० रुपये.

# प्रार्थना



वक्रतुण्ड महाकाय सूर्यकोटिसमप्रभ
निर्विघ्नं कुरु मे देव शुभकार्येषु सर्वदा।।

या कुन्देन्दुतुषारहारधवला या शुभ्रवस्त्रावृता
या वीणावरदण्डमण्डितकरा या श्वेतपद्मासना।
या ब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैः सदा वन्दिता
सा मां पातु सरस्वती भगवती निःशेषजाड्यापहा।।

नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम्
देवीं सरस्वतीं व्यासं ततो जयमुदीरयेत्।।

# प्रस्तावना

"महाभारताची गूढ रहस्ये" पुस्तकाची ही तृतीय आवृत्ती प्रकाशित होत आहे. पूर्वीच्या आवृत्तीत यत्रतत्र काही किरकोळ सुधारणांशिवाय,'महाभारताची वयतालिका'हे नवीन प्रकरण जोडले आहे. महाभारताला भारतीय सांस्कृतिक साहित्यात महत्त्वपूर्ण स्थान आहे. आणि त्यातही विशेष असे की, यात अनेक गहन कूट वचने असून, त्यांचा सुसंगत अर्थ लावण्याचे विभिन्न प्रयास महाभारताचे भाषांतरकार, भाष्यकार व अभ्यासक करत आले आहेत.

आता महाभारताची काही गूढ रहस्ये उघड झाली असून, त्यांच्या आधारे त्या कूटवचनांचा प्राप्त झालेला सुसंगत मार्मिक आशय या पुस्तकांत साधार प्रतिपादन केला आहे. द्यूतांत हरलेल्या पांडवांनी वनवास-अज्ञातवासाची तेरा वर्षे त्यांनी केलेल्या गणनेनुसार तंतोतंत पूर्ण केली, पण दुर्योधनाच्या अनुसार पांडवांनी अशा अज्ञातवासात अठरादिवस कमी घालवले. कोणाची गणना कशी होती? त्या अठरा दिवसांमुळे कुरुक्षेत्रावर महायुद्ध झाले व अठरा दिवस (एकेक दिवस सोडून) प्रत्यक्ष लढले गेले. त्यात उभय पक्षांच्या मिळून एकूण अठरा अक्षौहिणी सेना लढल्या व भस्म झाल्या. युद्ध प्रारंभाच्या किंचित पूर्वी मोहग्रस्त अर्जुन व श्रीकृष्ण यांचा झालेला संवाद अठरा अध्यायांच्या गीतेत कथन केला आहे. आणि कौरवपांडवांचा सारा वृत्तांत अथपासून इतिपावेतो महाभारतकार महाकवीने अठरा पर्वात वर्णन केला आहे.

याशिवायही एक विशेष उल्लेख करतो. परमपावन गीता जयंती तिथी (त्या युद्धाची आरंभ तिथी) प्रचलित मार्गशीर्ष शुक्ल एकादशी निराधार असून, ती प्रत्यक्ष श्रीकृष्णवचनानुसार (आणि व्यास व संजय यांच्या समर्थनवचनानुसार व त्या युद्धातील एकूण घटनांच्या तिथ्यांशी सुसंगतीनुसार) कार्तिक अमावस्या सिद्ध झाली आहे.

महाभारतासंबंधी हे विवेचन लक्षपूर्वक अवलोकन करून ज्या विद्वानांनी, संस्थांनी व नियतकालिकांनी मान्यता व्यक्त करून मला प्रोत्साहित केले त्यांचा मी मनःपूर्वक आभारी आहे. ही आवृत्ती प्रकाशित करणाऱ्या मनोरमा प्रकाशनाचेही मी आभार मानतो.

ग.वा. कवीश्वर

आषाढशुक्ल एकादशी शके १९२७

१८-७-२००५



# अनुक्रमणिका

।।श्री।।

# महाभारताची गूढ रहस्ये

## उपोद्घात

महाभारत विश्वसाहित्यात अनेक दृष्टींनी एक अद्वितीय ग्रंथ आहे. महर्षि कृष्णद्वैपायन व्यासांनी हा रचला आहे अशी परंपरागत धारणा आहे. याच्या लेखनासंबंधी एक मनोरंजक कथा त्याच्या प्रारंभी दिली आहे. या महाकाव्याच्या कर्त्याने याचे पूर्ण कथानक मनात तयार करून घेतले, तेव्हा ते काव्यरूपाने लिहून घेण्यासाठी त्याने प्रत्यक्ष गणपतीला विनंती केली. गणपतीने अट घातली की, लेखणी अविरत चालू राहून काव्यरचनेच्या विलंबामुळे लेखनात खंड पडला न पाहिजे. याच्या बदल्यात महाकवीनेही अट घातली की, गणेशाने हे काव्य लिहून घेताना श्लोकांचा वास्तविक सुसंगत आशय ध्यानात घेऊन लेखन करावे. अटीतटीच्या या संदर्भात महाभारतकारांनी आपल्या काव्यरचनेत मधून मधून असे गहन कूटश्लोक केले की, त्यांचा गूढार्थ समजण्यास ज्ञानेश गणपतीलाही काही वेळ विचार करावा लागे; आणि तेवढ्यात महाकवी पुढील श्लोक रचून तयार ठेवत असे! अशा रीतीने श्लोकरचना व लेखन दोघांचाही क्रम अविरत चालून, हे सुमारे एक लक्ष श्लोकांचे विश्वप्रसिद्ध महाकाव्य निर्माण झाले !

या कथेबरोबरच महाभारतात आरंभी या कूटस्थलांच्या संबंधाने पुढील श्लोकही आहेत.*

**ग्रंथग्रंथिं तदा चक्रे मुनिर्गूढं कुतूहलात्**
**यस्मिन् प्रतिज्ञया प्राह मुनिर्द्वैपायनस्त्विदम् ।। आदिपर्व १-८०**
**अष्टौ श्लोकसहस्त्राणि अष्टौ श्लोकशतानि च**
**अहं वेद्‌मि शुको वेत्ति संजयो वेत्ति वा न वा ।। ८१**

"यानंतर मुनिवर्य कृष्णद्वैपायनांनी कुतूहलपूर्वक आपल्या रचनेत कूटश्लोकांच्या गहन गाठी निर्माण करून ठेवल्या, आणि त्यांच्याविषयी प्रतिज्ञापूर्वक म्हटले की, यात आठ हजार आठशे असे गूढ श्लोक आहेत की, त्यांचा खरा आशय (केवळ) मी जाणतो; (माझा पुत्र) शुक जाणतो, आणि संजय अंशतःच जाणत असेल."

या कथनांत सार असो वा नसो, आणि वर्तमान महाभारत त्या कृष्णद्वैपायन व्यासांनी रचले असो वा अन्य कोणी, या महाकाव्यात अनेक कूटस्थळे असून,

* महाभारताच्या श्लोकांचा पाठ व अनुक्रम मी गोरखपुरच्या गीता प्रेसच्या आवृत्तीनुसार दिला आहे. मी पुण्याच्या भांडारकर शोध संस्थेच्या आवृत्तीशीही त्यांची तुलना केली असून, त्यांतील किरकोळ शाब्दिक फरकाने माझ्या प्रतिपादनास बाधा येत नाही. क्वचित स्थळी महत्त्वाचा भेद आढळला त्याचा मी उल्लेख केला आहे.

त्यांचा सुसंगत उलगडा करण्याचे प्रयास विद्वान दीर्घकालापासून करीत आले आहेत. या कूटस्थळांमुळे महाभारतात अनेक ठिकाणी परस्परविसंगतीचे आभास निर्माण होऊन, त्यामुळे कित्येकांना हे महाकाव्य भिन्न कवींच्या रचनांचे एक मिश्रण वाटते. पण आता यातील बहुतेक सर्व कूटांचा सुसंगत उलगडा होत असून, तो पाहता महाभारत कथानकाचे एक विशाल, सूक्ष्म व सुसंगत चित्र आपल्या दृष्टीसमोर उभे राहते.

महाभारतांतील ही कूटे विविध प्रकारची आहेत. काही तत्त्वज्ञानविषयक असून ती मुख्यतः भीष्मपर्वांतर्गत श्रीकृष्णार्जुन गीतासंवादात आढळतात. काही कूटे प्रसंगवर्णनात्मक असून, थोडीशी कूटे स्थलनिर्देशात आहेत. महाभारतकारांनी ज्योतिषाच्या विषयातही कूटे करून ठेवली आहेत. आणि या सर्वांव्यतिरिक्त आहेत गहन कालगणनात्मक कूटें, ज्यांचा संबंध महाभारत कथानकातील कित्येक प्रमुख घटनांच्या तिथ्यांशी व कालानुक्रमाशी आहे.

यांपैकी दार्शनिक कूटांचे विवेचन या पुस्तकात नाही; त्यांची चर्चा मी 'गीतातत्त्वदर्शन'मध्ये केली आहे. प्रस्तुत पुस्तकाच्या प्रथम भागात युद्धपूर्व म्हणजे पांडवांच्या वनवास-अज्ञातवासाशी संबद्ध कालगणनात्मक कूटांची चर्चा आहे. द्यूतप्रसंगी झालेल्या करारानुसार पांडवांनी निर्वासनात तेरा वर्षे पूर्ण केली होती किंवा नाही हा महाभारत कथेचा एक यक्षप्रश्न आहे. पांडवांच्या अनुसार त्यांनी ती पूर्ण केली होती, तर दुर्योधन ते नाकारीत होता. कोणाचे म्हणणें बरोबर होते? या प्रश्नाचे उत्तर द्यूताची म्हणजे पांडवांच्या वनवासारंभाची तिथी आणि त्यांनी अज्ञातवास समाप्त केला ती तिथी यांवर अवलंबून आहे. पण कूटसम्राट कवीने त्या तिथ्या चातुर्याने गूढ ठेवल्या आहेत. आता त्या स्पष्ट झाल्या असून वरील प्रश्नाचे समर्पक उत्तर येथे आढळून येईल.

द्वितीय विभागात युद्धकालीन तिथ्यांची चर्चा असून, त्यांत महाभारतकारांची आणखी अनेक कालगणनात्मक रहस्ये उघड झाली आहेत. या भागाचा आरंभ श्रीकृष्णांनी युद्धप्रारंभापूर्वी अंतिम शांतिप्रयासार्थ उपप्लव्याहून हस्तिनापुरास केलेल्या प्रवासाच्या तिथ्यांपासून झाला असून, एकूण विवेचनांत युद्धारंभ, युद्धकालाचे दिवस, अखेरचे भीम-दुर्योधन गदायुद्ध, बलरामांची तीर्थयात्रा, भीष्मांनी शरशय्येवरून केलेला महान धर्मोपदेश, आणि शेवटी उत्तरायणप्रारंभी भीष्मनिधन, आदि घटनांच्या निश्चित तिथ्या आतां सिद्ध होत आहेत. युद्धारंभतिथी म्हणजेच प्रतिवर्षी श्रद्धेने साजरी केली जाणारी गीताजयंती तिथी हे सांगणे नकोच.

तृतीय विभागांत युद्धकालीन ज्योतिषात्मक कूटांचे विवेचन आहे. कितीतरी विद्वान महाभारतातील ज्योतिषात्मक वचनांना असंबद्ध व असंभव मानतात. या आक्षेपात कितपत तथ्य आहे, हे या तृतीय विभागावरून कळून येईल.

शेवटी चौथ्या विभागांत महाभारतातील काही अन्य गूढ प्रसंगांचे व वचनांचे स्पष्टीकरण आहे. ❒





*पांडवांच्या निर्वासनाची तेरा वर्षे*

*प्रकरण १*

# तेरा वर्षांच्या गणनेसंबंधात भीष्मांचे गूढ वचन

### काही पृष्ठभूमी

इंद्रप्रस्थाचे सम्राट असूनही कौरवांशी द्यूतात हरल्याने पाण्डवांना बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगावा लागला. साध्वी द्रौपदीही त्यांचे बरोबर होती. पाण्डवांनी वनवासाची बारा वर्षे पूर्ण केली व ते विराटनगरीत अज्ञात राहू लागले. द्यूतसमयीच्या अटीनुसार अज्ञातवास समयात एकदेखील पांडव ओळखला गेला असता, तर त्या सर्वांना पुनः बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास करावा लागला असता. अज्ञातवास वर्ष बरेचसे निघून गेले असतानाही पांडवांना शोधून काढण्यास विफल झाल्याने चिंतित होऊन, दुर्योधनाने पाण्डवांना धुंडून काढण्यासाठी आणखी हेर पाठविण्याचे ठरविले. पण तेवढ्यात त्याचा मित्र त्रिगर्तराज सुशर्मा याने एक वेगळी सूचना केली. त्याचे राजा विराटाशी जुने वैर होते; आणि याच दिवसात बातमी पसरली होती की, विराटाचा महाप्रतापी सेनापती कीचक याचा वध झाला आहे. वस्तुतः तो वध अज्ञातवासी भीमाने सैरन्ध्रीरूपी द्रौपदीच्या शीलरक्षणार्थ गुप्तपणे केला होता. पण बातमी अशी प्रसृत झाली होती की, कोणा अज्ञात गंधर्वाने कीचकास ठार मारले. कीचकवधामुळे विराट राजा दुर्बल झाला असला पाहिजे असा विचार करून, कौरवांच्या साह्याने त्याच्यावर आक्रमण करावे व आपल्या पूर्वपराजयाचा बदला घ्यावा अशी सुशर्माची इच्छा होती. त्याप्रमाणे अशी योजना ठरली की, स्वतः सुशर्माने एका निश्चित तिथीला विराटाच्या राज्यावर प्रथम आग्नेय दिशेने हल्ला करावा, व त्याच्या प्रतिकारार्थ विराट राजा तिकडे गेला असता, दुसरेच दिवशी कौरवांनी उत्तरेकडून आक्रमण करून विराटाचे विशाल गोधन हरण करावे.

या योजनेप्रमाणे एका पूर्वनिश्चित दिवशी सुशर्माने विराटावर स्वारी केली. अपेक्षेप्रमाणे राजा विराट ताबडतोब सर्व सैन्यासह तिकडे रवाना झाला. त्याच्याबरोबर (बृहन्नला वेषातील अर्जुन सोडून) अज्ञातवासी असलेले

युधिष्ठिर, भीम, नकुल व सहदेव हेही गेले. मध्यरात्रीपावेतो लढाई चालली. प्रथम सुशर्मा जिंकू लागला, पण नंतर पांडवांच्या शौर्यामुळे सुशर्माचा पराभव झाला. यानंतर ताबडतोब राजधानीस परतण्याऐवजी विराटाने त्या चार (अज्ञानवासी) पांडवांसह शेष रात्रभर रणभूमीवरच विश्राम केला.

**कौरवांचा विराटावर हल्ला**

इकडे त्याच्या दुसरे दिवशी सूर्योदयसमयी कौरवांनी ठरल्याप्रमाणे विराट राज्यावर उत्तर दिशेकडून हल्ला करून गोधन काबीज केले. प्रमुख गोपाल तत्काळ धावत राजधानीत आला. त्यावेळी राजवाड्यात मुख्य पुरुषव्यक्ती केवळ राजपुत्र उत्तर उपस्थित होता. मजजवळ कोणी कुशल सारथी नाही, अन्यथा मी एकट्यानेच कौरवांचा पराभव करून गायी सोडवून आणल्या असत्या अशी बढाई तो मारू लागला. परंतु (पुढे दाखविल्याप्रमाणे) पांडवांच्या गणनेनुसार नेमके याच सूर्योदयावर त्यांचे अज्ञातवास वर्ष संपत होते म्हणून बृहन्नलारूपी अर्जुनाने मी सारथ्य करण्यास तयार आहे असे सुचविले.

तदनुसार राजपुत्र उत्तर व बृहन्नला वेषांत अर्जुन एका रथांत कौरवांच्या प्रतिकारार्थ निघाले. पण प्रत्यक्ष कौरव सेन्य पाहताच उत्तर घाबरला व मागे पळून जाऊ लागला. परंतु अर्जुनाने त्याला रोखून धरले; व मी कौरवांशी लढेन, तू माझे सारथ्य कर असे त्याला म्हटले. शहराच्या बाहेर एका शमी वृक्षावर अज्ञातवास प्रारंभी पांडवांनी आपली शस्त्रे लपवून ठेवली होती. अर्जुनाने उत्तराकडून आपले गांडीव धनुष्य आदि काढवले ✱, आणि याबरोबरच उत्तरास आपला परिचयही दिला; आणि मग अर्जुनाचा रथ कौरवांच्या दिशेने धावू लागला.

**अर्जुनप्रकटीकरण व दुर्योधनाचा कालगणनात्मक आक्षेप**

कोणा एकट्या व्यक्तीला, आणि तेही बृहन्नला वेषांत, आपल्या विरुद्ध लढण्यासाठी येताना पाहून कौरवांना प्रथम हसूच आले. पण लवकरच हा प्रतापी अर्जुनच तर नसेल, अशी शंका त्यांच्या मनाला चाटून गेली. ती व्यक्त झाली तेव्हा दुर्योधन म्हणाला की, पांडवांचे तेरावे अज्ञातवासाचे वर्ष अद्याप समाप्त झाले नसून, त्यापूर्वीच अर्जुन येथे प्रकट होत असेल तर पांडवांना पुनः वनवास व अज्ञातवास भोगावा लागेल.

**तेषाम् न तावन्निर्वृत्तं वर्तते तु त्रयोदशम्**

---

✱ येथे महाभारतकारांनी एक संख्यावाचक कूट केले असून त्याचे विवेचन प्रकरण १९ मध्ये केले आहे.



**अज्ञातवासो वीभत्सुरथास्माभिः समागतः ।। विराटपर्व ४७-४**
**अनिवृत्ते तु निर्वासे यदि वीभत्सुरागतः**
**पुनर्द्वादशवर्षाणि वने वस्यंति पांडवाः।।५**
**लोभाद् वा ते न जानीयुरस्मान् वा मोह आविशत्**
**हीनातिरिक्तमेतेषां भीष्मो वेदितुमर्हति।।६**

"त्यांचे (पांडवांचे) तेरावे वर्ष अद्याप समाप्त झाले नसून चालू आहे; आणि (यावेळी) अज्ञातवासात असावयास हवा असणारा अर्जुन आमच्याशी युद्ध करण्यास आला आहे - ४ जर निर्वासनाचा काळ (ज्याचे शेवटचे वर्ष अज्ञातवासात घालवावयाचे आहे) पूर्ण होण्यापूर्वीच अर्जुन अशा प्रकारे येथे उपस्थित असेल, तर पांडवांनी पुनः बारा वर्षे वनवास करावा - ५. एकतर (राज्याच्या) लोभामुळे ते (पांडव) (वास्तविक कालगणना) जाणत नसावेत, किंवा आमची (गणनेत) काही चूक होत असेल; तरी या बाबतीत जे काही उणे अधिक असेल ते कृपा करून भीष्मांनी सांगावे-६".

**भीष्मांचे उत्तर**

यावर भीष्मांनी दिलेले उत्तर महाभारताचे एक गहन कूट होऊन बसले आहे. भीष्म म्हणाले,

**कलाः काष्ठाश्च युज्यन्ते मुहूर्ताश्च दिनानि च**
**अर्धमासाश्च मासाश्च नक्षत्राणि ग्रहास्तथा।।५२-१**
**ऋतवश्चापि युज्यन्ते तथा संवत्सरा अपि**
**एवं कालविभागेन कालचक्रं प्रवर्तते।।२**
**तेषां कालातिरेकेण ज्योतिषां च व्यतिक्रमात्**
**पञ्चमे पञ्चमे वर्षे द्वौ मासावुपजायतः।।३**
**एषामभ्यधिका मासाः पञ्च च द्वादश क्षपाः**
**त्रयोदशानां वर्षाणामिति मे वर्तते मतिः।।४**
**सर्व यथावच्चरितं यद्यदेभिः प्रतिश्रुतम्**
**एवमेतद् ध्रुवं ज्ञात्वा ततो बीभत्सुरागतः।।५**

"कला व काष्ठा (कलेचा तिसावा भाग),दिवस आणि मुहूर्त (दिवसाचा तिसावा भाग), पक्ष, मास, तसेच नक्षत्रे, ग्रह हे परस्परात मिसळत असतात-१. ऋतु देखील आपसात आणि वर्षे परस्परात मिसळतात. आणि अशाप्रकारे कालाचे विभाजन होत कालचक्र (सतत) चालू असते-२. त्यात कालवृद्धीमुळे व ग्रहांच्या (आपल्या नियमित गतीच्या) उल्लंघनामुळे दर पाचव्या वर्षात दोन महिने अधिक होतात-३. (पांडवांच्या प्रतिज्ञेच्या) या तेरा वर्षांवर (या प्रकारे)

पांच महिने व बारा रात्री (क्षपाः) अधिक होतात असे माझे मत आहे-४. यांनी (पांडवांनी) जी प्रतिज्ञा केली होती तिचे त्यांनी योग्य पालन केले आहे, व ते जाणूनच तदनंतर अर्जुन येथे (प्रकट) आला आहे.-५"

भीष्मांनी दुर्योधनाला हे उत्तर देण्यात अधिक मासांची विशेष चर्चा केली आहे. या उत्तराच्या सूक्ष्म अध्ययनाने महाभारताच्या युद्धपूर्व कालगणनेविषयी अनेक प्रश्नांवर महत्त्वाचा प्रकाश पडेल. यात उल्लेखित अधिक पांच महिने व बारा रात्रींचे वास्तविक गणित काय आहे? अर्जुन अज्ञातवासातून कौरवांसमोर प्रकट झाला त्या दिवशी नक्की कोणत्या महिन्याची कोणती तिथी होती? पांडवांनी प्रतिज्ञेचा समग्र काळ अधिक मासांसह पार पाडला काय? वनवास प्रारंभ तिथि कोणती होती? आणि पांडवांनी तेरावे वर्ष अज्ञातवासात पूर्ण केले नाही या दुर्योधनाच्या आरोपामागे कोणता विशेष मुद्दा होता?

### भारतीय पंचांगात 'अधिक' मास

भीष्मांच्या त्या उत्तराचे विश्लेषण करण्यापूर्वी 'अधिक' मासांविषयी काही स्पष्टीकरण इष्ट होईल. भारतवर्षात बारा महिन्यांच्या एका वर्षात सहा ऋतु मानून एका ऋतुचे दोन महिने मोजले जातात. (चैत्र-वैशाख, वसंत ऋतु; ज्येष्ठ-आषाढ, ग्रीष्म ऋतु; इत्यादि). परंतु भारतीय महिने चान्द्र असून सहा ऋतूंचे एक सौर वर्ष होते. जर बारा चन्द्रमासांबरोबर ठीक एक सौर वर्ष, म्हणजे सहा ऋतूंचे एक चक्र, पूर्ण झाले असते, तर (सौर) ऋतु व (चान्द्र) मास यांचा मेळ सतत जमत गेला असता. पण प्रत्यक्षात एक सौर वर्ष बारा चान्द्र मासांपेक्षा काही अधिक, व म्हणून एक ऋतु दोन चान्द्रमासांहून काही अधिक वेळ चालतो. मासांच्या तुलनेने ऋतूंचा हा अधिक समय क्रमशः वाढता वाढता, काही कालानंतर एक पूर्ण सौर ऋतु दोन चान्द्र महिने पुढे सरकून जातो. उदाहरणार्थ, कोणे एके वर्षी वसंत ऋतु ठीक चैत्रमासाच्या आरंभी सुरू झाला, तर तो वैशाखाच्या अंती समाप्त न होता थोडा ज्येष्ठ मासात प्रवेश करून जाईल; आणि पुढे ग्रीष्म ऋतु आषाढात समाप्त न होता श्रावणात प्रवेश करेल. असे होता होता काही कालानंतर (जो भीष्मांनी आपल्या उत्तरांत गूढ प्रकारे दर्शविला आहे) एक संपूर्ण ऋतु चान्द्रमासांतील आपले नियमित स्थान सोडून दोन महिने पुढे सरकलेला आढळतो; जसे, शरद ऋतु अश्विन-कार्तिकांत न येता मार्गशीर्ष-पौषात आलेला दिसतो. मग त्यावेळी कार्तिकानंतर दोन 'अधिक' मास जोडून त्यात तो शरद ऋतु दाखविला, म्हणजे मार्गशीर्षाचे आरंभी हेमंत ऋतु पुनः बरोबर सुरू होतो. अशा रितीने या 'अधिक' मासांचे प्रयोजन चान्द्र मास आणि सौर ऋतु (व सौर वर्ष) यात क्रमशः पडत जाणारे अंतर दूर करणे हे होय. मात्र भीष्म दोन अधिक मास एकदम जोडण्याचा



उल्लेख करतात, तर हल्ली एक एक अधिक मास मधून मधून जोडला जातो.

### भीष्मांची सूक्ष्म गणना

आता भीष्मांच्या उत्तरांकडे वळू. त्याच्या तिसऱ्या श्लोकात प्रत्येक पाचव्या वर्षांचा दोन अधिक मासांशी संबंध दाखविला असून, या आधारे चवथ्या श्लोकात (पाण्डवांच्या निर्वासनकालाच्या) तेरा वर्षांवर पाच महिने व बारा रात्री इतका 'अधिक' समय मोजला आहे. महाभारताच्या अभ्यासकांसाठी हे एक गणिताचे कूट होऊन बसले आहे! श्री. चिं.वि. वैद्य लिहितात "महाभारतात निरनिराळ्या ठिकाणी जी आकड्यांची संख्या दिलेली आढळते. त्यांत बहुधा काहीतरी गूढ किंवा गुह्य असते.... अधिक मासाचा हिशोब करताना दर पाच वर्षांनी दोन महिने या हिशोबाने तेरा वर्षात पाच पहिले आणि बारा रात्री हा भीष्माच्या वचनातील हिशोब बसत नाही. पांच वर्षांनी दोन महिने तर तेरा वर्षांनी $\frac{१३ \times २}{५} = ५\frac{१}{५}$ असा हिशोब येतो, अर्थात पाच महिने आणि सहा दिवस असे उत्तर येते. पण भीष्म येथे 'त्रयोदशानां वर्षाणां पञ्च च द्वादश क्षपाः' असे म्हणतात हें कसे? बारा रात्री म्हणजे सहा दिवस असा अर्थ करणे शक्य आहे, पण ते काहीतरी आहे." ('महाभारताचा उपसंहार' पृ. १२८)

### कूट सोडविण्याचे विविध प्रयास

महाभारताचे संस्कृत भाष्यकार नीलकंठ येथे 'द्वादश क्षपाः' म्हणजे बारा (अहोरात्रयुक्त) पूर्ण दिवस असा अर्थ करून म्हणतात,"तत्र प्रायेण ज्योतिर्विदः सौर संवत्सरानुरोधेनैव वर्षप्रवेशादिकं कुर्वन्ति। स्मार्ते वर्धापनादौ तु चान्द्रेणेति विशेषे सत्यपि यदा एययोरान्तकालिकः सावनाब्दो गण्यते तदा सौरगता वृद्धिस्तत्र गण्यते। एवं गणनायां क्रियमाणायां त्रयोदशस्वब्देषु पञ्च चान्द्रमासाः द्वे दिने सप्तत्रिंशन्नाडयः पञ्चचत्वारिंशत्पलानि पञ्च दशक्षराणि च। तथा च किंचिदधिकानि नवदिनान्यवधिपूर्तेरधिकानि जातानि ज्योतिषां नक्षत्राणां व्यतिक्रमात् सूर्येण चन्द्रेण च लङ्घनात् उपजायतः अधिकौ भवतः।" नीलकंठांचा आशय असा की, "तेरा सौर वर्षात तेरा 'सावन' वर्षांपेक्षा (जे ३६० दिवसांचे असून चान्द्र व सौर वर्षांच्या मधले असते) पाच चान्द्रमास दोन दिवस व ३७ नाड्या अधिक होतात; आणि त्यांत सूर्यचन्द्रांच्या गतिभेदामुळे नऊ दिवस व 'किंचित अधिक' वृद्धि आणखी मानून, एकंदर 'अधिक' समय पाच महिने बारा दिवस होतो." परंतु हा अधिक समय दोन वेळ कां जोडावयाचा? आणि दुसऱ्यांदा जोडताना कोणत्या प्रमाणाने? उघडच नीलकंठ (पाच

महिन्यांशिवाय) दोन दिवस व ३७ नाड्यांना कसे तरी वाढवून भीष्मप्रतिपादित बारा दिवसांपावेतो आणण्यासाठी एकूण तेरा वर्षांवर नऊ दिवस व 'किंचित अधिक' समय जोडत आहेत. परंतु, भीष्मांनी पाचवे चान्द्र वर्षे व दोन अधिक मास यांचा संबंध दाखवून जें अधिक-मास समयाचें एकूण प्रमाण सांगितले आहे, त्याचा नीलकंठांच्या या भाष्यात कांहीही खुलासा नाही.

एक अन्य संस्कृत भाष्यकार चतुर्भुज मिश्र 'द्वादशक्षपाः'चा अर्थच सहा पूर्ण दिवस असा करून त्यासाठी दोन समर्थने देतात. "द्वादशक्षपाः" हा ('शाकप्रियपार्थिवः शाकपार्थिवः' याप्रमाणे) मध्यमपदलोपी समास मानून त्यात 'अर्ध' शब्द अध्याहृत मानावा, म्हणजे त्याचा अर्थ सहा रात्री (म्हणजे सहा दिवस) असा होईल; किंवा मग 'क्षपा'चाच मुख्य अर्थ रात्र व गौण अर्थ दिवस असा करून, 'द्वादशक्षपाः'चा आशय सहा अहोरात्र (पूर्णदिवस) असा केला जावा. "द्वादशार्धक्षपाः द्वादशक्षपाः। शाकपार्थिवादित्वात् षडहोरात्रा इत्यर्थः। यद्वा क्षपा शब्दो मुख्यगौणवृत्या रात्रौ दिने च वर्तते तेन षड्दिनानि षड्रात्रयश्वेति मिलित्वा द्वादशक्षपाः। न तु द्वादशाहोरात्रा इति।" नीलकंठ 'द्वादशक्षपाः'चा अर्थ बारा अहोरात्रयुक्त दिवस करतात, तर चतुर्भुज मिश्र तो नाकारून सहा अहोरात्री असा करतात. याने भीष्मांनी तिसऱ्या श्लोकात दिलेले प्रमाण जमताना दिसते, पण संख्यावाचक शब्दप्रयोगात असा मध्यमपदलोपी समास मानणे कसे उचित होईल? महाभारतातच पाण्डव वनवासाच्या 'द्वादश वर्षाणि'चा आशय 'द्वादशार्ध वर्षाणि' म्हणजे सहा वर्षे असा करू शकले असते काय?

आता, चतुर्भुज मिश्रांनी दिलेल्या दुसऱ्या वैकल्पिक स्पष्टीकरणानुसार 'द्वादशः क्षपाः' (बारा रात्री)चा अर्थ 'सहा पूर्ण दिवस' करणे ही (चिं.वि.वैद्यांनी उचितच म्हटल्याप्रमाणे) केवळ शाब्दिक ओढाताण आहे. कोणीही एक पूर्ण दिवस दर्शविण्यासाठी 'दोन रात्री' असे म्हणणार नाही. उलट, अमुक स्थानी अथवा अवस्थेत दोन रात्री घालविल्या असे म्हटल्यास दोन दिवस (अहोरात्र) असा आशय होऊ शकेल.* स्वतः भीष्म येथे सहा दिवस असे न म्हणतां 'बारा क्षपा' म्हणत आहेत. आणि पुढे स्पष्ट केल्याप्रमाणे त्या अधिक समयांत वस्तुतः सहा अहोरात्र नसून बारा अहोरात्रच होते.

'विरोधार्थभंजिनी' भाष्यात 'क्षपा'चा अर्थ पूर्ण दिवस (अहोरात्र) असा करून वरील एकूण अधिक मासांचा हिशोब दोन प्रकारे बसविण्याचा प्रयास

* 'रात्रि' शब्दाचा पूर्ण दिवस (अहोरात्र)या आशयाने प्रयोग भीष्मांनीच मरणसमयी 'अष्टपंचाशतं रात्र्यः शयानस्याद्य मे गताः। शरेषु निशिताग्रेषु...' (अनुशासन पर्व १६७-२८) मध्ये केला आहे (पाहा प्रकरण ६ व ८).



केला आहे. (अ) चान्द्रमानानेः - पाच वर्षांना दोन अधिकमास या प्रमाणाने तेरा वर्षांचे पाच महिने सहा दिवस घेऊन, त्या पाच महिन्यांचेही (दर महिन्यास एक दिवस या मानाने) आणखी पाच दिवस जोडण्याने एकूण पाच महिने अकरा दिवस होतात व मग त्यात वर्तमानदिवस जोडून एकंदर पाच महिने बारा दिवस होतील. "तथा च त्रयोदश वर्षैः पंच मासाः षड्दिनानि च भवन्ति। एवमधिकपंचमासैः पंचदिनानि। एवं वृद्धेरेकादशदिनानि। तेन वर्तमानदिनं परिगृहय...." पण अधिक मासांचेही आणखी अधिक दिवस (चक्रवाढव्याजाप्रमाणे) जोडण्याचा प्रघात नाही. या भाष्यात सुचविलेला दुसरा प्रकार असा. (आ) सावनमानानुसारः - सावन वर्षापेक्षा सौर वर्षात सहा दिवस अधिक असतात म्हणून तेरा सौर वर्षे मोजण्यासाठी तेरा सावन वर्षांत ७८ दिवस म्हणजे दोन मास अठरा दिवस अधिक जोडणे आवश्यक आहे. यातून वर्तमानदिवस वगळून दोन मास सतरा दिवस उरतात. आणि ते जमविण्यासाठी हे भाष्यकार 'पंचमे पंचमे वर्षे'चा अर्थ करताना दर पाचवे वर्षी या ऐवजी पाच व पाच मिळून दहाव्या वर्षी अशा आशय घेतात, आणि मूळ पाठ 'मासाः' ऐवजी 'मासौ' ठेवून 'पंच'चा संबंध द्वादश सहित (एकूण सतरा) 'क्षपाः'शी जोडतात. अशा रीतीने एकूण अधिक समय 'पाच महिने बारा रात्री' हाच बदलून 'दोन महिने सतरा रात्री' करू पाहतात. "सावने वर्षे दिनशट्कवृद्धिः। तथा च पंचमे पंचमद्वये द्वौ मासौ भवतः वर्षत्रयेण च अष्टादशदिनानि। तेन वर्तमानदिनं परित्यज्य द्वौ मासौ सप्तदश दिवसा अधिकस्तदाह-एषामिति। मासौ अत्र स्तः इति मासा मासद्वययुतः पंच च द्वादश क्षपाः." पण अशा रीतीने 'मासाः' ऐवजी 'मासौ'रूप ठेवावयाचे म्हटले, तर कोणत्याही श्लोकाचा वाटेल तसा अर्थ लावता येईल.

'विषमपादविवरण' नामक संस्कृत भाष्यात 'पंचमे पंचमे वर्षे' या शब्दांना 'पंचमे वर्षे पंचमे मासे' असे मानून म्हटले आहे की, येथे 'मासे'चा लोप काव्यरचनेच्या दृष्टीने झालेला समजावा; या भाष्यात अधिकमास गणनेचे भीष्मांनी दिलेले प्रमाणच बदलण्याचा प्रयास आहे. शेवटी, 'लक्षाभरण' भाष्यांत 'क्षपाः'चा अर्थ अर्धदिवस करून 'द्वादश क्षपाः' म्हणजे सहा पूर्ण दिवस असा आशय घेतला आहे. "क्षपापदेन त्रिंशत् घटिकात्मकम् अर्धदिनम् उच्यते। संपूर्णाः षड्दिवसा इति यावत्". भीष्माच्या गूढ उत्तरातील त्या लहानशा गणिताचा अर्थ लावण्याचे किती विविध प्रयत्न केले गेले आहेत हे यावरून दिसून येईल.

आधुनिक लेखकात चिं. वि. वैद्य यांचे मत वर दिले आहे; ते भीष्मांच्या

या उत्तराला 'गूढ' मानतात. के. ल. दप्तरी यांनी तर असेही म्हटले आहे की, येथे भीष्मांची (म्हणजेच महाभारतकारांची) गणितात काही चूकही संभव असून, ती 'क्षपा'चा अर्थ अर्धदिन करून सुधारता येईल ✱ !

**कूटाचा उलगडा: अठ्ठावनांवर दोन, साठांवर नव्हे !**

आता या कूटाचे पुढील समाधान पाहा. "पंचमे पंचमे वर्षे" या शब्दप्रयोगात सप्तमी विभक्ति असून, त्याचा वास्तविक अर्थ 'प्रत्येक पाचव्या वर्षात' असा आहे; 'प्रत्येक पाचव्या वर्षानंतर' असा नाही. येथे 'पंचमात् पंचमात् वर्षात्' अशा प्रकारे पंचमी विभक्ति असती तर तसा अर्थ झाला असता. अन्यत्र तसा आशय व्यक्त करताना महाकवीने पंचमीचा प्रयोग केला आहे. हस्तिनापुरच्या शांतिवार्तेहून परत जाते वेळी कर्णाला युद्धारंभ तिथि घोषित करताना श्रीकृष्ण म्हणाले -

**सप्तमाच्चापि दिवसादमावास्या भविष्यति**
**संग्रामो युज्यतां तस्याम्....।। उद्योग पर्व, १४२।१८**

"(आजपासून) सातव्या दिवसानंतर (अर्थात आठवे दिवशी) अमावास्या होणार असून... त्या तिथीला युद्ध सुरू करा." येथे पंचमी विभक्ती असून, पुढे स्पष्ट केल्याप्रमाणे 'सातव्या दिवशी' असा आशय नसून 'सातव्या दिवसानंतर' असा आहे. या उलट अभिमन्यु त्याच्या विवाहापासून सातव्या महिन्यात (सातव्या महिन्यानंतर नव्हे) मेला हे सांगताना विधवा उत्तरेच्या विलापात 'सप्तमे मासि' असा सप्तमी विभक्तीचा महाकवीने प्रयोग केला आहे. (स्त्री पर्व २०-२८ पुढे उद्धृत).

म्हणून भीष्मांच्या वचनानुसार दोन अधिकमास पांचवे वर्ष समाप्त झाल्यानंतर नव्हे, तर 'पाचव्या वर्षात' येत असत. दर पाचव्या वर्षात दहा महिने गेल्यानंतर, म्हणजे एकूण अठ्ठावन मासांनंतर दोन अधिकमास येत असत. अशी गणना केल्यास, भीष्मांनी तेरा वर्षांवर मोजलेला अधिक मास समय बरोबर जमतो. याउलट, वरील लेखक साठ चान्द्रमासांवर दोन अधिकमास लावत राहिले. ठीक गणित असे होईल. तेरा सौर वर्षे = १५६ चान्द्र मास; आणि दर अठ्ठावन मासांवर दोन अधिकमास या प्रमाणाने एकूण 'अधिक' समय होतो $\frac{१५६\times२}{५८} = ५\frac{११}{२९}$ अधिक मास.

आता, एक महिन्याचे तीस (किंवा काटेकोरपणे $२९\frac{१}{४}$ अथवा $२९\frac{१}{२}$ देखील) दिवस घेतले, तर $\frac{११}{२९}$ महिन्याचे अकरा पूर्ण दिवस व काही घटिका होतील; म्हणजे बारावा दिवस प्रारंभ झालेला असेल. पण भारतीय सांस्कृतिक परंपरेनुसार, एखाद्या दिवशी सूर्योदयी जी तिथी व व्रताची अवस्था असेल ती त्या संपूर्ण दिवसभर (रात्रीसमाप्तीपावेतो) मानली जाते; जसे सूर्योदयी एकादशी असेल जर त्या संपूर्ण दिवशी एकादशी मानून उपवास करतात, भलेही या दरम्यान वस्तुतः एकादशीची तिथी संपून द्वादशी सुरू होत असो. सारांश, अशा व्रतादींच्या बाबतीत दिवसाच्या अंशाला पूर्ण दिवस मानले जाते. म्हणून, एकूण 'अधिक' समय समाप्त होते वेळी बारावा दिवस प्रारंभ होऊन जात असल्याने, भीष्मांनी तो पूर्ण दिवस (रात्रिसमाप्तीपावेतो) त्याच (अज्ञातवासाच्या) स्थितीत मानला. आणि 'क्षपा' म्हणजे 'रात्र' शब्दाचा मार्मिक उपयोग करून तेरा वर्षांचा 'अधिक' समय पांच महिने बारा 'रात्रि' (बारा संपूर्ण अहोरात्रयुक्त दिवस) असा बरोबर मोजला !

**अधिकमासांची आवर्तने**

जर प्रत्येक पांच वर्षानंतर (साठ महिन्यानंतर) ते दोन अधिक मास जोडले गेले असते, तर एकाच विशिष्ट महिन्यानंतर (अथवा पूर्वी) ते प्रत्येक वेळी जोडले गेले असते. आणि तसे असते तर भारतीय ज्योतिष ग्रंथात त्या विशिष्ट महिन्याचे नांव ही निर्दिष्ट झाले असते. याउलट ५८ महिन्यांनंतर दोन अधिकमास जोडण्याने त्यांचे स्थान प्रत्येक पाळीस दोन महिने मागे जाते. कोणी विचारील की, अधिकमासद्वय पाचव्या वर्षात यावयाचे होते तर ते अठ्ठावनाव्या महिन्यानंतरच काय म्हणून? त्या वर्षातील आणखी एखाद्या महिन्यानंतर कां मानू नये? याचे उत्तर असे की, ५८ ही संख्या घेतल्याने भीष्मांनी दिलेला हिशोब बरोबर जमतो; आणि शिवाय या संख्येचा संबन्ध चांद्र व सौर वर्षातील अंतराविषयी त्या समयीच्या गणनेशी तर अर्थातच आहे.

✱ "This third verse is followed by the verse एषामभ्यधिका... This is said to be inconsistent with the third verse for, at the rate given in the third verse, there ought to be five intercallary months and six **tithis** more in thirteen years... it would at the most prove that some mistake was made in calculation and nothing more. However this inconsistency disappears if by **kshapa** (क्षपा) we understand half a day..." ("The Astronomical Method and its Application to the Chronology of Ancient India." p.14 footnote).

येथे एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. ५८ सामान्य चान्द्रमासांनंतर दोन अधिकमास आले, तरी कोणत्याही पाच वर्षात त्याशिवाय साठ सामान्य मास आले पाहिजेत. अशा प्रकारे संपूर्ण पाच वर्षात एकूण महिने (६०+२ =) ६२ होतील, केवळ (५८ +२ =) ६० नव्हे. मात्र प्रत्येक वेळी अधिकमासांचे स्थान दोन महिने मागे जात राहील. पुढील उदाहरणावरून हे स्पष्ट होईल.

आपण ज्याच्या ठीक चैत्रारंभी वसत ऋतु प्रारंभ झाला आहे असे एक वर्ष घेऊन त्याला वर्ष क्रमांक १ म्हणू. आता आपण अठ्ठावन महिने मोजू – वर्ष क्र. १,२,३,४ चे (दर वर्षी बारा प्रमाणे) ४८ व क्र. ५ मधील चैत्र व पौष हे दहा मास. त्या पौषानंतर दोन अधिक मास येतील. परंतु वर्ष ५ ची समाप्ती माघ व फाल्गुन गेल्यानंतरच होईल.

या अधिकमासद्वयानंतर पुनः आणखी ५८ मास जातील - वर्ष क्र. ५ चे माघ व फाल्गुन, क्र. ६,७,८,९ चे ४८, आणि वर्ष क्रमांक दहाचे चैत्र ते कार्तिक आठ मास. त्यानंतर पुनः दोन अधिक मास येतील. हा क्रम असा दाखविता येईल -

| वर्ष क्रमांक | | महिने | |
|---|---|---|---|
| १,२,३,४ | (प्रत्येकी चैत्र ते फाल्गुन) | = ४८ | ५८ |
| ५ | चैत्र ते पौष | = १० | |
| | (नंतर दोन अधिक मास) | = | +२ |
| | माघ फाल्गुन | = २ | |
| ६,७,८,९ | (प्रत्येकी चैत्र ते फाल्गुन) | = ४८ | ५८ |
| १० | चैत्र ते कार्तिक | = ८ | |
| | (नंतर दोन अधिक मास) | = | + २ |
| | मार्गशीर्ष ते फाल्गुन | = ४ | |
| ११,१२,१३,१४ | (प्रत्येकी चैत्र ते फाल्गुन) | = ४८ | ५८ |
| १५ | चैत्र ते भाद्रपद | = ६ | |
| | (नंतर दोन अधिक मास) | = | +२ |
| | अश्विन ते फाल्गुन | = ६ | |

यावरून दिसून येईल की, वर्ष क्र. १ ते ५ चे एकूण महिने ४८+१०+(२) +२ = ६२ आहेत; आणि तसेच वर्ष क्र. ६ ते १० मध्येही एकूण महिने ६२ आहेत. हे उदाहरण आणखी वाढविले म्हणजे एक वेळ अशी येईल की, दोन अधिकमासद्वयांत नेहमीचेच ५८ महिन्यांचे अंतर असले, तरी त्यांच्या वर्षक्रमांकांत पाच ऐवजी चाराचेच अंतर राहील.



| | | | |
|---|---|---|---|
| १५ | अश्विन ते फाल्गुन | = ६ | |
| १६,१७,१८,१९ | (प्रत्येकी चैत्र ते फाल्गुन) | = ४८ | ५८ |
| २० | चैत्र ते आषाढ | = ४ | |
| | (नंतर दोन अधिक मास) | = | +२ |
| | श्रावण ते फाल्गुन | = ८ | |
| २१,२२,२३,२४ | (प्रत्येकी चैत्र ते फाल्गुन) | = ४८ | ५८ |
| २५ | चैत्र ते वैशाख | = २ | |
| | (नंतर दोन अधिक मास) | = | +२ |
| | ज्येष्ठ ते फाल्गुन | = १० | |
| २६,२७,२८,२९ | (प्रत्येकी चैत्र ते फाल्गुन) | = ४८ | ५८ |
| | (नंतर दोन अधिक मास) | = | +२ |
| ३०,३१,३२,३३ | (प्रत्येकी चैत्र ते फाल्गुन) | = ४८ | ५८ |
| ३४ | चैत्र ते पौष | = १० | |
| | (नंतर दोन अधिक मास) | = | +२ |
| | माघ व फाल्गुन | = २ | |

यात वर्ष क्र. २९ च्या फाल्गुनानंतरचे अधिक मासद्वय त्याच वर्षाचे मानले, तर त्याच्यापूर्वीचे द्वय वर्ष क्र. २५ मध्ये आले असल्याने, दोघांच्या वर्ष क्रमांकांत चारचेच अंतर दिसून येईल. आणि ते फाल्गुनोत्तर अधिकमासद्वय वर्ष ३० मध्ये मानले तर त्याच्या नंतरचे द्वय वर्ष क्र. ३४ मध्ये असल्याने, वर्ष क्रमांकातील अंतर चारच होईल. मात्र अशा दोन द्वयांतीलही अंतर नेहमीप्रमाणे ५८ महिन्यांचेच असेल. सारांश, अशा प्रसंगी प्रथम अधिकमासद्वयापासून वर्षे मोजली तर दुसरे द्वय 'पाचव्या वर्षात' आलेले दिसेल. पण साधारणपणे (संवतगणनेनुसार) मोजतो त्याप्रमाणे एखाद्या विशिष्ट आरंभ बिंदू पासून वर्षगणना करीत गेल्यास ते दुसरे अधिकमासद्वय क्रमांकाने चवथ्या वर्षी आलेले असेल. आपल्या पुढील विवेचनात ही बाब महत्त्वाची आहे.

**दोन अधिकमास एकत्र**

अधिकमासांचे नियमित चान्द्रमासांशी प्रमाण काहीही असो, पण दोन अधिक मास एकदम जोडले जात होते काय? हल्लीप्रमाणे त्या काळींही कमी कालावधीनंतर एक अधिकमास जोडण्याची प्रथा नसेल काय? पण महाभारतकार केवळ 'दर पांच वर्षात' असे म्हणत नसून, 'पंचमे पंचमे वर्षे' म्हणजे प्रत्येक 'पाचव्या' वर्षी दोन अधिकमास जोडण्याचे स्पष्ट म्हणत आहेत. 'पंचमे' शब्दात वर्षाचा अनुक्रमांक निश्चित होतो; आणि हे दर्शवितें की, दोन्ही

अधिकमास त्या पाचव्या वर्षात एकत्र जोडले जात असत. याशिवाय प्राचीन काळी पांच वर्षांचा एक संच मानून त्यांना संवत्सर, परिवत्सर, इदावत्सर, अनुवत्सर व इद्वत्सर अशी नांवेही होती.

अशा प्रकारच्या अधिकमास गणनेचा काही अन्यही प्राचीन उल्लेख आढळतो काय? महाभारतात पुढे जाऊन बलरामांच्या तीर्थयात्रेच्या वर्णनात वृद्धगर्ग नामक महान ज्योतिषाचार्यांचा उल्लेख आला आहे.

**गर्गस्त्रोतो महातीर्थमाजगामैककुण्डली**
**तत्र गर्गेण वृद्धेन तपसा भावितात्मना।।शल्य पर्व, ३७-१४,**
**कालज्ञानगतिश्चैव ज्योतिषां च व्यतिक्रमः**
**उत्पाता दारुणाश्चैव शुभाश्च जनमेजय।।१५**
**सरस्वत्याः शुभे तीर्थे विदिता वै महात्मना**
**तस्य नाम्ना च तत् तीर्थं गर्गस्त्रोत इति स्मृतम्।।१६**

"राजा (जनमजेया), तत्पश्चात एककुण्डलधारी बलराम गर्गस्त्रोत नामक महातीर्थास आले. तेथे सरस्वतीच्या किनाऱ्यावर त्या पवित्र स्थानी शुद्ध अंतःकरणाच्या महात्मा वृद्धगर्गांनी तपश्चर्येद्वारे कालाचे स्वरूप व त्याची गती, आकाशस्थ ग्रहनक्षत्रांकडून (आपल्या नियमित गतीचे मधून मधून) उल्लंघन, भीषण अपशकुन व शुभलक्षणे आदीचे ज्ञान प्राप्त केले. त्यांच्या नावाने या तीर्थाला गर्गस्त्रोत म्हणतात." यातील 'कालज्ञानगति' व 'ज्योतिषां च व्यक्तिक्रमः' या शब्दांचे भीष्माच्या त्या उत्तराशी स्पष्ट साम्य आहे. या वृद्धगर्गाचार्यांचा ग्रंथ त्या काळी मानला जात असावा. महाभारतात जे अनेक स्थळी दारुण उत्पातांचे व शुभ शकुनांचे वर्णन आहे, तेही त्या ग्रंथावर आधारित असावे. वराहमिहिरांनीही आपल्या 'बृहत्संहितेत' सप्तर्षीच्या गतीच्या विवेचनात वृद्धगर्गांना उद्धृत केले आहे. शं.बा. दीक्षित म्हणतात की, एका वेळी दोन अधिकमास जोडण्याची पद्धती 'वेदांग ज्योतिषाची' आहे. ('भारतीय ज्योतिषशास्त्र', पृ. १०९). तसेच पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन तिला वेदविहित पंचांग पद्धती म्हणतात. ('ज्योतिष शिक्षक' पृ. ३४६). शिवाय पाहा, डॉ. गोरखप्रसाद कृत 'भारतीय ज्योतिष का इतिहास (द्वितीय संस्करण)' पृ. ६७-६८. ☐



## *प्रकरण २*

# अज्ञातवाससमाप्तीचा दिवस

येथपावेतो भीष्मांच्या त्या उत्तराचा एक अंश स्पष्ट झाला. आता त्यातील शेष कूटाचा उलगडा करण्यापूर्वी, ज्या दिवशी अर्जुन अज्ञातवासातून प्रकट होऊन भीष्म दुर्योधनाला ते उत्तर देत होते तो दिवस निश्चित करणे आवश्यक आहे.

**तिथी, पक्ष, ऋतु**

स्वतः दुर्योधनाने त्या दिवसाची तिथी अष्टमी व संभाषणाची वेळ सूर्योदयाची म्हटली आहे.

**तेषां भयाभिभूतानां तदस्माभिः प्रतिश्रुतम्**
**प्रथमं तैर्ग्रहीतव्यं मत्स्यानां गोधनं महत्**
**सप्तम्यामपराण्हे वै तथा तैस्तु समाहितम् ।। विराटपर्व ४७-१०**
**अष्टम्यां पुनरस्माभिरादित्यस्योदयं प्रति**
**इमा गावो ग्रहीतव्या गते मत्स्ये गवां पदम्।।११**

"विराटामुळे भयभीत झालेल्या त्यांना (सुशर्मादि त्रिगर्तांना) आम्ही आश्वासन दिले होते की, प्रथम त्यांनी (आग्नेय दिशेने) सप्तमीच्या अपराण्ह समयी मत्स्यवासीयांचे विशाल गोधन हरण करावे; व तसे त्यांनी केलेही - १०; आणि मग जेव्हा मत्स्यराज विराट त्या गायींच्या मागे (त्यांना सोडविण्यासाठी) गेलेला असेल, तेव्हा अष्टमीला सूर्योदयी आम्ही (इकडून आक्रमण करून) या गायींना पकडून न्यावे - ११".

याच दोन्ही तिथ्यांचा वेगळाही उल्लेख वैशंपायांनी केला असून शिवाय वद्य पक्षही सांगितला आहे.

**ते स्म गत्वा यथोदिष्टां दिशं वन्हेर्महीपते**
**संबद्धाः रथिनः सर्वे सपदाता बलोत्कटाः।।३०-२५**
प्रति वैरं चिकीर्षन्तो गोषु गृद्धा महाबलाः
आदातु गा सुशर्माथ कृष्णपक्षस्य सप्तमीम्।।२६
अपरे दिवसे सर्वे राजन् सम्भूय कौरवाः
अष्टम्यां ते न्यगृण्हन्त गोकुलानि सहस्त्रशः।।२७

"राजा (जनमजेया), कवचादींनी सुसज्ज, बलवान, महाशक्तिसंपन्न व (विराटाशी) पूर्ववैराचा बदला घेण्यास उत्सुक होऊन (त्याच्या) गाई हरण करण्यास उद्युक्त असे ते सर्व (त्रिगर्तदेशीय) रथी व पायदळ सैनिक, सुशर्माच्या नेतृत्वाखाली गायी पकडून नेण्यासाठी, पूर्वनियोजित आग्नेय दिशेकडे वद्यपक्षाच्या सप्तमीला निघून गेले असता (२५,२६), दुसरे दिवशी अष्टमीला सर्व कौरवानी मिळून (विराटाच्या राज्यावर उलट दिशेने हल्ला करून) हजारों गायींच्या झुंडी पकडल्या-२७". अशा प्रकारे अर्जुनप्रकटीकरणाच्या त्या दिवशी कृष्ण (वद्य) पक्षाची अष्टमी होती.

त्यावेळी ग्रीष्म ऋतू चालू होता हेही महाभारतकारांनी सांगितले आहे. अर्जुन प्रकट झालेला पाहून कौरवपक्षात कालगणनेसंबंधी विवाद सुरू झाल्यावर कर्ण दुर्योधनास म्हणाला,

**अदेशिका महारण्ये ग्रीष्मे शत्रुवशं गताः**
**यथा न विभ्रमेत् सेन तथा नीतिर्विधीयताम्।।४७-२३**

"यावेळी आपण विदेशात घोर जंगलात आहोत, आणि ग्रीष्म ऋतू चालू असून शत्रूच्या समीप आहोत; यासाठी (सारे विवाद बाजूस ठेवून) आपल्या सेनेत भ्रम आणि भीति पसरणार नाही अशा धोरणाने कार्य करावे."

**पण महिना कोणता?**

तिथी, पक्ष, ऋतू, वेळ हे सारे सांगितले. पण महाकवीने महिना सांगितला नाही ! त्यात त्यांनी एक रहस्य ठेवले असून, त्याच्या वास्तविक खुलाशावर वनवास आरंभ तिथी कोणती होती, पांडवांनी तेरा वर्षे बरोबर पूर्ण केली होती किंवा नाही, आदि प्रश्नांचे सुसंगत समाधान अवलंबून आहे.

या महिन्यासंबंधी काही प्रमुख मते अशी आहेत.

नीलकंठ तो वैशाख समजतात. चतुर्भुजमिश्र व विरोधार्थभंजिनी भाष्याचे अनुसार तो ज्येष्ठ होता. अर्जुनमिश्रांच्या मते तो आषाढ होता. चिं.वि. वैद्य त्याला ज्येष्ठ मानतात; मात्र त्याबरोबरच असेही लिहितात की, त्या महिन्याचा स्पष्ट उल्लेख मूळ महाभारतात असावा, पण काळाच्या ओघात तो श्लोक पोथीलेखनात गळून गेला असेल. (पूर्व उल्लेखित, पृ. ११०-१११). या संदर्भात आपल्यास तो महिना निश्चित करावयाचा आहे. पण तत्पूर्वी महाकवीने ठेवलेल्या एका संकेतावर लक्ष देणे आवश्यक आहे.

**एक सूक्ष्म नाजुक संकेत**

कौरवांचा पराजय करून विराटनगरास परत जाताना अर्जुनाने राजकुमार उत्तरास म्हटले की, जरी तुला आता आम्हा पांडवांचा परिचय झाला आहे.



तरी आजच तू तुझ्या पित्यास हे सांगू नको (६७-९,१०). उत्तराने तदनुसार राजाला त्याच दिवशी पांडवांची ओळख दिली नाही. त्याच्या तिसरे दिवशी स्वतः सर्व पांडव द्रौपदीसहित विराटाच्या राजदरबारात आपल्या वास्तविक रूपात प्रकट झाले.

**ततस्तृतीये दिवसे भ्रातरः पञ्च पाण्डवाः**
**स्नाताः शुक्लांबरधरा समये चरितव्रताः।।७०-१.**
**विराटस्य सभां गत्वा भूमिपालासनेष्वथ**
**निषेदुः पावकप्रख्याः सर्वे धिष्ण्येष्विवाश्रयः।।३**

"तदनंतर तिसरे दिवशी वनवास अज्ञातवासाचे व्रत ठरलेल्या वेळेपावेतो बरोबर पालन केलेले ते पाच पांडव बंधू सुस्नात होऊन व श्वेत वस्त्रे परिधान करून राजा विराटाच्या दरबारात उपस्थित होऊन राजोचित उच्चासनांवर विराजमान झाले; त्यावेळी ते एकमेकांजवळ स्थित प्रज्वलित (पाच) अग्निज्योतीप्रमाणे तेजस्वी भासत होते."

मूळ शत्रू कौरवांनी वद्य अष्टमीला अर्जुनास ओळखल्यानंतर, विराट राजाने पांडवांस ओळखणे दोन दिवस लांबविण्यात काय विशेष मतलब होता? एक भाष्यकार म्हणतात की, पांडवांच्या गणनेनुसार तेरावे वर्ष वस्तुतः वद्य दशमीला समाप्त होत असावे. पण असे असते तर त्यापूर्वी अष्टमीला अर्जुन कौरवांसमोर प्रकट झाल्याने दुर्योधनाचा आक्षेप खरा ठरत नाही काय? या विलंबाचे मार्मिक कारण हे दिसते की, त्या अष्टमीला द्रौपदी रजस्वला एकवस्त्रा असून राजसभेत येऊन बसू शकत नव्हती. आणि जिने सतत तेरा वर्षे घोर वनवास व अज्ञातवासात त्यांची पूर्ण निष्ठेने सोबत केली, तिला सोडून पांडव राजदरबारात प्रकट कसे बसले असते? बरोबर तेरा वर्षांपूर्वी द्रौपदीला रजस्वला स्थितीत दुःशासनाने कौरवदरबारात खेचून आणले होते; पण ती परिस्थिती अगदी वेगळी होती. ही तेरा वर्षे आरंभ झाली तेव्हा ती रजस्वला होती, आणि ती वर्षे समाप्त झाली तेव्हाही ती रजस्वला होती !

कारण काहीही असो. हे ध्यानात घेणे महत्त्वाचे आहे की, पांडव एकत्रपणे राजा विराटासमोर कृष्ण दशमीला (अथवा चतुर्भुज मिश्र सुचवितात त्याप्रमाणे एकादशीला) प्रकट झाले. त्यानंतर विराटकन्या उत्तरेचा अर्जुनपुत्र अभिमन्यूशी विवाह निश्चित झाला; व पांडव विराटनगरातून विराटराज्यातील उपप्लव्य गावास निघून गेले. लग्नाचे आमंत्रण घेऊन दूत द्वारकेस गेले. आणि श्रीकृष्ण, स्वतः अभिमन्यु, त्याची माता सुभद्रा व अन्य स्वजन, उपप्लव्यास आले (विराटपर्व अध्याय ७२). नंतर मोठ्या समारंभाने व राजेशाही थाटाने

विवाह साजरा झाला (७२-२७). हे सर्व होण्यास काही दिवस अवश्य लागले असतील; आणि त्या विवाहाची तिथी उपरोक्त वद्य अष्टमी व दशमीच्या नंतर येणाऱ्या शुक्ल पक्षात मानणे उचित होईल.

तिकडे कुरुक्षेत्रावरील युद्धात अभिमन्यूचा मृत्यू झाल्यावर विधवा उत्तरा आपल्या करुण विलापात म्हणते -

**एतावानिह संवासो विहितस्ते मया सह**
**षण्मासान् सप्तमे मासि त्वं वीर निधनं गतः ।। स्त्रीपर्व, २०-२८**

"वीरपुरूषा, या लोकी तुमचा मजबरोबर संबंध इतकाच म्हणजे सहा महिने (दैवाने) ठरला होता; आणि (आपल्या विवाहापासून) सातव्या महिन्यांत तुम्हाला मृत्यु आला". यात महाकवीने वरील (अर्जुन प्रकटीकरणाच्या) वद्य अष्टमीचा महिना निश्चित करण्यासाठी एक महत्त्वाचा संकेत दिला आहे. अभिमन्यूचा विवाह व मृत्यु यांत सहा पूर्ण महिने गेले होते.

**त्या महिन्याचे चार विकल्प**

त्या महिन्याचे विवेचन पौर्णिमान्त व अमावास्यान्त या उभय दृष्टींनी होऊ शकेल. भारतवर्षात कोठे एक तर कोठे दुसरी पद्धति प्रचलित आहे. पौर्णिमान्त मास वद्य प्रतिपदेस प्रारंभ होऊन पौर्णिमेला संपतो; अमावास्यान्त मास शुक्ल प्रतिपदेस प्रारंभ होऊन अमावास्येला संपतो. दोन्ही पद्धति शुक्ल पक्षात एकरूप होतात; पण वद्य पक्षात त्यामध्ये एक महिन्यांचे अंतर दिसते. जसे, दोन्ही पद्धतींचा चैत्र शुक्ल पक्ष तोच असेल; पण त्यानंतर अमावास्यान्त पद्धतीने चैत्र वद्य पक्ष येईल तर पौर्णिमान्त महिन्याचा वैशाख वद्य येईल. मात्र त्यानंतर पुनः दोघांचाही वैशाख शुक्ल पक्ष येईल.

पुढे स्पष्ट केल्याप्रमाणे महाभारताचे महिने मूलतः अमावास्यान्त आहेत. पण तरीही येथे विचाराधीन अष्टमी वद्य पक्षातील असल्याने तिच्या महिन्याचा विचार आपण दोन्ही पद्धतींनी करून पाहू.

तो ऋतू ग्रीष्म होता हे वर सांगितलेच आहे. ग्रीष्म ऋतूचा संबंध ज्येष्ठ व आषाढ महिन्यांशी असतो. परंतु नीलकंठांनी वैशाखाचाही उल्लेख केला असल्याने त्यालाही विचारात घेऊ. अशाप्रकारे त्या महिन्याचे पुढील चार विकल्प संभवतात.

| अमावास्यान्त | | पौर्णिमान्त |
|---|---|---|
| १. (चैत्र वद्य अष्टमी) | = | वैशाख वद्य अष्टमी |
| २. वैशाख वद्य अष्टमी | = | ज्येष्ठ वद्य अष्टमी |
| ३. ज्येष्ठ वद्य अष्टमी | = | आषाढ वद्य अष्टमी |
| ४. आषाढ वद्य अष्टमी | = | (श्रावण वद्य अष्टमी) |



यातील पहिल्या विकल्पात ग्रीष्म ऋतू संभव नसल्याने तो सरळ निरस्त होतो. दुसऱ्या विकल्पावर नंतर विचार करू. तृतीय विकल्प घेतला, तर अभिमन्यूचा विवाह व मृत्यू या दरम्यान सहा महिने पूर्ण होत नाहीत. विवाह उपरोक्त वद्य दशमीच्या काही दिवसांनंतर झाला होता; आणि त्याचा मृत्यू, पुढे दाखविल्याप्रमाणे, अमावास्यान्त मार्गशीर्षाच्या (पौर्णिमान्त पौषाच्या) वद्य नवमीस झाला. याशिवाय तेथे मी अन्य मतांचाही उल्लेख केला असून, त्यांच्या अनुसार अभिमन्यूवधाची तिथी मी दिलेल्या तिथीच्याही अगोदर येऊन, त्याचा विवाह व मृत्यु यांतील कालांतर आणखीच कमी होते. यामुळे तृतीय विकल्प अस्वीकार्य ठरतो. आणि मग चौथा विकल्प अधिकच अस्वीकार्य आहे; कारण त्याने विवाहतिथी आणखी पुढे सरकून तिकडे अभिमन्युवधापावेतो कालांतर अधिक कमी होईल.

आता उरला दुसरा विकल्प. यात पाण्डवांचे प्रकटीकरण मानून त्यानंतर येणाऱ्या ज्येष्ठ शुक्ल पक्षात अभिमन्यूचा विवाह मानला, तर विवाहाच्या तयारीस उचित वेळ मिळून, तिकडे विवाहापासून अभिमन्यूवधापावेतो सहा महिने समाप्त होतात. पण याशिवायही या विकल्पास अनुकूल असा आणखी एक विशेष मुद्दा येथे स्पष्ट करणे इष्ट आहे; तो आपल्या यासंबंधात अंतिम निष्कर्षाला साह्यभूत होईल. अमावास्यान्त वैशाखाचा वद्य पक्ष ग्रीष्म ऋतूत मोजला जाऊ शकतो काय?

**महाभारताची ऋतुगणना**

भारतवर्षात फार पूर्वीपासून पौर्णिमान्त मासपद्धती प्रचलित आहे. वस्तुतः पूर्णिमा (पूर्णमासी) शब्दाचा मूळ आशय मास पूर्ण होतो ती तिथी असा आहे (शं.बा. दीक्षित, पूर्व उल्लेखित पृ. २८). या पूर्णिमान्त मासपद्धतीस अनुसरून एका वर्षातील सहा ऋतूंपैकी एक-एक ऋतू (मागील प्रकरणात म्हटल्याप्रमाणे) क्रमाने दोन महिन्यात वाटला गेला. कालांतराने देशाच्या काही भागात अमावास्यान्त मास प्रचलित झाले. पण त्यामुळे मासांतील पक्षांचा अनुक्रम बदलू शकला, तरी प्राकृतिक ऋतूंच्या नैसर्गिक समयात तदनुसार परिवर्तन होणे अर्थातच संभव नव्हते. सूक्ष्म विवचनात ऋतूंचा आरंभ व अंत सर्वांनी एकाच ठराविक वेळी मानणे इष्ट आहे.पूर्णिमान्त मासपद्धतीनुसार वसंत ऋतु चैत्र मासाच्या वद्य पक्षाच्या आरंभी सुरू होतो. अमावास्यान्त पद्धतीने त्यावेळी फाल्गुन वद्य पक्षाचा आरंभ असतो. त्यामुळे अमावास्यान्त मासपद्धती स्वीकारल्यावर सूक्ष्मदृष्टीने वसंत ऋतू फाल्गुन वद्य पक्षापासून आरंभ होऊन, (वैशाखाच्या अंताऐवजी) वैशाख पौर्णिमेवर समाप्त मानला पाहिजे. आणि याच क्रमाने शेष

ऋतूंचा समय मानला पाहिजे.

महाभारताची सूक्ष्मता अशी की, पुढे दाखविल्याप्रमाणे त्यातील महिने अमावास्यान्त असूनही, ऋतुगणना निसर्गक्रमानुसार आहे. किंबहुना यामुळेच महाभारताचे महिने मूलतः अमावास्यान्त की पौर्णिमान्त असा कधीकधी भ्रम होतो. याची काही उदाहरणे पाहा. वनवासकाळात पांडव द्वैतवनात गेले त्यावेळचे वर्णन करताना महाकवी म्हणतात-

**विमलाकाशनक्षत्रा शरत् तेषां शिवाभवत्**
**मृगद्विजसमाकीर्णा पांडवानां महात्मनाम् ।। वनपर्व १८२-११**
**तेषां पुण्यतमा रात्रिः पर्वसंधौ स्म शारदी**
**तत्रैव वसतामासीत् कार्तिकी जनमजेय।।१६**

"महात्मा पांडवांनी (तेथे) शरद ऋतू सकुशल घालविला; त्यावेळी (मेघरहित) स्वच्छ आकाश नक्षत्रांनी भरलेले दिसत असे, व वन्य पशुपक्षी सानंद विहार करीत असत-११. राजा जनमजेया, ते (पांडव) तेथे या प्रकारे राहात होते तेव्हा (शरद व हेमंत) ऋतूंच्या संधिकाळी येणारी कार्तिक महिन्यातील शारदी पौर्णिमेची परमपावन रात्र प्राप्त झाली-१६." यात कार्तिक पौर्णिमेवर शरद ऋतूची समाप्ती दाखविल्याने तो पूर्णिमान्त महिना असावा असा भास होतो. पण त्याला अमावास्यान्त मानूनही शरद ऋतूचा अंत कार्तिक पौर्णिमेवर दाखविणे सयुक्तिक आहे हे वर सांगितले आहे. याचप्रमाणे, शांतिवार्तेसाठी श्रीकृष्ण उपप्लव्याहून हस्तिनापूरी जाण्यास निघाले त्याचा समय सांगताना म्हटले आहे, "कौमुदे मासि रेवत्यां शरदन्ते हिमागमे" (उद्योगपर्व ८३-७) "त्यावेळी कार्तिक (कौमुद) मासात चन्द्र रेवती नक्षत्रात असतांना व शरद ऋतू समाप्त होण्याच्या बेतात असून हेमंताचा आरंभ होणार असतांना". कार्तिक महिन्यात चन्द्र रेवती नक्षत्रात पौर्णिमेच्या एक दोन दिवस पूर्वी असू शकतो (पाहा प्रकरण ५). म्हणजे त्यावेळी कार्तिक शुक्ल पक्ष समाप्त होत होता, आणि अमावास्यान्त कार्तिकाचा वद्य पक्ष अद्याप शेष होता. तरीही त्यावेळी शरद ऋतूच्या अंताचा (व हेमंताच्या आगमनाचा) उल्लेख असल्याने येथे पूर्णिमान्त कार्तिकाचा भास होतो. पण तो अमावास्यान्त मानूनही ऋतूंचे हे वर्णन होऊ शकते हे आता स्पष्ट होईल.

याप्रमाणे, महाभारतकारांची ऋतूसंबंधी सूक्ष्म विचारशैली पाहता, अमावास्यान्त ज्येष्ठ शुक्ल पक्षाला लागून पूर्वी येणारा वद्य पक्ष (जरी त्या पद्धतीत तो वैशाखाचा म्हटला जातो तरी) ग्रीष्म ऋतूंत गणला जाऊ शकतो.



**आणखी एक विकल्प - अधिक मास!**

पण उपरोक्त द्वितीय विकल्पाला अनुकूल हे सारे मुद्दे असतानाही, तो बाजूस सारून आपल्यास शेवटी त्याऐवजी असा एक अगदी वेगळा विकल्प प्रतिपादन करणे आवश्यक आहे, जो या सर्व संकेतांची नीट सुसंगती लावेल इतकेच नव्हे, तर अन्यही संबंधित प्रश्नांचा समाधानकारक उलगडा करेल. भीष्मांनी आपल्या उत्तरात अधिक मासांच्या सूक्ष्म गणनेला प्रमुख स्थान दिले आहे. त्या उत्तराचा सारा रोख तेरा वर्षांच्या कालावधीवर किती अधिक मास समय धरावयाचा यावर दिसून येतो. येथे रहस्य हे आहे की, त्या तेरा वर्षातले शेवटचे अधिकमासद्वय त्या दिवशी प्रत्यक्ष चालू होते ! साधारणतः ज्येष्ठाच्या पूर्वी वैशाख येतो; पण या विशिष्ट वर्षी ज्येष्ठ मासाच्यापूर्वी ते दोन अधिकमास आले होते. हे ध्यानात घेतले म्हणजे त्या दिवसाविषयी महाभारतात दिलेले सारे संकेत कसे सुसंगत होतात, आणि एकूण तेरा वर्षाच्या कौरव-पांडवांनी केलेल्या भिन्न गणना व वनवासआरंभाची तिथीही कशी स्पष्ट होते हे दिसून येईल.

पण तत्पूर्वी आणखी एक बाब स्पष्ट करतो. दर पाचव्या वर्षात दोन अधिक मास हे भीष्मांनी दिलेले प्रमाण पाहता, तेराव्या वर्षाच्या शेवटी अधिकमास द्वय कसे येऊ शकले? तें द्वितीय द्वय असणे अर्थातच शक्य नाही. तें तिसरे द्वय असेल काय? वनवास प्रारंभाच्या काहीसे पूर्वी अधिक मास येऊन गेले असतील तर वनवासाच्या चतुर्थ वर्षात वनवासकालीन प्रथम द्वय येऊन, वनवासाच्या नवव्या वर्षात दुसरे अधिकमास द्वय येईल. आणि मग तेराव्या (अज्ञातवासी) वर्षाच्या समाप्तीसमयी तिसरे द्वय येऊ शकेल. याचा पूर्ण तपशील पुढे दिला आहे. अशा दोन द्वयांत नेहमीप्रमाणे ५८ महिन्यांचे अंतर असूनही त्यांच्या संवत वर्षक्रमांकात कधीकधी केवळ चारचेच अंतर असू शकते हे मी मुद्दाम वर दाखविले आहे. ही विशिष्ट परिस्थिती दृष्टीसमोर ठेवून महाकवीने ही रहस्यमय कालगणना केली आहे.

**त्या वद्य अष्टमीचा निश्चित महिना**

आता, अर्जुनप्रकटीकरणाच्या त्या दिवशी जर (तिसरे) अधिकमास द्वय चालू होते, तर त्या द्वयाचा कोणता महिना चालू होता? तो प्रथम अधिक मास नव्हता. अन्यथा, त्यानंतर आणखी एक अधिकमास गेल्यावर नियमित ज्येष्ठ आला असता. पण मग, त्या प्रथम अधिकमासाचा वद्य पक्ष ग्रीष्म ऋतूत येऊ शकत नाही. ग्रीष्माचा प्रारंभ अमावास्यान्त ज्येष्ठाला लागून पूर्वी येणाऱ्या एका (वद्य) पक्षपावेतोच मानला जाऊ शकतो; आणखी मागे नव्हे. म्हणून त्या

अधिकमास द्वयातील दुसऱ्या महिन्याचाच वद्य पक्ष ग्रीष्म ऋतूत मोजला जाऊ शकतो. शिवाय, जर ती वद्य अष्टमी प्रथम अधिकमासाची असती, तर तोपावेतो त्या तेरा वर्षात (प्रथम व द्वितीय द्वयांचे मिळून) चारच अधिकमास पूर्ण होऊन वर काही दिवस झाले असते. पण भीष्म पांच पूर्ण अधिक मास मोजत आहेत. अर्थात त्या अष्टमीचा अधिक मास तृतीय द्वयाचा दुसरा महिना होता.

याप्रमाणे अर्जुनप्रकटीकरणाची ती वद्य अष्टमी त्या वर्षीच्या जेष्ठपूर्व (अथवा वैशाखोत्तर) द्वितीय अधिकमासाची होती. वर दाखविल्याप्रमाणे तो वद्य पक्ष ग्रीष्म ऋतूत मोजला जाऊ शकतो. आणि या गणनेने अभिमन्यूच्या विवाहाच्या तयारीसाठीही, आणि नंतर प्रत्यक्ष विवाहसमारंभासाठी, पुरेसा वेळ मिळून, विवाहापासून त्याचा मृत्यु बरोबर सातव्या महिन्यात येतो.

हा ज्येष्ठपूर्व द्वितीय अधिकमास अमावास्यान्त आहे हे पुनः स्पष्ट करणे आवश्यक आहे. अन्यथा, त्याचा कोणताही भाग ग्रीष्म ऋतूत येणार नाही. पूर्णिमान्त मासपद्धतीने ग्रीष्म ऋतूचा प्रारंभ ठीक ज्येष्ठाच्या आरंभापासूनच होतो; तत्पूर्वी नव्हे. आणि त्याला पूर्णिमान्त मास मानण्याविरुद्ध अन्यही काही आपत्तीचा उल्लेख पुढे केला आहे.

**एक पाठभेद**

श्लोक ३०-२६ मध्ये "कृष्णपक्षस्य सप्तमीम्" याऐवजी भांडारकर संस्थेने 'धर्मपक्षस्य सप्तमीम्' असा पाठ स्वीकारला आहे. धर्म म्हणजे गर्मीचा (ग्रीष्म) ऋतू. परंतु "ग्रीष्मे शत्रुवशं गताः" (४७-२३) असा स्पष्ट उल्लेख असतां, 'धर्मपक्षस्य' असे आणखी म्हणण्यात काय स्वारस्य होते? शिवाय तो शब्द घेतला तरी फरक इतकाच पडेल की, त्यात ग्रीष्म ऋतूच्या वद्य पक्षांबरोबर शुक्ल पक्षही येतील. यातील वद्य पक्षांचा विचार आपण केलाच आहे. शुक्ल पक्ष होतील- ज्येष्ठ शुक्ल व आषाढ शुक्ल. पैकी आषाढ शुक्ल पक्ष घेतला, तर अभिमन्यूचा विवाह व मृत्यु यात सहा महिने पूर्ण होणार नाही. पण तो पक्ष शुक्ल नव्हता याचे एक प्रमाणही आहे. सप्तमीला सुशर्माने विराटाच्या राज्यावर हल्ला केला, तेव्हा सूर्य पश्चिमेकडे कलण्याच्या सुमारास विराटाची सेना सुशर्मासमोर पोचली (३२-१); व भीषण लढाई सुरू झाली. हळूहळू सूर्यास्त झाला (३२-७); व अंधार होऊन लढाई स्थगित करावी लागली.

**तमसाभिप्लुते लोके रजसा चैव भारत**
**अतिष्ठन् वै मुहूर्तं तु व्यूढानीकाः प्रहारिणः।। विराटपर्व, ३३-१**

"राजा (जनमजेया), (सूर्यास्त झाल्यावर) सर्वत्र अंधार झाला व धूळही



पसरली, म्हणून व्यूहबद्ध योद्धे काही वेळ (लढणे बंद करून) तसेच उभे राहिले."

**ततोऽन्धकारं प्रणुदन्नुदतिष्ठत चंद्रमाः**
**कुवार्णो विमला रात्रिं नन्दयन् क्षत्रियान् युधि।।२**
**ततः प्रकाशमासाद्य पुनर्युद्धमवर्तत..।।३**

"काही वेळानंतर अंधःकाराचा नाश करीत चंद्राचा उदय झाला; त्यामुळे (अंधकारमय) रात्रीसमय स्वच्छ होऊन रणक्षेत्रावरील योद्धे आनंदित झाले - २ - त्यानंतर सर्वत्र उजेड होऊन लढाई पुनः चालू झाली." हे वर्णन वद्य पक्ष दर्शविते. शुक्ल सप्तमीला सूर्यास्तसमयीच चंद्र आकाशात स्पष्ट वर दिसतो. याउलट वद्य पक्षाच्या सप्तमीला सूर्यास्तसमयी (चंद्रहीन) अंधार होतो व काही वेळानंतर चंद्रोदय होतो. तो ग्रीष्म ऋतू असल्याने सायंकाळी सूर्यास्त बऱ्याच उशीरा होऊन नंतर काही वेळाने चंद्रोदय झाला. या शिवाय असे की, तो पक्ष शुक्ल असू शकतो काय याचा विचार पुढे अज्ञातवास वर्षाचा जो तपशील दिला आहे त्याच्या संदर्भातही करावा लागेल.

याप्रमाणे 'धर्मपक्षस्य' म्हटले तरी ज्येष्ठपूर्व द्वितीय अधिक मासाचा वद्य पक्षच सिद्ध होतो. वस्तुतः (ऋतूचा निर्देश करून त्या बरोबर केवल तिथीचा उल्लेख करणारा) हा पाठ कमी संभव असून, 'कृष्णपक्षस्य' हाच पाठ मार्मिक व सुसंगत आहे, आणि त्यांत ऋतूची द्विरुक्तीही टाळली जाते.

शेवटी, महाभारतात त्या दिवसाचा अन्य तपशील दिला असताही, महिन्याचा मात्र उल्लेख का नाही हेही आता स्पष्ट येईल. त्या महिन्याला नेहमीचे नियमित नांव नव्हते. ❒

*प्रकरण ३*

# वनवास आरंभाची तिथी

**पांडवांनी तेरा 'सौर' वर्षे पूर्ण केली काय?**

अज्ञातवास समाप्तीची गूढ तिथी आपण आता निश्चित केली आहे. पण त्या दिवशी समाप्त होणारी तेरा वर्षे केवळ १५६ चान्द्रमास मिळून होती, किंवा त्यात अधिकमास समयही जोडला गेला होता, हा प्रश्न अद्याप शेष आहे.

पांडवांनी अधिकमासांसहित तेरा सौर वर्षे पूर्ण केली, किंवा केवळ तेरा चान्द्र वर्षे पूर्ण केली (व त्यांनी अधिकमासदेखील पूर्ण करावयास हवे होते या दुर्योधनाच्या आक्षेपास जागा राहिली), याविषयी परस्परविरुद्ध मते व्यक्त केली गेली आहेत.

भाष्यकार नीलकंठांच्या मते पांडवांनी अधिकमास वगळून केवळ तेरा चांद्र वर्षे पूर्ण केली. नीलकंठ द्यूत (वनवास प्रारंभ) आश्विन शुक्ल दशमीला (विजयादशमीला) मानतात (कारण त्यावेळेस फाशांचा खेळ खेळण्याची प्रथा आहे); व म्हणतात की, म्हणून दुर्योधनाच्या अनुसार अज्ञातवास विजयादशमीच्याच तिथीला संपावयास हवा होता (म्हणजे अधिकमासांसहित, तेरा सौर वर्षे पूर्ण झाली असती), परंतु पांडवांनी केवळ तेरा चांद्र वर्षे पूर्ण करून (अर्थात अधिक मास वगळून) प्रतिज्ञा पालन करावयाचे ठरविले. नीलकंठ पुढे म्हणतात की, पांडव याप्रमाणे विजयादशमीच्या पाच मास बारा रात्री पूर्वी चैत्र शुक्ल चतुर्दशीला प्रकट होऊ शकले असते, पण तरीही आणकी काही (चोवीस) दिवस अज्ञातवासात घालवून त्यांनी वैशाखाच्या वद्य सप्तमीला अज्ञातवास समाप्त केला व अष्टमीला ते प्रकट झाले, (अर्जुन प्रकट झाला) ✱

---

✱ "विजयादशम्यां द्यूते पाण्डवपराजयः। लोके तस्यैव प्रायेण द्यूतकालत्वात्। ग्रीष्मे च गोग्रहार्थ प्रवृत्ता इत्युक्तें तेन विजयादशम्यामागामिन्यां त्रयोदशाब्दपूरणं भविष्यतीति दुर्योधनप्रत्याशा। पाण्डवास्तु चान्द्राब्दमानेन त्रयोदशवत्सरानतिवाह्य कृतकृत्या अभूवन्। तत्र विजयादशमीतः पूर्वं पञ्चमासाः द्वादशदिनानि प्रकटीभवितव्यत् तत्र दर्शान्तमासे वैशाख कृष्ण सप्तम्यामाविर्भूताः प्रतिज्ञां निस्तीर्येव कानिचिदधिकान्यपि दिनानि अतिवाह्य आविर्भूता इत्यर्थः।"



पण भारतीय पंचांगात तेव्हाही अधिकमास जोडले जात असत, आणि स्वतः पांडवांनी तदनुसार जीवनभर यज्ञयागव्रतवैकल्ये केली असतील; असे असता प्रतिज्ञा समयातून अधिकमास वगळ्याचा पांडवांना काय अधिकार होता? आणि भीष्मही त्याला मान्यता कशी देते? आणि ते वगळावयाचेच होते तर त्यातले चोवीस दिवस तरी घोर अज्ञातवासात का घालविले? याच शेवटच्या दिवसात तर कीचक सैरंध्रीरूप द्रौपदीला त्रस्त करीत होता. खरी गोष्ट अशी की, नीलकंठांनी मूळ वनवासप्रारंभ तिथी चूक गृहीत धरल्याने पांडवांनी अधिकमास वगळण्याची ही धारणा व्यक्त केली आहे; जी केवळ चूकच नसून पांडवांच्या धर्मनिष्टतेला गालबोट लावणारी आहे.

अन्य संस्कृत भाष्यकार अर्जुनमिश्र देखील म्हणतात की, पांडवांनी अधिकमास वगळून तेरा वर्षे पूर्ण केली. 'विषमपादविवरण' व 'लक्षाभरण' भाष्यांचाही अभिप्राय असाच आहे.

पण पांडवांनी अधिकमासांसहित तेरा सौर वर्षे पूर्ण केली होती असेही मत काही जणांनी व्यक्त केले आहे. 'विरोधार्थभंजिनी' भाष्याचे अनुसार वनवास प्रारंभ ज्येष्ठ वद्य दशमीला झाला होता; आणि जरी अर्जुन ज्येष्ठ वद्य अष्टमीला (गोग्रहण युद्धात) प्रकट झाला. तरी सर्व पांडव एकत्रपणे विराटदरबारी वद्य दशमीला प्रकट होऊन तोपावेतो तेरा सौर वर्षे (अर्थात अधिकमास समाविष्ट करून) पूर्ण झाली होती. यात पांडवांनी अधिकमास पूर्ण केल्याचे म्हटले असले, तरी जर तेरा सौर वर्षे दशमीला पूर्ण होत होती तर तत्पूर्वी अष्टमीला कौरवांसमोर अर्जुन प्रकट झाल्याने दुर्योधनाचा आक्षेप योग्य ठरत नाही काय? शिवाय, ज्येष्ठ वद्य पक्षात पांडव प्रकटीकरण मानल्याने अभिमन्यूच्या विवाहापासून त्याचा मृत्यू सातव्या महिन्यात येत नाही हे वर पाहिलेच आहे.

अलीकडील लेखकांत चिं. वि. वैद्य नीलकंठांचे अनुकरण करून म्हणतात की, पाण्डवांनी अधिकमास वगळून तेरा वर्षे पूर्ण केली; पण उटगीकर संपादित विराट पर्वांत पाण्डवांनी अधिकमासांसहित तेरा वर्षे पूर्ण केल्याची अधिक संभावना व्यक्त केली आहे. गोरखपूरच्या गीता प्रेस द्वारा प्रकाशित हिंदी भाषांतरात या स्थळी म्हटले आहे,"चान्द्र वर्ष तीन सौ चौवन दिनो का होता है और सौर वर्ष तीन सौ पैसठ दिन पंद्रह घड़ी और कुछ पल का हुआ करता है। इस हिसाब से तेरह सौर वर्षों में चान्द्र वर्ष के लगभग पांच महिने अधिक हो जाते है। इन वर्षों में यदि छः बार अधिक मास पड़ जाय तो जिस

तिथी को पाण्डवों का वनवास हुआ था, तेरहवे वर्ष की उसी तिथी तक पांच महिने और बारह दिन अधिक हो सकते है। पाण्डवों ने सूर्य की संक्रान्ति के अनुसार वर्ष की गणना की थी, अतः उन्होंने अधिकमास आदि के कारण बढ़े हुये महिनों और दिनों की संख्या को अलग नही माना। इसी लिए उनकी गणना में तेरह ही वर्ष हुए। भीष्मजी ने चान्द्र वर्ष की गणना का आशय लेकर बढ़े हुए महिनों और दिनों को भी गणना में ले लिया। अतः उनके हिसाब से उस दिन तक तेरह वर्ष पूर्ण होकर पांच मास बारह दिन अधिक हुए। यह कालभेद सौर और चान्द्र वर्ष की गणना के भेद से ही हुआ है। वास्तव में सूर्य की संक्रान्ति के हिसाब से उस समय तक पाण्डवों के तेरह वर्ष छः दिन अधिक हो चुके थे। चान्द्र वर्ष की गणना के अनुसार वही समय तेरह वर्ष पांच मास बारह दिन का हो गया।"

या अनुसार पाण्डवांनी ( व भीष्मांनी) तेरा वर्षांनी येणाऱ्या वनवासारंभ तिथीपावेतो तेरा (सौर) वर्षे मोजली होती. पण पुढे स्पष्ट केल्याप्रमाणे, त्यांची तशी गणना नसून, वनवासारंभ तिथीपावेतो तेरावे वर्ष मोजण्याचा दुर्योधनाचा आग्रह होता. आणि जर पांडव वनवासारंभ तिथीपावेतो गणना करून तेरा सौर वर्षे (किंबहुना त्याहूनही सहा दिवस अधिक) पूर्ण करते, तर त्यांच्यावर आरोप करण्यास दुर्योधनाला नाममात्र ही काय बहाणा उरता, ज्याच्या आधारे तो कुरुक्षेत्र युद्धात आपल्या पक्षांत अनेक राजांच्या सह एक विशाल सेना उभी करू शकला? याशिवाय तेरा सौर वर्षे पूर्ण करून वनवासारंभ तिथी पावेतो अज्ञातवास केल्यानंतर पांडव त्या अत्यन्त हीन अवस्थेत आणखी सहा दिवस कशाला घालविते? परंतु वास्तविक तथ्य हे आहे की, पांडवांनी आणखी सहा दिवस घालविले हा भ्रम महाकवीने अधिकमासांचे प्रमाण देताना (५८ व ६० विषयक) केलेल्या कूटरचनेमुळे निर्माण झाला आहे हे आपण पाहिलेच आहे.

**पांडवांनी अधिकमास समय सूक्ष्म गणनेनुसार बरोबर पाळला**

वस्तुतः पांडवांनी तेरा वर्षात अधिकमास समय बरोबर पालन केला होता. गोष्ट अशी होती की, त्या तेरा वर्षात संयोगवश आलेले तीन अधिकमास द्वय पूर्ण करण्याची जबाबदारी ज्याला ५८ x ३ = १७४ मास (साडे चौदा वर्षे) घालवायची असतील त्यावरच येणे न्यायपूर्ण होईल. म्हणून पांडवांचे म्हणणे होते की, जरी या तेरा वर्षात तीन अधिकमासद्वय आले आहेत, तरी त्यांचा प्रतिज्ञासमय तेरा वर्षेच असल्याने, शेवटच्या द्वयाचे (जे त्या दिवशी चालूच



होते) पूर्ण दोन महिने तेरा वर्षात मोजण्यास ते बाध्य नव्हते. वर पाहिल्याप्रमाणे, तेरा वर्षावर अधिकमास समय पांच महिने बारा दिवस होतो. म्हणून वनवास प्रारंभापासून त्यांनी १६१ महिने १२ दिवस पूर्ण केले; आणि त्याने तेरा सौर वर्षे पूर्ण झाली, एक दिवसही कमी अगर अधिक नाही.

याउलट दुर्योधनाचा आग्रह होता की, या तेरा वर्षात आलेले शेवटचे तिसरे (चालू असलेले) अधिकमास द्वयही पूर्ण करून वनवासप्रारंभाची मूळ तिथी येईपावेतो पांडवांनी अज्ञातवास चालू ठेवावयास हवा होता. परंतु हा आग्रह म्हणजे, त्या तेरा वर्षात संयोगवश आलेल्या तिसऱ्या अधिकमास द्वयाचा अनुचित लाभ घेण्याचा आग्रह होता.

**वनवास प्रारंभ तिथी - ज्येष्ठ शुक्ल एकादशी**

अशा प्रकारे पांडव एकूण प्रतिज्ञा समय १६१ मास बारा दिवस मोजत होते, तर दुर्योधन १५६ + ६ = १६२ मास मोजू पाहात होता. अर्थात, तो आणखी अठरा दिवसांचा आग्रह धरत होता. या अठरा दिवसामुळे (त्यावेळी चालू असलेले) तिसरे अधिकमास द्वय पूर्ण होऊन वनवासप्रारंभाची मूळ तिथी आली असती. अर्जुन ज्येष्ट पूर्व द्वितीय अधिकमासाच्या वद्य अष्टमीला अज्ञातवासातून बाहेर आला होता; यात अठरा दिवस मिळविले म्हणजे (तो अधिकमास संपून) ज्येष्ठ शुक्ल एकादशी येते. आणि दुर्योधनाच्या म्हणण्याप्रमाणे त्या दिवशी तेरावे वर्ष संपून पाण्डवांनी प्रकट व्हावयास हवे होते.

म्हणून महाभारताची मूलभूत वनवास प्रारंभ तिथी ज्येष्ठ शुक्ल एकादशी आहे ! या दिवशी द्यूत झाले, व त्यात हरल्याने पांडव हस्तिनापुराहून वनवासार्थ निघाले. या तिथीपासून गणना प्रारंभ करून सूक्ष्म गणितानुसार पांडवांनी तेरा सौर वर्षे बरोबर पूर्ण केली. पण दुर्योधनाचा आग्रह होता की, त्यांनी अठरा दिवस कमी घालवले; आणि असा बहाणा करून तो त्यांचे राज्य परत करीना. या कारणाने ते युद्ध झाले. आणि महाकवीने मोठ्या खुबीने त्या महायुद्धातील प्रत्यक्ष लढाईचे दिवसही नेमके अठरा दाखविले आहेत. (मात्र भाग २ मध्ये दाखविल्याप्रमाणे या अठरा दिवसांशिवाय त्यात विश्रामदिवसही होते). प्रत्यक्ष लढाईच्या दिवसांच्या त्या संख्येमागील हे रहस्य दिसते ! ते युद्ध अठरा दिवसां'साठी' म्हणजे अठरा दिवसांच्या विवादामुळे झाले, आणि प्रत्यक्षात अठरा दिवस लढले गेले!

अनेक लेखक यासंबंधात विविध भ्रम व्यक्त करीत असतात. एक

लेखक म्हणतात की * वनवास प्रारंभ मार्गशीर्षात होऊन प्रगटीकरणही मार्गशीर्षात झाले; आणि पांडवांनी प्रतिज्ञासमयापेक्षा (तेरा सौर वर्षापेक्षा) अठरा दिवस जास्त व्यतीत केले. वनवासप्रारंभाचा व अज्ञातवास समाप्तीचा हा महिना बरोबर आहे किंवा नाही हा प्रश्न बाजूस ठेवला, तरी पाण्डव त्या हीन अवस्थेत जास्त दिवस कशाला घालवते? आणि त्यांनी तसे केले असते, तर त्यांचे राज्य परत न करण्यासाठी दुर्योधनाला बहाणा काय उरला असता?

**ग्रीष्म ऋतूची प्रमाणे**

महाभारतात पांडवांचे अज्ञातवासातून प्रगटीकरण निःसंदिग्धपणे ग्रीष्म ऋतूत दर्शविले आहे. म्हणून नीलकंठ समजतात त्याप्रमाणे वनवासारंभ जर अश्विनात मानला, तर साहजिकच अशी धारणा होते की, पाण्डवांनी ग्रीष्मात प्रकट होऊन तेरा सौर वर्षात पाच सहा महिने कमी घालविले, जे उघडच अधिकमास समयाचे असावे, आणि त्याबद्दलच दुर्योधनाचा आक्षेप असावा.

पण वस्तुतः वनवासारंभ ग्रीष्म ऋतूत (ज्येष्ठ शुक्ल एकादशीला) झाला होता याचे इतरही पुष्टिकारक संकेत महाभारतात आहेत.

वनवासाच्या सुरुवातीस पाण्डव काम्यक वनात गेले. तेथे श्रीकृष्णांनी येऊन त्यांचे सांत्वन केले. आणि हस्तिनापुरास द्यूत झाले त्यावेळी आपण शाल्वाशी लढण्यात गुंतलो होतो हे सांगितले. या भेटीत अभिमन्यु, सुभद्रा आदींना श्रीकृष्ण आपल्याबरोबर (द्वारकेस) घेऊन गेले. यावेळचे द्वैतवनातील दृश्य वर्णन करताना महाकवी म्हणतात-

**तमालतालाम्रमधूकनीपकदम्बसर्जार्जुनकर्णिकारैः**
**तपात्यये पुष्पधरैरुपेतं महावनं राष्ट्रपतिर्ददर्श।।वनपर्व, २४-१७**
**महाद्रुमाणां शिखरेषु तस्थुर्मनोरमां वाचमुदीरयन्तः**
**मयूरदात्यूह चकोरसङ्घास्तस्मिन् वने बर्हिणकोकिलाश्च।।१८**

"राष्ट्रपति युधिष्ठिराने (त्या) 'तपात्यय' (ग्रीष्मान्त) समयी पुष्पे धारण करणाऱ्या तमाल, ताल, आम्र, मधूक, नीप, कदंब, सर्ज, अर्जुन, कर्णिकार आदि वृक्षांनी भरलेले ते महावन पाहिले - १७. त्या वनात विशाल वृक्षांच्या शिखरांवर मनोहर आवाज करीत मयूर, चकोर, चातक, बर्हिण व कोकिळ पक्षांच्या झुंडी बसल्या होत्या - १८".

---

*"The Date of Maha Bharata War and the Kali Yugadhi," by K. Sriniwas Raghavan,pp.25-26.



येथे श्लोक १७ मध्ये 'तपात्यय' (ग्रीष्म ऋतूचा अंत) हा महत्त्वाचा शब्द आला आहे. 'तप' शब्दाचा ग्रीष्म ऋतूच्या अर्थाने प्रयोग द्रोणपर्व १६३-२४ व कर्णपर्व ७५-२ यातही आला आहे. आणि वनपर्वातच पुढील स्थळी 'तपात्यय' शब्द ग्रीष्माचा अंत व वर्षाऋतूचे आगमन या अर्थी निःसंदिग्ध आला आहे. वनवासाच्या बाराव्या वर्षी पांडव पुनः द्वैतवनात गेले (प्रकरण ४ पाहा), त्यावेळचे वर्णन करताना महाकवी म्हणतात-

**निदाघान्तकरः कालः सर्वभूतसुखावहः**
**तत्रैव वसतां तेषां प्रावृट् समभिपद्यत ।।१८२-१**
**छादयन्तो महाघोषाः खं दिशश्च बलाहकाः**
**प्रववर्षुर्दिवारात्रमसिताः सततं तदा।।२**
**तपात्ययनिकेताश्च शतशोऽथ सहस्त्रशः**
**अपेतार्कप्रभाजालाः सविद्युद्विमलप्रभाः।।३**

"पांडव द्वैतवनातच होते त्यावेळी ग्रीष्मकाळ संपून सर्व प्राण्यांना आनंदित करणारा वर्षाऋतु प्राप्त झाला- १. तेव्हा महागर्जनाकारी काळे मेघ आकाश व दिशा व्यापून रात्रंदिवस सतत वृष्टी करू लागले- २. 'तपात्यय' (ग्रीष्मान्त, वर्षाऋतुप्रारंभ) समयी, उभारलेल्या तंबूंसमान दिसणाऱ्या, शेकडो - हजारो मेघांनी सूर्यप्रकाश झाकून विजेची विमल प्रभा पसरवून दिली-३."

'तपात्यय' समयाच्या, बाणि तेही त्याच द्वैतवनाशी संबंधित, या दोन वर्णनांतील साम्य लक्षवेधक आहे. प्रथम वर्णनात (२४-१८) मनोहर नाद करणाऱ्या मयूर, चातक (दात्यूह), कोकिळ, आदींच्या झुंडी आहेत; तर द्वितीय वर्णनातही 'स्तोककाः शिखिनश्चैव पुंस्को किलगणैः सह। मत्ताः परिपतन्ति स्म...' (१८२-८) या श्लोकात उन्मुक्त उडणाऱ्या मयूर (शिखिनः), चातक (स्तोककाः) व कोकिळ पक्ष्यांचा उल्लेख आहे. उघडच प्रथम वर्णनांतील 'तपात्यय'देखील वर्षाऋतूप्रारंभाचा समय होता.

आणि याची पुष्टी कालिदासांच्या 'ऋतुसंहार' काव्यानेही होते. वर्षाऋतूच्या वर्णनात ते म्हणतात-

**कदम्बसर्जार्जुनकेतकीवनं**
**विकम्पयंस्तत्कुसुमाधिवासितः**
**ससीकराम्भोधरसङ्शीतलः**
**समीरणः कं न करोति सोत्सुकम्।।२-१७**

"कदम्ब, सर्ज, अर्जुन आणि केतकी यांनी भरलेल्या वनाला कंपित करणारा, त्यांच्या पुष्पांनी सुगंधित आणि चन्द्रकिरण व मेघांच्या संसर्गाने शीतल झालेला वायू कोणाचे चित्त (प्रियजनमीलनार्थ) उत्सुक करीत नाही?" वर्षाऋतूंतील कदंब, सर्ज, अर्जुन, आदींच्या पुष्पांचा असा उल्लेख महाभारतांतही (वर उद्धृत २४-१७) त्याच शब्दात आला आहे. आणि महाभारतात (२४-१८) आलेला चातक पक्ष्यांचा उल्लेख ऋतुसंहारमधील श्लोक २-३ मध्ये, व मयूरांचा २-६, १४, १६ मध्ये आला आहे.

निःसंदेह वनपर्वाच्या वरील श्लोकात (२४-१७,१८) निर्दिष्ट 'तपात्यय' म्हणजे ग्रीष्माचा अंत व वर्षाऋतूचा प्रारंभ होता. याच्या थोड्याच दिवसापूर्वी श्रीकृष्ण द्यूतांत पाण्डवांच्या झालेल्या दुर्दशेबद्दल सान्त्वन करण्यास आले होते. आणि त्याच्या काही दिवसपूर्वी द्यूत होऊन वनवासारंभ झाला होता. हे सर्व द्यूत ज्येष्ठ शुक्लात झाल्याची पुष्टी करते.

शेवटी आणखी एक प्रमाण पहा. दुर्योधनाने विराटावर हल्ला केला तेव्हा ग्रीष्म ऋतू चालू होता, हे महाभारतात स्पष्टच म्हटले आहे. या हल्ल्याची योजना ठरविते वेळी अज्ञातवासी पाण्डवांचा अद्याप शोध न लागल्याने चिंतित दुर्योधन म्हणाला -

**अल्पावशिष्टं कालस्य गतभूयिष्ठमन्ततः**
**तेषामज्ञातचर्यायामस्मिन् वर्षे त्रयोदशे।।विराटपर्व, २६-३**

"या तेराव्या वर्षात पाण्डवांनी अज्ञातवासाचा बहुतेक समय घालविला असून थोडासाच बाकी उरला आहे." जर वनवासारंभ अश्विनात झाला असता तर दुर्योधनाच्या अपेक्षेप्रमाणे तेराव्या वर्षाची म्हणजे अज्ञातवासाची समाप्तीही आश्विनात व्हावयाची होती (आणि नीलकंठांनी वर उद्धृत भाष्यांत तसे सुचविलेही आहे). पण त्या स्थितीत आश्विन (ग्रीष्मापासून) अद्याप चार पाच महिने दूर असतां, दुर्योधनाने अज्ञातवास वर्ष आता केवळ 'अल्पावशिष्ट (थोडेच उरलेले) आहे असे उद्गार काढले नसते. उलट, ज्येष्ठ शुक्ल एकादशीला वनवास सुरू झाला होता, व दुर्योधनाच्या अपेक्षेप्रमाणे त्या तिथीला अज्ञातवाससमाप्ती व्हावयाची होती, म्हणून ग्रीष्म ऋतूच्या प्रारंभाच्या सुमारास दुर्योधन पांडवांचा अज्ञातवास समय आता अल्प उरला आहे असे म्हणाला. आणि यामुळेच कृपाचार्यही त्या विचारविनिमयात म्हणाले की, अज्ञातवासी पाण्डवांचा प्रकट होण्याचा काळ आता जवळ आला आहे ('काले चोदयमागते,'



२९-५).

द्यूत ज्येष्ठांत झाले होते याची महाभारतात वर्णित पुढील घटनांच्या स्थूल कालमानाशीही सुसंगती होते. इन्द्रप्रस्थास राजसूय यज्ञात प्रदर्शित पाण्डवांच्या अपार वैभवाने मत्सरग्रस्त झालेल्या दुर्योधनाने हस्तिनापुरी द्यूताची योजना आखून, धृतराष्ट्रद्वारे त्यासाठी पाण्डवांना आमंत्रित केले. त्या यज्ञातील अभिषेचनीय विधीची तिथी शास्त्रानुसार चैत्र शुक्ल प्रतिपदा निश्चित आहे.* त्या तिथीस किंवा तिच्या आसपास श्रीकृष्णांनी अतिथिसत्कारावरून उठलेल्या विवादात शिशुपालाचा यज्ञमंडपात वध केला. ती वार्ता कळताच बदला घेण्यासाठी शाल्वाने तत्काळ द्वारकेवर हल्ला केला; त्यावेळी स्वतः कृष्ण अद्याप इंद्रप्रस्थास पांडवांबरोबर होते. (वनपर्व १४-५). त्या समयी द्वारकेच्या रक्षणार्थ तिच्या आसपासच्या सर्व विहिरी कोरड्या करून टाकल्या होत्या (वनपर्व १५-१६). हे वर्षाऋतूत संभव नसून तत्पूर्वीचा ग्रीष्म समय दर्शविते. यानंतर लवकरच श्रीकृष्ण द्वारकेला परत आले व त्यांनी शाल्वाविरुद्ध युद्ध केले; आणि त्याचवेळी तिकडे हस्तिनापुराला द्यूत झाले. (वनपर्व अध्याय १३, अध्याय १४ श्लोक २२, व अध्याय २२ श्लोक ४२,४३). श्रीकृष्णांना पांडववनवासाची बातमी समजताच ते त्यांचे सांत्वन करण्यासाठी वनात जाऊन त्यांना भेटले. आणि वर सांगितल्याप्रमाणे, ज्यावेळेस पांडवांचा निरोप घेऊन (व आपल्याबरोबर सुभद्रा, अभिमन्यु व अन्यही काही जणांना घेऊन) श्रीकृष्ण द्वारकेकडे परतले तेव्हा ग्रीष्मांताचा समय होता. ❐

---

* पाहा 'History of Dharmashastra' by P.V. Kane, II, ii, 1216; आणि शतपथ ब्राह्मण Eng. Translation in S.B.E. Vol.XLI P.68 and Vol.XVI P.68 footnote 2.

प्रकरण ४

# तेरा वर्षांची गणना व त्यांचा घटनाक्रम

**पांडवांनी केलेली गणना**

पांडवांनी, व त्यांच्या उलट दुर्योधनाने, तेरा वर्षांची अधिकमासांसहित केलेली वेगवेगळी गणना आता पुढील प्रमाणे स्पष्ट करता येईल. पांडवांनी केलेली सूक्ष्म गणना अशी --

| | महिने | |
|---|---|---|
| ज्येष्ठ शुक्ल ११ ते अमावास्या | 0-20 | ३९ महिने २० दिवस (+ वनवासपूर्व १८-१० = ५८ महिने) |
| आषाढ शुक्ल १ ते ज्येष्ठ अमावास्या | 12-00 | |
| -"- | 12-00 | |
| -"- | 12-00 | |
| आषाढ शुक्ल १ ते भाद्रपद अमावास्या | 3-00 | |
| + भाद्रपदानंतर दोन अधिकमास (चौथ्या वर्षात) | +2 | |
| आश्विन शु. १ ते भाद्रपद अमावास्या | 12-00 | ५८ महिने |
| -"- | 12-00 | |
| -"- | 12-00 | |
| -"- | 12-00 | |
| आश्विन शु. १ ते आषाढ अमावास्या | 10-00 | |
| + आषाढानंतर दोन अधिकमास (नवव्यावर्षात) | + 2 | |
| श्रावण शु. १ ते आषाढ अमावास्या | 12-00 | ५८ महिने |
| -"- | 12-00 | |
| -"- | 12-00 | |
| -"- | 12-00 | |
| श्रावण शु. १ ते वैशाख अमावास्या | 10-00 | |
| + वैशाखानंतर प्रथम अधिक मास, व त्याला लागून द्वितीय अधिक मास शु. १ ते वद्य सप्तमी | +1 - 22 | |

एकूण 155 - 20 + 5 - 22
= 161 - 12
= 13 चान्द्र वर्षे + 5 महिने बारा दिवस
= सौर तेरा वर्षे



अज्ञातवासांतून प्रकट होण्याची तिथी :- वैशाखोत्तर (ज्येष्ठ पूर्व) द्वितीय अधिकमास वद्य अष्टमी.

यात दिसून येईल की, त्या तेरा वर्षांतील प्रथम अधिकमास द्वय वनवासाच्या चतुर्थ वर्षात, दुसरे द्वय नवव्या वर्षात व तिसरे तेराव्या वर्षात आले; पण प्रत्येक वेळेस दोन द्वयांतील अंतर बरोबर अठ्ठावन महिने आहे.

पांडवांची हीच गणना दुसऱ्या प्रकारे अशी दाखविता येईल.

| | | | |
|---|---|---|---|
| वर्ष 1 | ज्येष्ठ शुक्ल 11 ते ज्येष्ठ शु. 10 | = 12-00 | ३८ - २० |
| 2 | -"- | = 12-00 | |
| 3 | -"- | = 12-00 | |
| 4 | ज्येष्ठ शु. 11 ते भाद्रपद अमावास्या | = 3-20 | |
| | भाद्रपदानंतर दोन अधिक मास | = | +2 |
| | आश्विन शु. 1 ते जेष्ठ शु. 10 | = 8-10 | ५८-०० |
| 5 | ज्येष्ठ शु. 11 ते ज्येष्ठ शु. 10 | = 12-00 | |
| 6 | -"- | = 12-00 | |
| 7 | -"- | = 12-00 | |
| 8 | -"- | = 12-00 | |
| 9 | ज्येष्ठ शु. 11 ते आषाढ अमावास्या | = 1-20 | |
| | आषाढानंतर दोन अधिकमास | = | +2 |
| | श्रावण शु. 1 ते ज्येष्ठ शु. 10 | = 10-10 | ५८-०० |
| 10 | ज्येष्ठ शु. 11 ते ज्येष्ठ शु. 10 | = 12-00 | |
| 11 | -"- | = 12-00 | |
| 12 | -"- | = 12-00 | |
| 13 | ज्येष्ठ शु. 11 ते वैशाख अमावास्या | = 11-20 | |
| | वैशाखानंतर प्रथम अधिकमास, व द्वितीय अधिकमास शु. १ ते वद्य सप्तमी | = | +1-22 |

एकूण = 155 - 20 + 5 - 22
= 161 - 12
= 13 चान्द्र वर्षे + 5 महिने बारा दिवस
= सौर तेरा वर्षे

अज्ञातवासांतून प्रकट होण्याची तिथी - वैशाखोत्तर (ज्येष्ठ पूर्व) द्वितीय अधिक मास वद्य अष्टमी.

वर सांगितल्याप्रमाणे, गणितीय हिशेबाने 'अधिक' समयाचा अंतिम

दिवस आंशिक होता, तरी पांडवांनी भारतीय परंपरेनुसार तो (रात्रीसमाप्ती पावेतो) पूर्ण मोजला. म्हणून त्यांनी 'अज्ञात' अवस्था शेवटच्या वद्य समाप्तीस पुढील सूर्योदयापावेतो पाळली. अन्यथा, (दुसरे दिवशी अर्जुन कौरवांशी प्रकटपणे लढला त्याप्रमाणे) पांडव त्या सप्तमीला रात्री सुशर्माशी प्रकट रूपाने लढू शकले असते. पण त्या रात्री युद्धात भीम शत्रूवर प्रहार करण्यासाठी एक विशाल वृक्ष उपटू लागला असतां, युधिष्ठिराने त्याला तात्काळ रोकून म्हटले-

**मा भीम साहसं कार्षीस्तिष्ठत्येव वनस्पतिः**
**मा त्वां वृक्षेण कर्माणि कुर्वाणमतिमानुषम् ।। विराटपर्व, ३३-१८**
**जनाः समवबुद्धेरन् भीमोऽयमिति भारत**
**अन्यदेवायुधं किंचित् प्रतिपद्यस्व मानुषम् ।।१९**

"भीमा, असे साहस करू नको; तो वृक्ष तसाच राहू दे. जर तू वृक्ष उपटून असे काही अतिमानव कर्म करशील तर हा भीम आहे असे लोक ओळखतील; पण ते न झाले पाहिजे; म्हणून साधारण मनुष्य वापरतो तसेच एखादे अन्य आयुध घे." सप्तमीच्या त्या रात्रीच्या समाप्तीला अद्याप काही वेळ शेष होता, व तत्पूर्वी कोणाही पांडवाला प्रकट व्हावयाचे नव्हते. यासाठी युधिष्ठिराने भीमाला तातडीने ही सूचना केली !

**एक संभाव्य शंका**

भीष्मांनी 'अधिक' समय पाच महिने बारा दिवस मोजला असताना, वरील गणनेत तो पाच महिने व बावीस दिवस दिसतो हे कसे? पण शेवटी एकूण काळ बरोबर १६१ महिने व बारा दिवस येतो हे ध्यानांत येईलच. त्यात १५६ मूळ चान्द्रमास (तेरा चान्द्र वर्षे) असून, शेष पांच महिने बारा दिवस भीष्मांच्या गणितानुसार 'अधिक' समयाचे आहेत. आता अधिक समयाची वेगळी बेरीज पांच महिने बावीस दिवस दिसते याचे कारण असे की, वनवासप्रारंभ (ज्येष्ठ) मासाचे प्रारंभी म्हणजे शुक्ल प्रतिपदेस न होता, दहा दिवसानंतर शुक्ल एकादशीला झाला होता . हे लक्षात घेता, वनवासाच्या प्रत्येक महिन्याची ( व म्हणून शेवटच्या एकशे छप्पन्नाव्या महिन्याचीही) समाप्ती वस्तुतः अमावास्येवर न मानता, शुक्ल दशमीवर मानावयास हवी. परंतु पंचांगांत अधिकमास ठीक अमावास्येला लागून जोडले जातात, महिन्याच्यामध्ये कोठे नव्हे. म्हणून, शेवटी एक महिना बावीस दिवसांचा जो अधिकसमय जोडला गेला, त्यातील दहा दिवस वस्तुतः शेवटचा एकशे छपन्नावा महिना (किंवा अगदी सुरुवातीचा ज्येष्ठ महिना) पूर्ण करण्याकडे लागले. जर वरील गणनेत (अधिक समयाची एकूण बेरीज पाच महिने बारा दिवस दिसण्यासाठी) तिसऱ्या अधिकमासद्वयाचे



केवळ एक दिवस बारा महिने मोजले, तर त्याचा आशय असा होईल की, पांडवांनी 'अधिक' समय बरोबर पूर्ण केला, पण मूळ 156 मासांतून दहा दिवस कमी घालविले. पण त्यांनी तेही पूर्ण केले; व म्हणून अज्ञातवासाची अंतिम तिथी उपरोक्त वद्य सप्तमी होऊन, वद्य अष्टमीला सूर्योदयसमयी अर्जुन कौरवांसमोर प्रकट झाला.

**अज्ञातवास वर्षाचा तपशील**

याबरोबरच पांडवांच्या अज्ञातवास समयाचाही पूर्ण तपशील पाहा. त्यांनी ते एक वर्षही सौर मोजले; आणि म्हणून (एकंदर अधिकमास समयातील) बारा दिवस एका चान्द्र वर्षात जोडून एकूण अज्ञातवास बारा महिने व बारा दिवस केला, तो असा -

| | | |
|---|---|---|
| प्रथम मास प्रारंभ | - | आषाढ शुक्ल एकादशी |
| द्वितीय मास प्रारंभ | - | श्रावण शुक्ल एकादशी |
| तृतीय मास प्रारंभ | - | भाद्रपद शुक्ल एकादशी |
| चतुर्थ मास प्रारंभ | - | आश्विन शुक्ल एकादशी |
| पंचम मास प्रारंभ | - | कार्तिक शुक्ल एकादशी |
| (आणि याचप्रमाणे पुढे) | | |
| दशम मास प्रारंभ | - | चैत्र शुक्ल एकादशी |
| एकादश मास प्रारंभ | - | वैशाख शुक्ल एकादशी |
| द्वादश मास प्रारंभ | - | प्रथम अधिकमास शुक्ल एकादशी |
| द्वादश मास पूर्ण | - | द्वितीय अधिकमास शुक्ल दशमी |
| बारा अधिक दिवस पूर्ण | - | द्वितीय अधिकमास वद्य सप्तमी |
| प्रकटीकरण तिथी | - | वैशाखोत्तर (ज्येष्ठपूर्व) द्वितीय अधिकमास वद्य अष्टमी |

या तपशीलवार गणनेची एक पुष्टी पाहा. अज्ञातवासाच्या चौथ्या महिन्यात 'ब्रह्मोत्सव' येऊन त्यात (बल्लवरूपी) भीमाचे जीमूताशी मल्लयुद्ध झाले.

**अथ मासे चतुर्थे तु ब्रह्मणः सुमहोत्सवः**
**आसीत् समृद्धो मत्स्येषु पुरुषाणां सुसम्मतः ।। विराटपर्व, १३-१४**

"तदनंतर (अज्ञातवासाच्या) चतुर्थ महिन्यात विशाल ब्रह्ममहोत्सव साजरा झाला; तो (मत्स्य) विराट राज्याच्या जनतेत विशेष लोकप्रिय असे." परंपरेनुसार हा ब्रह्मोत्सव शरद ऋतूत होत असे. 'सर्वज्ञनारायणभाष्यां'त म्हटले आहे की,'ब्रह्मणः उत्सवः शरदि कर्तव्यो देशविशेषे प्रसिद्धः'; आणि नीलकंठही

म्हणतात, 'ब्रह्मणउत्सवः शरदि नवधान्योत्पत्तौ सर्वैः क्रियते.' नवधान्य उगवल्यावर हा उत्सव होत असे, अर्थात पावसाळा संपल्यावर शरद ऋतूच्या पहिल्या महिन्यात म्हणजे आश्विनात त्याचा समय असावा. मोरोपंतकृत विराट पर्वाचे संपादन करताना म. न. अदवन्त म्हणतात की, नवधान्योत्पत्तीनंतर होणारा हा उत्सव आश्विनात होत असे. अज्ञातवास वर्षाच्या वर दिलेल्या तपशीलात चवथा महिना आश्विनात येतो, आणि तेव्हा तो ब्रह्मोत्सव महाभारतात म्हटल्याप्रमाणे विराट राज्यात साजरा झाला.

आणखी एक खुलासा. वनवास प्रारंभ ज्येष्ट शु. एकादशीला झाला; आणि म्हणून वनवासाच्या दर वर्षाचा आरंभ (वर तेरा वर्षाच्या वैकल्पिक गणनेत दाखविल्याप्रमाणे) त्या तिथीला मानता येईल. पण शेवटचे वर्ष घोर अज्ञातवासात घालवावयाचे होते. आणि अज्ञातवासही ज्येष्ठ शु. एकादशीला प्रारंभ घाला असता, तर शेवटी अधिकमास आल्याने तो तेरा महिने बारा दिवस इतका लांबला असता. परंतु ज्याप्रमाणे पांडवांनी त्या तेरा वर्षाच्या अवधीत संयोगवश आलेला संपूर्ण 'अधिक' समय (सहा महिने) न पाळता, त्याचा तेरा वर्षाच्या प्रमाणाने होणारा भाग तेवढा पाळला, त्याचप्रमाणे अज्ञातवास वर्ष मोजताना ते त्या वर्षाच्या शेवटी संयोगवश येणारे सर्व 'अधिक' दिवस न जोडता, केवळ एका वर्षाशी संबद्ध 'अधिक' दिवस जोडण्यास बाध्य होते. म्हणून त्यांनी अज्ञातवासात बारा महिने बारा दिवस घालविले आणि या कारणाने अज्ञातवास वर्ष ज्येष्ठाऐवजी एक महिन्यानंतर आषाढात शुक्ल एकादशीला सुरू झाला.

नीलकंठांच्या मतानुसारही वनवासाची आरंभ तिथी व अज्ञातवासारंभ तिथी यात अंतर येते - आणि ते याहून फार अधिक. ते वनवासारंभ आश्विनात व अज्ञातवास समाप्ती वैशाखात मानतात. याचा अर्थ असा की, अज्ञातवासाचा आरंभही आश्विनात मानला, तर पांडवांनी अज्ञातवासात केवळ सात-आठ महिने घालविले. पण पांडवांनी एकूण तेरा वर्षे मोजण्यात अधिकमास वगळले असे म्हणणारे नीलकंठही पांडवांनी अज्ञातवासाचे बारामहिने पूर्ण न करता त्या अवस्थेत केवळ सात आठ महिने घालविले असे म्हणणार नाहीत. आणि या शिवाय, स्वतः महाभारतकारांनी अज्ञातवासाचे दहा महिने पूर्ण झाल्याचा एकेस्थळी स्पष्ट उल्लेख केला आहे (विराट पर्व १४-१, पुढे उद्धृत). म्हणून नीलकंठांना वनवासप्रारंभ आश्विनात मानूनही अज्ञातवास वर्षाचा आरंभ वैशाखात मानणे भाग आहे. मात्र अज्ञातवासारंभ आश्विनात मानला किंवा वैशाखात, त्याच्या चवथ्या महिन्यात उपरोक्त ब्रह्मोत्सव येणार नाही!



### दुर्योधनाची गणना

दुर्योधनाने, वर वैकल्पिक गणनेत दाखविल्याप्रमाणे, प्रत्येक वर्ष ज्येष्ठ शुक्ल एकादशी ते ज्येष्ठ शुद्ध दशमी असे मोजले; मात्र त्या गणनेत आणि दुर्योधनाच्या गणनेत महत्त्वाचा फरक असा की, त्याने शेवटचे तेरावे वर्षही तसेच ज्येष्ठ शु. दशमी पावेतो मोजले.

वर्ष १३ : ज्येष्ठ शु. ११ ते ज्येष्ठ शु. १० (यात वैशाखानंतर दोन अधिकमास).

आणि या विवादातून हे महायुद्ध उद्‌भवले!

### एक स्पष्टीकरण

प्रस्तुत विवेचनाला यथासंभव सर्वांगीण स्वरूप देण्याच्या दृष्टीने येथे एका बाबीवर विचार करतो. त्या तेरा वर्षांत तीन अधिक मास द्वये आली होती. हे भीष्मांनी एकूण अधिक समय पांच महिने व काही दिवस मोजला यावरून स्पष्ट आहे. अज्ञातवास समाप्तीच्या वेळी यातील तिसरे अधिकमास द्वय प्रत्यक्ष चालू होते या आधारे मी वर गणना केली आहे. पण या ऐवजी, ते तिसरे द्वयही यापूर्वीच येऊन गेले होते, आणि आता पांडव केवळ पश्चाद्दर्शी हिशेबाने शेवटच्या सामान्य मासातून अठरा दिवसांची सूट चाहत होते, असे कोणास म्हणावयाचे असेल तर?

तरीही वनवास प्रारंभ तिथी (व म्हणून दुर्योधनानुसार अज्ञातवासातून प्रकट होण्याची तिथी) ज्येष्ट शुक्ल एकादशीच राहील. फरक इतकाच होईल की, पाण्डवांनुसार प्रकटीकरणाची वद्य अष्टमी तिथी वैशाखोत्तर (ज्येष्ट पूर्व) द्वितीय अधिकमासाची न म्हणता, सामान्य वैशाखाची (=पौर्णिमान्त ज्येष्ठाची) म्हणावी लागेल. वर प्रकरण दोन मध्ये दिलेला हा दुसरा विकल्प होय. यात तिसरे अधिकमास द्वय अज्ञातवास वर्षातच, पण शेवटी न धरता मध्ये कोठे मानले, तर अज्ञातवासाच्या चतुर्थ व दहाव्या मासांचे जे उल्लेख महाभारतकारांनी केले आहेत ते घोटाळ्यात पडतील. ते अधिकमासांचे तिसरे द्वय तेराव्या वर्षापूर्वीच येऊन गेले होते असे म्हणता येईल काय? उदाहरणार्थ, पहिले द्वय वनवासाच्या द्वितीय वर्षात, दुसरे सातव्या वर्षात, व तिसरे बाराव्या वर्षात मानता येईल. पण यांत अडचण अशी की, अर्जुन प्रकटीकरण तिथी वैशाख वद्य अष्टमी मानली, तर अज्ञातवासाचा आरंभ (त्या तेराव्या वर्षात अधिकमास न मानता) बारा महिन्यापूर्वी वैशाख वद्य अष्टमीला मानावा लागेल. पण या गणनेने चवथा महिना श्रावण वद्य अष्टमी ते भाद्रपद वद्य सप्तमी येऊन आश्विनातला ब्रह्मोत्सव सिद्ध होणार नाही. पौर्णिमान्त महिने घेतले तर

अज्ञातवासाचा तो चवथा महिना भाद्रपद अष्टमी ते आश्विन वद्य सप्तमी होऊ शकेल. पण या पौर्णिमान्त आश्विन वद्याचे सात दिवस आमावास्यान्त भाद्रपद वद्य पक्षाचे असल्याने, भारतीय परंपरेनुसार विशेष रूपाने पितृश्राद्धादिसाठी नियुक्त असून, त्या दिवसात ब्रह्मोत्सवाचा आनंदमय समारोह साजरा झाला नसता. आणि याशिवाय, महाभारताचे महिने मूलतः पौर्णिमान्त नसून अमावास्यान्त आहेत; याची काही प्रमाणे देतो.

**महाभारताचे महिने अमावास्यान्त**

महाभारतकार शुक्ल पक्षाबरोबर बहुधा महिन्याच्या नावाचा उल्लेख करतात, पण वद्य पक्षाच्या महिन्याचे नाव पूर्ववर्ती पौर्णिमेचा उल्लेख करून अप्रत्यक्षपणे सुचवितात. याची काही उदाहरणे मागे दिली आहे. जर त्यांच्या दृष्टीत पौर्णिमान्त मास असते, तर त्यांनी (महिना सुरू करणाऱ्या) वद्य पक्षाबरोबर महिन्याचे नाव देऊन, शुक्ल पक्षांच्या महिन्याच्या नावाचा अप्रत्यक्ष संकेत दिला असता.

युवा पाण्डव हस्तिनापुराहून वारणावतास गेले ते सांगताना महाकवि म्हणतात-

**अष्टमेऽहनि रोहिण्यां प्रयाता फागुनस्य ते**
**वारणावतमासाद्य ददृशुर्नागरं जनम् ।। आदिपर्व १४४ - ३४**

"ते (पांडव) फाल्गुनाच्या आठव्या दिवशी रोहिणी नक्षत्रावर (हस्तिनापुराहून) निघाले व वारणावतास पोचून तेथील नागरिकांस भेटले." फाल्गुन महिन्यात चन्द्राचे (कृत्तिकेनंतर येणारे) रोहिणी नक्षत्र शुक्ल पक्षातच असू शकेल; कारण फाल्गुनी पौर्णिमेला चंद्र पूर्वा किंवा उत्तरा फाल्गुनी नक्षत्रात, अथवा जवळपास असतो; आणि रोहिणी त्याच्या सुमारे सात स्थाने पूर्वी आहे. हे पाहता, फाल्गुन महिन्यात शुक्ल अष्टमीला चंद्र रोहिणीत असू शकतो. वरील श्लोकात त्या तिथीला फाल्गुन महिन्याचा आठवा दिवस म्हटले आहे. यावरून त्या महिन्याचा आरंभ शुक्ल प्रतिपदेस व शेवट अमावास्येस सिद्ध होतो. तो पौर्णिमान्त मास असता तर रोहिणी नक्षत्राचा दिवस त्याचा सुमारे तेविसावा होईल. येथे नुसता 'अष्टम्याम्' शब्द असता तर ती संख्या केवळ तिथी निदर्शक मानून महिन्यांतील दिवसांच्या अनुक्रमांची नाही असे म्हणता आले असते. पण "अष्टमे अहनि" हे शब्द स्पष्ट आहेत.

रोहिणी नांव कधी कधी ज्येष्ठा नक्षत्रासाठीही उपयोजिले जाते. पण प्रस्तुत प्रसंगी पांडवांचे हस्तिनापुरहून परगावी प्रयाण शुभयोगावर आयोजित केले होते हे महाभारतकारांना विशेषतः सुचवावयचे आहे. कृत्तिकेनंतर येणाऱ्या



रोहिणीचा चंद्राशी योग फार शुभ मानला जातो. श्री. शं.बा. दीक्षित लिहितात, "रोहिणी नक्षत्राच्या पाच तारा आहेत... या रोहिणीचन्द्र समागमाकडे आपल्या लोकांचे लक्ष्य फार प्राचीन काळापासून लागले आहे... गर्गादिकांच्या संहितात या योगाची फार वर्णने आहेत. बृहत्संहितेत तर 24 वा सगळा अध्याय रोहिणीचंद्र योगाविषयी आहे" (पूर्व उल्लेखित, पृ. 143-144). चन्द्रज्येष्ठा योगाचे असे विशेष महत्त्व आढळून येत नाही.

याशिवाय अमावास्यान्त मास पद्धति दिग्दर्शित करणारी काही स्पष्ट वचनेही महाभारतात आहेत. अनुशासन पर्वात (87-19) भीष्म पितृश्राद्धांच्या वद्य पक्षाला 'अपर पक्ष' आणि शुक्ल पक्षाला 'पूर्व पक्ष' म्हणतात. ही अमावास्यान्त मास पद्धती आहे. तसेच शांतिपर्वातही भीष्म म्हणतात-

**पित्र्ये रात्र्यहनी मासः प्रविभागस्तयो पुनः**
**शुक्लोऽहः कर्मचेष्टायां कृष्णः स्वप्नाय शर्वरी।। शांतिपर्व, २३१-१६**

"(मानवांचा) एक मास म्हणजे पितरांची एक अहोरात्र होय; त्यात शुक्ल पक्ष म्हणजे त्यांच्या कामकाजाचा दिवसाचा समय व वद्य पक्ष म्हणजे झोप घेण्याची रात्रीची वेळ अशी आणखी विभागणी आहे." हे अमावास्यान्त मासांवर आधारित आहे; त्यात शुक्ल पक्ष प्रथम येऊन नंतर वद्य पक्ष येतो. आणखी एका पंक्तीत म्हटले आहे,"अहः पूर्वं ततो रात्रिर्मासा शुक्लादयाः स्मृताः" (आश्वमेधिक पर्व, 44-2), "दिवस प्रथम येतो, नंतर रात्र; मास शुक्लपक्षापासून प्रारंभ होतात असे मानले गेले आहे." शुक्ल पक्ष प्रारंभी येणे म्हणजे मास अमावास्यान्त असणे हे सांगणे नकोच.

**तेरा वर्षांचा घटनाक्रम : वनवासारंभ**

वनवास आरंभ व अज्ञातवास समाप्ती यांच्या तिथ्या अशा प्रकारे निश्चित झाल्याने, आता दरम्यानच्या तेरा वर्षांतील घटनांचा तपशील देणेही संभव झाले आहे. वनवासाचा अधिकांश काल काम्यक वन व द्वैत वनांत आणि हिमालयावर गेला. त्याची माहिती देऊन महाकवीने वनवासाची वर्षे क्रमशः मोजून दाखविली आहेत.

राजसूय यज्ञात पाण्डवांचे अपार वैभव पाहून दुर्योधन मत्सराने जळू लागला; व शकुनीच्या सल्ल्याने त्याने कपटपूर्ण द्यूताची योजना केली. त्याच्या सांगण्यावरून पुत्रप्रेमाने अंध झालेल्या धृतराष्ट्राने पांडवांना द्यूतार्थ निमंत्रण पाठविले. युधिष्ठिराला द्यूताची आवड नव्हती; पण पितृतुल्य धृतराष्ट्राचा आदेश शिरसावंद्य मानून तो आपले बंधु व द्रौपदी आदि स्त्रियांसह हस्तिनापुरास आला. द्यूताची तिथी आपण ज्येष्ठ शुक्ल एकादशी निश्चित केली आहे.

द्यूतात पांडव सर्वस्व हरून स्वतः दासही झाले. याशिवाय भरसभेत द्रौपदीवस्त्रहरणाची अति घृणास्पद घटना झाली. पण त्यामुळे सर्व सभागृहात उसळलेला तीव्र क्षोभ ध्यानात घेऊन धृतराष्ट्राने पांडवांस (द्रौपदीसह) दास्यत्वमुक्त करून त्यांचे राज्यही परत केले. पांडव तत्काळ इन्द्रप्रस्थास परत जाण्यास निघाले. पण दुर्योधनाने धृतराष्ट्राच्या संमतीने त्यांना वाटेतूनच पुनः द्यूतार्थ पाचारण केले. पांडव परतले, व 'अनुद्यूत' झाले. यावेळी अट अशी होती की, हरणाऱ्या पक्षाने बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास करावा; आणि अज्ञातवासात ओळखले गेल्यास पुनः तसाच वनवास आणि अज्ञातवास करावा. युधिष्ठिर याही वेळेस हरला; व पांडव तत्काळ तेथूनच (हस्तिनापुराहून) वनवासावर निघाले. पश्चिम दिशेने जात ते चौथ्या दिवशी मध्यरात्रीच्या सुमारास काम्यक वनांत पोचले. (वनपर्व, ११-३,४)

**प्रथम काम्यक निवास**

पांडवांनी काम्यक वनात प्रवेश केला त्यावेळच्या ऋतुमानाचा महाकवीने मार्मिक संकेत दिला आहे.

**तस्मिन् क्षणेऽथ प्रववौ मारुतो भृशदारुणः**
**रजसा संवृतं तेन नष्टज्योतिरभून्नभः ।। वनपर्व, ११-१३**

"त्या वेळी प्रचंड आंधी सुरू झाली व त्यामुळे उडालेल्या धुळीने आकाश व्याप्त होऊन (चन्द्राचा) प्रकाश नाहीसा झाला". वालुकामिश्रित आंधीचा हा उल्लेख ग्रीष्म ऋतूचा संकेत देऊन आपण प्रस्थापित केलेल्या वनवासप्रारंभ समयाची पुष्टी करतो. आदिपर्वात (१५०-२) म्हटलेही आहे की, त्या प्रदेशांत ज्येष्ठ ('शुचि') व आषाढ ('शुक्र') महिन्यांत जोराची आंधी येते.

लवकरच वनवासाची वार्ता द्वारकेस पोचली. आणि श्रीकृष्ण पांडवांचे सांत्वन करण्यासाठी काम्यक वनात येऊन त्यांना भेटले.

**द्वैतवनात प्रथम निवास**

श्रीकृष्ण परत गेल्यावर पांडव काम्यकवनांतून द्वैतवनात गेले (वनपर्व २३-१,२). वर सांगितल्याप्रमाणे हा ग्रीष्मऋतूच्या अंताचा समय होता. काही दिवसानंतर तेथे महर्षी व्यास येऊन पांडवांस भेटले (अध्याय ३६); त्यांनी पांडवांना सांगितले की, पांडवांच्या द्वैतवनांतील निवासात शिकारीमुळे तेथील वन्य पशूंची फार हानी होत असून, तपस्व्यांनाही नित्यकर्मांत बाधा येते, सबब पांडवांनी अन्यत्र जावे. त्याप्रमाणे पांडव द्वैतवन सोडून पुनः काम्यकवनात आले. पुढे दाखविल्याप्रमाणे हा दुसरा काम्यक निवास पांच वर्षे चालून मार्गशीर्षात संपला; म्हणून त्याचा आरंभही मार्गशीर्षाचे सुमारास मानता



येईल.

अशा प्रकारे पांडवांचा द्वैतवनांतील प्रथम निवास मार्गशीर्षापावेतो चालला. वनवासाचे प्रथम सहा महिने येथे संपले.

**द्वितीय काम्यक निवास ( व त्यावेळी अर्जुनाचा इन्द्रलोकनिवास)**

काम्यक वनात परत गेल्यावर अर्जुनाने विशेष अस्त्रविद्याप्राप्त्यर्थ इन्द्रलोकी जाण्यास प्रस्थान केले (३६-१६). तो हिमालयाकडे गेला, आणि गंधमादन पर्वत ओलांडून इन्द्रकील स्थानी पोचला. तेथे चार महिने उग्र तप केल्यावर त्याला शिवदर्शन झाले. त्यानंतर तो इन्द्रलोकास गेला. तो तेथे पोचला तोपावेतो शेष पांडवांपासून तो वेगळा होऊन सहा महिने झाले होते. येथे वनवासाचे प्रथम वर्ष समाप्त होते.

अर्जुनाचा इन्द्रलोकी निवास पूर्ण पाच वर्षे चालून ज्येष्ठात संपला. यादरम्यान शेष पांडवांचा (द्रौपदीसह) काम्यकनिवास चालू राहून त्यांनी तेथे पांच वर्षे घालविली.

**तथा तेषां वसतां काम्यके वै**
**विहिनानमर्जुनेनोत्सुकानाम्**
**पंचैव वर्षाणि तथा व्यतीयुः ... ५०-१२**

"अशाप्रकारे काम्यक वनात वास करीत त्यानी अर्जुनाशिवाय व त्याला पुनः भेटण्यासाठी उत्सुक मनःस्थितीत पाच वर्षे व्यतीत केली." यानंतर मार्गशीर्ष वद्य पक्षात ते तेथून तीर्थयात्रेवर निघाले.

**पांडवांची तीर्थयात्रा व अर्जुनाची पुनर्भेट**

काम्यक वनातून तीर्थयात्रेसाठी पांडवांनी प्रयाण केले त्याची तिथी महाकवी अशी दर्शवितात-

**धौम्येन सहिता वीरास्तथा तैर्वनवासिभिः**
**मार्गशीर्ष्यामतीतायां पुष्येण प्रययुस्ततः ।। वनपर्व, ९३-२६**

"मार्गशीर्ष पौर्णिमेनंतर चन्द्र पुष्य नक्षत्रात असता ते वीर (चार पांडव) कुलगुरु धौम्य व त्या काही वनवासी ऋषीसह (तीर्थयात्रेवर) निघाले". मार्गशीर्ष पौर्णिमेस चन्द्र मृगात (किंवा जवळपास) असतो, व मृगापासून पुष्य तीन स्थाने नंतर आहे. यावरून तो दिवस (अमावास्यान्त) मार्गशीर्ष वद्य तृतीयेचा असावा. यावेळपावेतो वनवासाची साडेपाच वर्षे पूर्ण झाली असून, त्यात अर्जुनाच्या इन्द्रलोकनिवासाची साडेचार वर्षे समाविष्ट होती.

तीर्थयात्रा रथात प्रारंभ झाली. पूर्व, दक्षिण व पश्चिम दिशांच्या तीर्थांचे दर्शन करून युधिष्ठिरादि पांडव उत्तरेस हिमालयापाशी आले. तेथे पायी चढण

सुरू झाली. युधिष्ठिराने मोजल्याप्रमाणे यावेळी अर्जुनवियोगाची पाच वर्षे झाली होती.

**पंचवर्षाण्यहं वीरं सत्यसंधं धनंजयम्**
**यन्न पश्यामि बीभत्सुं तेन तप्ये वृकोदर ।। वनपर्व १४१-७**

"भीमा, सत्यप्रतिज्ञ वीर अर्जुनाला न पाहून माझी पाच वर्ष लोटली आहेत; त्यामुळे मी फार उद्विग्न आहे." ही वर्षाची गणना अर्जुन काम्यकवनातून निघाला तेव्हापासून केली आहे; मात्र काही ठिकाणी महाभारतकारांनी अर्जुन इन्द्रलोकी पोचला तेव्हापासूनही काळ मोजला आहे.

अर्जुनास भेटण्यासाठी अत्यंत उत्सुक युधिष्ठिराने थोड्या दिवसानंतर पुनः म्हटले-

**समाश्चतस्त्रोऽ भिगताः शिवेन चरतां वने**
**कृतोद्देशः स बीभत्सुः पंचमीमभितः समाम् ।। वनपर्व १५८-३**
**कृतश्च समयस्तेन पार्थेनामिततेजसा। ८**
**पंचवर्षाणि वत्स्यामि विद्यार्थीति पुरा मयि।।९**

"वनात सकुशल संचार करीत आपली चार वर्षे पूर्ण झाली आहेत; (या) पाचव्या वर्षी परत येण्याचे अर्जुनाने आश्वासन दिले होते-३. अमित तेजस्वी वीर अर्जुनाने पूर्वी मला निश्चित वचन दिले होते की, मी (इन्द्रलोकी) पाच वर्षे (अस्त्र विद्येच्या) अध्ययनार्थ निवास करीन." ही चार वर्षे पांडवांच्या एकूण वनवासातली नसून, अर्जुनाच्या इन्द्रलोकनिवासाच्या पाच वर्षांपैकी आहेत. अर्जुनाच्या त्या निवासाचे पाचवे वर्ष यावेळी चालू होते.

हिमालयावरील मार्गात काही स्थळी थांबत थांबत (ज्याचा काही तपशील महाभारतकारांनी दिला आहे) पांडव गंधमादन पर्वताच्या शिखरावर पोचले. तेथे काही महिने घालविल्यावर (१६०-१२), त्यांना कुबेर दर्शन झाले. आणि त्यानंतर एक महिन्याने अर्जुनाची इन्द्रलोकी पाच वर्षे पूर्ण होऊन तो परत येऊन युधिष्ठिरादींना भेटला.

**तथा निवसतां तेषां पंचमं वर्षमभ्यगात्**
**शृण्वतां लोमशोक्तानि वाक्यानि विविधान्युत ।।वनपर्व १६०-१०**

"लोमश मुनीपासून विविध कथा श्रवण करीत तेथे राहून त्यांनी (अर्जुनाच्या इन्द्रलोक निवासाचे) पाचवे वर्ष पूर्ण केले." एकूण वनवासकाळाची सहा वर्षे आतापावेतो पूर्ण झाली होती.

**गंधमादनावर चार वर्षे**

यानंतर अर्जुनासह सर्व पांडवांनी गंधमादन पर्वतावर कुबेरलोकात



आणखी चार वर्षे घालवून, वनवासाची दहा वर्षे पूर्ण केली.

**समेत्य पार्थेन यथैकरात्रम्**
**ऊषुः समास्तत्र तदा चतस्त्रः**
**पूर्वाश्च षट् ता दश पाण्डवानां**
**शिवा वभूवुर्वसतां वनेषु।।१७६ - ५**

"मग ते तेथे अर्जुनासह चार वर्षे राहिले; तो काळ त्यांना जणू एका रात्रीसमान भासला. पूर्वीची सहा वर्षे मिळून पांडवांची अशा प्रकारे (आतापावेतो) दहा वर्षे मनात सकुशल पार पाडली." वनवासाच्या प्रारंभ ज्येष्ठ शुक्ल एकादशीस झाला असल्याने वनवासाच्या प्रत्येक वर्षाची समाप्ती ज्येष्ठात मानता येईल.

**वनवासाचे अकरावे वर्ष**

या वर्षाचे आरंभी भीमाने युधिष्ठिरास म्हटले-

**एकादशं वर्षमिदं वसामः**
**सुयोधनेनात्तसुखाः सुखार्हाः**
**ते वंचयित्वाधमबुद्धिशीलम्**
**अज्ञातवासं सुखमाप्नुयाम ।। १७६-८**

"सुखोपभोगार्थ हक्कदार असूनही दुर्योधनाकडून आम्ही सुखापासून वंचित झालो असून, आमचे (त्या अवस्थेतील) हे अकरावे वर्ष चालू होत आहे; त्या दुर्बुद्धी दुर्योधनाला पत्ता न लागू देता आम्ही अज्ञातवास सकुशल पार पाडू."

यानंतर पांडव गंधमादन पर्वतापासून खाली उतरले; आणि मार्गात बदरिकाश्रमात एक मास राहून किरातराज सुबाहुच्या राज्यात पोचले (१७७-११). तेथून ते (परत) द्वैतवनाच्या विशाखयूप विभागात आले. हा श्रावणाचा सुमार असावा. साहजिकच चढण्यापेक्षा उतरण्यास कमी वेळ लागला.

**द्वैतवनात द्वितीय निवास**

विशाखयूप वनात पाण्डवांनी एक वर्ष काढले (१७७-१७). ते वर्ष वर्षाऋतूला संपले.

**तथा बहुविधाकारा प्रावृण्मेघानुनादिता**
**अभ्यतीता शिवा तेषां चरतां मरुधन्वसु ।।१८२-९**

"ते मरुभूमीत संचार करीत असता मेघगर्जनायुक्त विविध दृश्यधारी मंगल वर्षा ऋतु आला." यासाठी या विशाखयूपातील निवासाचा आरंभही वर श्रावणाच्या आसपास मानला आहे.

तेथून पांडव द्वैतवनांतीलच द्वैतवन सरोवरावर गेले. (१७७-२१) तेथे शरद ऋतु घालवीत ते कार्तिक पौर्णिमेपावेतो राहिले (१८२-११, १६ वर उद्धृत).

या दिवसांत दुर्योधनाने आपल्या गोशाळांच्या निरीक्षणाचे निमित्त करून, पण वस्तुतः वनवासी पांडवांना मुद्दाम खाली पाहावयास लावण्याच्या उद्देशाने, द्वैतवनात घोषयात्रा केली. पण त्यात स्वतः त्याचाच गंधर्वांशी संघर्ष होऊन त्यांनी दुर्योधनाला बंदिस्त केले असता, उदारबुद्धि पांडवांनी त्याला मुक्त केले.

कार्तिक वद्य पक्षात पांडव द्वैतवन सोडून काम्यकात आले.

**तमिस्त्राभ्युदये तस्मिन् धौम्येन सह पांडवाः**
**सूतैः पौरोगवैश्चैव काम्यकं प्रययुर्वनम्।।१८२-१८**

"(कार्तिक पौर्णिमेनंतरच्या) वद्य पक्षाच्या त्या सुरुवातीस पांडव धौम्यमुनी व सारथी स्वयंपाकी आदिसह काम्यक वनात गेले." अशा प्रकारे द्वैतवनातला हा दुसरा मुक्काम सुमारे एक संवत्सर विशाखायूपात व शिवाय दोन महिने द्वैतवन सरोवरावर झाला. पांडवांच्या शिकारीमुळे द्वैतवनातील पशू पुनः मारले जाऊन, शेष प्राण्यांनी युधिष्ठिराजवळ दयेची याचना केली. तेव्हा त्याने आपल्या भावांस म्हटले-

**ते सत्यमाहुः कर्तव्या दयास्माभिर्वनौकसाम्**
**साष्टमासं हि नो वर्षं यदेतदुपयुङ्क्ष्महे ।।२५८-१२**

"त्यांची प्रार्थना उचितच आहे; आपण या वन्यप्राण्यांवर दया केली पाहिजे. येथे (द्वैतवनात) आमचा निवास एक वर्ष आठ महिने होऊन चुकला आहे." यात द्वितीय निवासाच्या एक वर्ष दोन महिन्यात प्रथम निवासाचाही काळ जोडून युधिष्ठिराने त्या वनातील एकूण निवासाचा समय मोजला आहे. वन्य पशूंच्या याचनेच्या निमित्ताने महाकवीने येथे किती तंतोतंत कालगणना करून ठेवली आहे!

**तृतीय काम्यक निवास**

वर म्हटल्याप्रमाणे कार्तिक वद्यपक्षात पांडव द्वैतवन सोडून पुनः काम्यक वनांत त्यातील तृणबिंदु सरोवरावर आले. काम्यकातला हा त्यांचा तिसरा व शेवटचा मुक्काम होता. यावेळी वनवासाचे बारावे वर्ष चालू होते. पांडव तेथे माघ महिन्यापावेतो राहिले असावे असे एकंदर घटनाक्रमावरून दिसते.

या दिवसात श्रीकृष्णांनी पांडवांची पुनः भेट घेतली; आणि एक दिवस पांडव शिकारीसाठी गेले असून द्रौपदी कुटीत एकटीच असता, जयद्रथाने



तिच्या अपहरणाचा प्रयास केला. पण पांडव कुटीवर परत येताच त्यांनी जयद्रथाचा पाठलाग करून द्रौपदीस मुक्त केले, आणि जयद्रथाचे हास्यास्पद मुंडन करून त्याला सोडून दिले.

**तृतीय द्वैतवन निवास**

यानंतर पांडव काम्यक सोडून पुनः द्वैतवनात आले.

**एवं हृतायां कृष्णायां प्राप्य क्लेशमनुत्तमम्**
**विहाय काम्यकं राजा सह भ्रातृभिरच्युतः।। ३११-२**
**पुनर्द्वैतवनं रम्यमाजगाम युधिष्ठिरः।३**

"अशा प्रकारे द्रौपदीचे अपहरण (करण्याचा प्रयत्न) झाल्यावर अतिशय दुःखी होऊन धर्मावर अढळ श्रद्धा ठेवणारा राजा युधिष्ठिर काम्यकवन सोडून आपल्या बंधूंसह पुनः रमणीय द्वैतवनात चालला आला." यानंतर अज्ञातवास प्रारंभापावेतो पांडव येथेच राहिले. तो प्रारंभ आषाढ शुक्ल एकादशीला झाला हे वर पाहिलेच आहे. दरम्यानच्या काळात पुढील घटना झाल्या.

दुर्योधनाने वैष्णव यज्ञ केला. त्यावेळी पांडव द्वैतवनात होते, असा स्पष्ट उल्लेख आहे. दुःशासन दूतास म्हणतो-

**गच्छ द्वैतवनं शीघ्रं पांडवान् पापपूरुषान्**
**निमन्त्रय यथान्यायं विप्रांस्तस्मिन् वने तदा।। वनपर्व, २५६-८**

"शीघ्र द्वैतवनात जाऊन पापी पांडवांना आणि वनातील ब्राह्मणांना यथोचित निमंत्रण दे." हा वैष्णव यज्ञ राजसूय यज्ञासारखा दीर्घकाल चालणारा नसला, तरी प्रतिष्ठेने त्याच्या तोडीचा होता (२५५-१५, २०). याच सुमारास दुर्योधनाने क्रोधी दुर्वास ऋषीस प्रसन्न करून त्यांना पांडवांची सत्त्वपरीक्षा घेण्यास प्रवृत्त केले. ही घटना पांडवांच्या या तृतीय द्वैतवन निवासात घडली असावी असे संकेत आढळून येतात. एक दिवस पांडव रात्रिसमयी जेवण आटोपून आराम करत असता, दुर्वास अनेक शिष्यांसह अचानक त्यांचेकडे आले. युधिष्ठिराने त्यांचे स्वागत केले, व स्नानादि उरकून भोजनार्थ या असे म्हटले. तदनुसार दुर्वास आपल्या शिष्यांसह नदीवर स्नानास गेले. पण इकडे बिचाऱ्या द्रौपदीला अशा भलत्याच वेळी या जेवणाची व्यवस्था कशी करावी अशी फार चिंता होऊन, तिने श्रीकृष्णांचा आर्त धावा केला. श्रीकृष्णांच्या योगप्रभावाने दुर्वासादींना स्नान करीत असताच पोट भरल्यासारखे वाटून, ते भोजनासाठी पांडवांकडे परत न जाता परभारे तेथूनच निघून गेले.

या वेळची एक अन्य घटना. कर्णाला अवध्य करणारी त्याची जन्मजात

कवचकुंडले इंद्राने त्याच्याजवळून मागून नेली.

**द्वादशे समतिक्रांते वर्षे प्राप्ते त्रयोदशे**
**पांडूनाम् हितकृच्छक्रः कर्णं भिक्षितुमुद्यतः।। वनपर्व ३००-५**

" (वनवासाचे) बारावे वर्ष समाप्त होत तेरावे प्राप्त झाल्यावर पाण्डवांचे हित चाहणाऱ्या इन्द्राने कर्णाजवळ (त्याच्या जन्मजात कवचकुंडलांची) याचना केली." दातृत्वाच्या आपल्या नियमाचे पालन करून कर्णाने ती कवचकुंडले आपल्या शरीरापासून खेचून काढून इंद्रास देऊन टाकली. पण त्याच्या बदल्यात त्याने इंद्रापासून एक अमोघ 'शक्ती'- आयुध प्राप्त करून घेतले. मात्र त्याचा प्रयोग तो केवळ एकदाच करू शकणार होता.

या दिवसातील अंतिम प्रमुख घटना यक्षरूपी साक्षात धर्मदेवाने युधिष्ठिरास विचारलेल्या गहन तात्त्विक प्रश्नांची होय. त्याला आपल्या मार्मिक उत्तरांनी संतुष्ट केल्यावर युधिष्ठिराने यक्षास म्हटले-

**वर्षाणि द्वादशारण्ये त्रयोदशमुपस्थितम्**
**तत्र नो नाभिजानीयुर्वसतो मनुजाः क्वचित्।। वनपर्व, ३१४-१५**

"वनवासांत (आमची) बारा वर्षे होऊन तेरावे प्राप्त झाले आहे. (कृपया असा वर द्या की) त्यात (आम्ही अज्ञातवासी होणार असल्याने) आम्हाला कोणाही मानवाने ओळखू नये." धर्मदेवाने प्रसन्न होऊन म्हटले की, माझ्या कृपेने हे तेरावे वर्ष तुम्ही राजा विराटाच्या नगरात गुप्तपणे घालवाल (३१४-१८).

महाभारत कथावर्णनाची बारिकसारिक बाबतींतही सुसंगती पाहण्यासारखी आहे. पांडव पुन्हा तिसऱ्यांदा द्वैतवनात आल्यावर त्यांनी फक्त फलाहार प्रारंभ केला (३११-४). त्याचे कारण? द्वैतवनांतील यापूर्वीचा निवास समाप्त करताना युधिष्ठिराने तेथील वन्य पशूंना आणखी शिकार न करण्याचे आश्वासन दिले होते!

पांडव हिमालयावरून खाली उतरल्यानंतर ज्या विविध घटना झाल्या त्यांची वर्णने महाकवीने खुबीने मागेपुढे करून व परस्परांत मिसळवून दिल्याने, त्यातील एखादी घटना काम्यक वनातील आहे किंवा द्वैतवनांतील, आणि तेथेही द्वितीय अथवा तृतीय निवासाची, याविषयी कोठेकोठे भ्रम होतो. उदाहरणार्थ, तृतीय काम्यकनिवासाचे वर्णन सुरू केल्यावर मध्येच जनमजेयाच्या एखाद्या प्रश्नाच्या निमित्ताने वैशंपायनाचा कथाप्रवाह पुनः मागे द्वितीय द्वैतवननिवासातील काही घटनेने वळतो. तसेच तृतीय द्वैतवन निवासाचे कथन प्रारंभ केल्यावर मध्येच काम्यकाशी संबद्ध काही प्रसंगांचा उल्लेख येतो. मात्र त्याबरोबरच



समय व स्थल यांचे सूचक संकेतही ठेवले असून, त्यांच्या आधारे त्या घटनांचा एक सुसंगत क्रम मी संक्षेपाने येथे दिला आहे.

**अज्ञातवास वर्ष**

प्रकट वनवासानंतर अज्ञातवास सुरू झाला. येथे महाभारताचे वनपर्व संपून विराटपर्व सुरू होते. या कालावधीतील प्रथम विशेष घटना त्याच्या चतुर्थ मासातील ब्रह्मोत्सव होय; त्याची चर्चा वर केली आहे.

दुसरी विशेष घटना भीमद्वारा कीचकवधाची. त्या प्रसंगाची सुरुवात अशी होते-

**वसमानेषु पार्थेषु मत्स्यस्य नगरे तदा**
**महारथेषु छन्नेषु मासा दश समाययुः।। विराटपर्व १४-१**

"या प्रकारे महारथी पांडव मत्स्यराज्यातील (विराटाच्या) नगरी गुप्तपणे राहत असता दहा महिने निघून गेले." आणि त्यानंतर-

**तस्मिन्वर्षे गतप्राये कीचकस्तु महाबलः**
**सेनापतिर्विराटस्य ददर्श द्रुपदात्मजाम्।।१४-४**

"(अज्ञातवासाचे) ते वर्ष समाप्त होण्यास आले होते त्यावेळी विराटाचा सेनापती महाबलशाली कीचकाची (पापी) दृष्टि (सैरन्ध्रीरूपी) द्रौपदीवर गेली."

**भीमाने व द्रौपदीने तंतोतंत मोजलेले दिवस**

या परिस्थितीत उन्मत्त कीचकाने एक दिवस द्रौपदीचा घोर अपमान केला; आणि त्यामुळे ती रडत रडत भीमापाशी गेली. भीमाने तिला कीचकवधाचे आश्वासन देत म्हटले -

**मा दीर्घ क्षम कालं त्वं मासमर्धंच सम्मितम्**
**पूर्णे त्रयोदये वर्षे राज्ञां राज्ञी भविष्यसि।।२१-१७**

"आणखी थोडेच दिवस, मोजून केवळ अर्धा महिना, तू सहन कर. तेरावे वर्ष पूर्ण होताच तू (पुनः) राजांची (पाण्डवांची) राणी होशील." पाण्डवांच्या गणनेनुसार तेरावे वर्ष ज्येष्ठपूर्व द्वितीय अधिकमास वद्य सप्तमीला पूर्ण होऊन, वद्य अष्टमीला मुक्तिदिवस होता. त्याच्या अर्धा महिना पूर्वी हा द्रौपदी -भीम संवाद झाला होता. अर्थात या दिवशी त्या अधिक मासाची शुक्ल अष्टमी होती. या संवादाच्या दुसऱ्या दिवशी रात्री भीमाने कीचकवध केला; आणि त्यानंतर सकाळी विराटाच्या राणीने द्रौपदीचा कीचकवधाशी काही संबंध असावा अशा संशयावरून तिला निघून जाण्यास सांगितले; तेव्हा द्रौपदीने तिला अशी विनंती केली-

**त्रयोदशाहमात्रं मे राजा क्षाम्यतु भामिनि**
**कृतकृत्या भविष्यन्ति गन्धर्वास्ते न संशयः ।। २४-२९**

"राणी, मला राजाने आणखी केवळ तेरा दिवस माफ करावे (मला येथे राहू द्यावे); त्यानंतर (माझे पति) गन्धर्व निःसंदेह आपले कार्य पूर्ण करतील (व मला येथून नेतील)." हे दर्शविते की, आणखी तेरा दिवसांनी पांडव अज्ञातवासातून बाहेर पडणार होते. याच्याच दोन दिवस अगोदर भीमाने द्रौपदीस वरील आश्वासन दिले होते. उघडच त्यावेळी अज्ञातवाससमाप्तीला पंधरा दिवस शेष होते; व म्हणून भीमाने 'मासम् अर्धं' असे बरोबर म्हटले. भीमाने द्रौपदीस सांगितले की, तिने पुढल्याच दिवशींच्या रात्रिसमयी कीचकाशी एकान्तमीलनाची वेळ ठरवावी. त्या वेळी द्रौपदी ऐवजी स्वतः भीम तेथे जाऊन कीचकाचा वध करील अशी योजना होती. तदनुसार द्रौपदीने दुसरे दिवशी कीचकास म्हटले-

**यदेतन्नर्तनागारं मत्स्यराजेन कारितम्**
**दिवात्र कन्या नृत्यन्ति रात्रौ यान्ति यथागृहम् ।।२२-१६**
**तमिस्त्रे तत्र गच्छेथा गन्धर्वास्तन्न जानते ।।१७**

"हे जे मत्स्य राजाने नृत्यगृह बनविले आहे तेथे दिवसा कन्या नृत्याचा अभ्यास करून रात्री आपापल्या घरी जातात - १६. तेथे (आज रात्री) अंधाऱ्या प्रहरी जा म्हणजे (माझे पति) गंधर्वांना हे समजणार नाही." ही द्वितीय अधिकमासाची शुक्ल नवमी होती. येथे 'तमिस्त्रे'चा आशय रात्रीच्या अंधाऱ्या प्रहरी म्हणजे चंद्रास्तानंतर असा आहे. ती रात्र अंधारी म्हणजे वद्य पक्षाची होती असा आशय नव्हे. ती शुक्ल नवमी असल्याने मध्यरात्रीच्या सुमारास चंद्रास्त होणार होता. द्रौपदीने कीचकाला ती वेळ सांगून ते पुनः भीमालाही कळविले. तेव्हा भीम म्हणाला-

**अदृश्यमानस्तस्याथ तमस्विन्यामनिन्दिते**
**नागो बिल्वमिवाक्रम्य पोथयिष्यामहं शिरः**
**अलभ्यामिच्छतस्तत्य कीचकस्य दुरात्मनः ।।२२-३७**

"निर्दोष द्रौपदी, मी स्वतः त्याला अदृश्य राहीन; व तुजसमान अलभ्य स्त्रीची इच्छा करणाऱ्या त्या पापी कीचकावर हल्ला करून, हत्ती बेलफल सहज चिरडतो त्याप्रमाणे त्याचे मस्तक रात्रीच्या त्या अंधाऱ्या समयी (चन्द्रास्तानंतरच्या रात्रिप्रहारी) चिरडून टाकीन."

या योजनेप्रमाणे कीचक नृत्यालयात गेला तेव्हा चन्द्रास्त होऊन अंधार पसरला होता (२२-४०) त्यावेळी भीमाने त्याचा वध केला.



**अज्ञातवास समाप्ती व अभिमन्यु विवाह**

यानंतर येणाऱ्या वद्य अष्टमीस सूर्योदयावर अर्जुन अज्ञातवास समाप्त करून कौरवांसमोर प्रकट झाला; व त्याने त्यांचा पराभव करून विराटाच्या गायी सोडवून आणल्या.

तत्पश्चात तिसरे दिवशी द्रौपदीसह सर्व पांडव विराटाच्या दरबारात रीतसर प्रकट झाले. त्यांची ओळख पटल्यावर राजा विराटाने त्यांचा पूर्ण सन्मान करून, आपली कन्या उत्तरेचा अर्जुनपुत्र अभिमन्यूशी विवाह निश्चित केला. पांडवांनी विराट राज्यातील उपप्लव्य गावी आपला तात्पुरता मुक्काम उभारला. लवकरच द्वारकेहून अभिमन्यु, सुभद्रा, श्रीकृष्ण आदि आल्यानंतर मोठ्या उत्साहाने समारंभपूर्वक अभिमन्यु-उत्तरा विवाह साजरा झाला. त्याच्या समयाचे कालगणनात्मक महत्त्व वर प्रकरण 2 मध्ये दर्शविले आहे.

**वर्षतालिका**

| | | |
|---|---|---|
| ज्येष्ठ शुक्ल दशमी | - | पांडवांचे द्यूतासाठी इन्द्रप्रस्थाहून हस्तिनापुरी आगमन. |
| ज्येष्ठ शुक्ल एकादशी | - | द्यूत; अनुद्यूत; वनवास आरंभ. |
| ज्येष्ठ शुक्ल चतुर्दशी (मध्यरात्र) | - | काम्यक वनात प्रवेश; किर्मीर वध(प्रथम काम्यक निवास आरंभ) |
| ज्येष्ठ कृष्ण पक्ष | - | श्रीकृष्ण काम्यक वनात येऊन पांडवांस भेटतात; सुभद्रा, अभिमन्यु, द्रौपदी पुत्र, आदींना आपल्याबरोबर घेऊन जातात. |
| आषाढ | - | पांडव काम्यकांतून द्वैतवनात जातात. (प्रथम द्वैतवन निवास) |
| मार्गशीर्ष | - | पांडव द्वैतवनातून पुनःकाम्यकात जातात.(द्वितीय काम्यक निवास) |
| पौष ते ज्येष्ठ | - | अर्जुनाचे अस्त्रविद्याप्राप्ती हेतु इन्द्रलोकी जाण्यासाठी काम्यकातून प्रस्थान; हिमालयावर पोचून तेथे चार मास तप केल्यावर शिवदर्शन, त्यानंतर इन्द्रलोकी गमन. |

**वनवासाचे एक वर्ष पूर्ण**

| | | |
|---|---|---|
| आणखी चार वर्षे | - | अर्जुनाचा इंद्रलोकांत व शेष पांडवांचा काम्यकांत निवास. |

**वनवासाची पाच वर्षे पूर्ण**

| | | |
|---|---|---|
| ज्येष्ठ ते मार्गशीर्ष शुक्ल | - | उपरोक्त निवास चालू. |
| मार्गशीष कृष्ण तृतीया | - | युधिष्ठिरादि चार पांडवांचे तीर्थयात्रेवर काम्यकाहून प्रस्थान. |
| पौष समाप्ती | - | युधिष्ठिरादींची हिमालय यात्रा व गंधमादनावर कुबेरदर्शन; अर्जुनाची इन्द्रलोकी पाच वर्षे पूर्ण होऊन, तेथून परतून गंधमादनावर शेष पांडवांशी त्याचे पुनर्मीलन. |

**वनवासाची सहा वर्षे पूर्ण**

| | | |
|---|---|---|
| आणखी चार वर्षे | - | पांडवांचा गंधमादन पर्वतावर निवास. |

**वनवासाची दहा वर्षे पूर्ण**

| | | |
|---|---|---|
| ज्येष्ठ मध्य | - | पांडवांचे हिमालयावरून परत उतरणे आरंभ. |
| श्रावण मध्य | - | द्वैतवनाच्या विशाखायूपवनात प्रवेश (द्वितीय द्वैतवन निवास आरंभ). |
| श्रावण ते ज्येष्ठ | - | विशाखयूपवनात निवास. |

**वनवासाचे अकरावे वर्ष पूर्ण**

| | | |
|---|---|---|
| आषाढ ते भाद्रपद | - | विशाखयूपवनात निवास चालू. |
| भाद्रपद मध्य ते कार्तिक मध्य | - | द्वैतवनसरोवरावर निवास; यावेळी दुर्योधनाची घोषयात्रा. |
| कार्तिक कृष्णपक्ष ते माघ | - | द्वैतवनातून काम्यकवनात तृणबिंदु सरोवरावर निवास (तृतीय काम्यक निवास); या दरम्यान सत्यभामेसह श्रीकृष्णांची पांडवांस भेट दुर्योधनाच्या वैष्णव यज्ञासाठी कर्णाचा दिग्विजय; जयद्रथद्वारा द्रौपदीच्या अपहरणाचा प्रयास. |
| फाल्गुन ते आषाढ शुक्ल पक्ष | - | काम्यकातून पुनः द्वैतवनात (तृतीय द्वैतवन निवास); या दरम्यान दुर्योधनाचा वैष्णव यज्ञ; दुर्वास द्वारा पांडवांची सत्वपरीक्षा. |

**वनवासाचे बारावे वर्ष पूर्ण (स्थूल मानाने)**

| | | |
|---|---|---|
| ज्येष्ठ शुक्ल एकादशी ते आषाढ शुक्ल दशमी | - | पांडवांचा द्वैतवन निवास चालू. इन्द्रद्वारा कर्णाच्या कवच कुंडलांचे हरण; यक्षप्रश्न. |

**सूक्ष्म दिनगणनेने वनवासाचे बारावे सौर वर्ष पूर्ण**

| | | |
|---|---|---|
| आषाढ शुक्ल एकादशी | - | अज्ञातवास आरंभ. |
| आषाढ मध्य | - | पांडव विराटनगरी पोचून त्यांचा राजा विराटाच्या सेवेत गुप्त प्रवेश |
| आश्विन मध्य | - | ब्रह्मोत्सव, त्यात भीम - जीमूत मल्लयुद्ध. |
| वैशाख मध्य | - | अज्ञातवासाचे दहा महिने पूर्ण. |
| वैशाखोत्तर द्वितीय अधिकमास शुक्ल अष्टमी | - | कीचकद्वारा द्रौपदीचा घोर अपमान. |
| वैशाखोत्तर द्वितीय अधिकमास शुक्ल नवमी | - | कीचक वध. |
| वैशाखोत्तर द्वितीय अधिकमास शुक्लपक्ष समाप्ती | - | अज्ञातवासी पांडवांचा शोध न लागल्याने कौरवांना चिंता. सुशर्माच्या प्रस्तावावरून विराट राज्यावर दोन्ही दिशांनी हल्ला करण्याची योजना. |

वैशाखोत्तर द्वितीय अधिकमास

कृष्णपक्ष सप्तमी - सुशर्माचा विराटावर आग्नेय दिशेने हल्ला, त्याचा पराजय; पांडवांच्या अज्ञातवासाची शेवटची रात्र.

**पांडवांची (अधिकमास समय सहित) तेरा सौर वर्षे पूर्ण**

वैशाखोत्तर द्वितीय अधिकमास

कृष्ण अष्टमी - कौरवांचा विराट राज्यावर उत्तर दिशेकडून हल्ला; अर्जुन त्यांचे विरुद्ध सूर्योदय वेळी प्रकट होतो व कौरवांचा पराजय करतो.

वैशाखोत्तर द्वितीय अधिकमास

कृष्ण दशमी - विराटराजाच्या दरबारात पांडव द्रौपदीसह प्रकट होतात.

वैशाखोत्तर द्वितीय अधिकमास

कृष्ण पक्ष उत्तरार्ध - पांडव विराटनगराहून उपप्लव्यास जातात.

ज्येष्ठ शुक्ल दशमी - दुर्योधनाच्या गणनेनुसार तेराव्या वर्षाचा (अज्ञातवासाचा) अंतिम दिवस.

ज्येष्ठ मध्य - द्वारकेहून सुभद्रा, अभिमन्यु, श्रीकृष्ण आदि उपप्लव्यास येतात. उत्तरा-अभिमन्यु विवाह.

❒





*महायुद्धाची कालगणनात्मक कूटे*

प्रकरण ५

# श्रीकृष्णांची शांतिवार्ता

**श्रीकृष्णांची प्रवासास संमती**

महाभारतात विराटपर्वानंतर उद्योगपर्व येते; त्यात श्रीकृष्णांनी पांडवांच्या विनंतीवरून कौरवांशी अंतिम शांतिवार्ता करण्यासाठी उपप्लव्याहून हस्तिनापुरला केलेल्या प्रवासाचे वर्णन आहे. त्यातही महाकवीने कूटे केली आहेत. प्रवास किती दिवस झाला? श्रीकृष्ण हस्तिनापुरला कोणत्या दिवशी पोचले? शांतिवार्ता कोणत्या दिवशी झाली? श्रीकृष्ण हस्तिनापुरहून कोणत्या दिवशी परतले? आणि परत उपप्लव्यास पांडवांजवळ केव्हा पोचले?

अज्ञातवाससमाप्तीनंतर पांडव विराटराज्यातील उपप्लव्य नगरास जाऊन राहिल्यावर पांडवांनी आपले इन्द्रप्रस्थाचे राज्य परत मागितले, पण दुर्योधनाने नकार दिल्याने उभय पक्षांकडून युद्धाची तयारी होऊ लागली. मध्यंतरी वर्षाऋतु व शरदाचाही बराच भाग निघून गेला. या काळात पुढील घटना झाल्या. द्रुपदाचा पुरोहित पाण्डवांतर्फे संदेश घेऊन हस्तिनापुरला कौरवांकडे गेला;* व तेथून रिकाम्या हाताने परत आला. उभय पक्षांनी सैनिक सहायता एकत्र करणे चालू ठेवले. अर्जुन आगामी युद्धात श्रीकृष्णांचे साह्य मागण्यासाठी द्वारकेस पोचला. आणि त्याच वेळी दुर्योधनही तशाच उद्देशाने द्वारकेस पोचला. तेथून दुर्योधन हस्तिनापुरला, आणि अर्जुन श्रीकृष्णासह उपप्लव्यास परत आला. यानंतर धृतराष्ट्राने स्वकुलयुद्ध टाळण्याची सूचना करण्यासाठी संजयास पाण्डवांकडे पाठविले. पण त्याच्यापाशी न्यायोचित संधिस्वरूप काही प्रस्ताव नसल्याने त्याला तसेच परतावे लागले. यानंतर पांडवांनी केवळ पाच गावांवर

* पुरोहिताने पुष्य नक्षत्रावर प्रयाण केले होते (उद्योगपर्व ६-१७). माझ्या एकूण कालगणनेप्रमाणे हा (अमावास्यान्त) श्रावणाच्या वद्य पक्षाचा उत्तरार्ध असावा. पुरोहित हस्तिनापुरला पोचला तेव्हा दुर्योधन अर्थातच तेथे उपस्थित होता (२१-८). त्यानंतर दुर्योधन श्रीकृष्णांकडे द्वारकेस गेला.

संतुष्ट राहण्याची तयारी दर्शवून आपल्यातर्फे अंतिम शांतिवार्ता करण्यासाठी श्रीकृष्णांना कौरवांकडे जाण्याची विनंती केली. श्रीकृष्णांनी ती मान्य करीत म्हटले-

**श्वोभूते धृतराष्ट्रस्य समीपं प्राप्य पाण्डव**
**यतिष्ये प्रशमं कर्तुं युष्मदर्थमहापयन्।।७७-१५**

"पाण्डुनंदना (युधिष्ठिरा), उद्याच्या दिवशी मी धृतराष्ट्राकडे जाऊन तुमच्या हितांना बाधा न येऊ देता शांतिपूर्ण सलोखा करण्याचा प्रयत्न करीन." येथे प्रथमदर्शनी असा भ्रम होतो की या आश्वासनाच्या दुसऱ्याच दिवशी श्रीकृष्ण हस्तिनापुरास पोचून शांतिवार्ता करणार होते. दुसरे दिवशी प्रातःकाळी त्यांनी उपप्लव्याहून प्रयाण केले हे खरे (८३-६ खाली उद्धृत). पण महाभारतात हेही सांगितले आहे की त्यांनी हस्तिनापुरच्या निकट वृकस्थल गावी पोचल्यावर तेथे एक रात्र मुक्काम केला, आणि त्याच्या दुसरे दिवशी सकाळी हस्तिनापुरात प्रवेश केला. तेथे गेल्यावर त्यांनी प्रथम धृतराष्ट्रादिकांशी शिष्टाचाराच्या भेटी केल्या आणि रात्रीसहित शेष सारा दिवस विदुराच्या घरी घालवला. त्यानंतरच्या दिवशी शांतिवार्ता झाली, जी एकाच बैठकीत भंग झाली.

यावरून हे स्पष्ट आहे की, श्रीकृष्णांना उपप्लव्याहून हस्तिनापुरी पोचण्यास कितीही समय लागला असला (ज्याची चर्चा पुढे केली आहे), तरी त्यांनी पांडवांची विनंती स्वीकारण्याच्या शब्दशः दुसऱ्या दिवशी ('श्वोभूते') शांतिवार्ता केली नाही. श्रीकृष्णांनी हस्तिनापुरी पोचल्यावर धृतराष्ट्राला औपचारिक भेट दिली, त्यातच शांतिवार्तेचे सूतोवाच मानले तरीही वृकस्थळी घालविलेली रात्र उरतेच.

यासाठी, श्रीकृष्णांच्या 'श्वोभूते' शब्दांचा आशय इतकाच की, दुसरा दिवस उजाडताच ते उपप्लव्यापासून प्रवास प्रारंभ करणार होते; आणि यथाकाल हस्तिनापुरी पोचून धृतराष्ट्राच्या उपस्थितीत शांतिवार्ता करणार होते.

**उपप्लव्याहून प्रस्थानाची तिथी**

याप्रमाणे श्रीकृष्ण दुसरे दिवशी सूर्योदयावर उपप्लव्याहून निघाले. ती वेळ महाभारतकार अशी दर्शवितात -

**ततो व्यपेततमसि सूर्ये विमलवद्गते**
**मैत्रे मुहूर्ते सम्प्राप्ते मृद्वर्चिषि दिवाकरे।। उद्योगपर्व ८३-६**
**कौमुदे मासि रेवत्यां शरदन्ते हिमागमे। ...७**



"त्यानंतर रात्रीचा अंधार नाहीसा होऊन स्वच्छ आकाशात सूर्याचा उदय झाल्यावर त्याची कोमल किरणे पसरली. त्यावेळी मैत्र मुहूर्तावर, कार्तिक मासांत चंद्र रेवती नक्षत्रात असताना, व शरद ऋतु समाप्त होण्याच्या बेतात असून हेमन्ताचा प्रारंभ होणार असताना" (श्रीकृष्णांनी आपला प्रवास प्रारंभ केला). येथे 'कौमुद'चा अर्थ सर्वांनी कार्तिक असा केला आहे.

या दिवशी चंद्र रेवती नक्षत्रात होता. कोणत्याही महिन्यात पौर्णिमेस चन्द्र त्या महिन्याच्या नावांशी संबद्ध नक्षत्रात किंवा त्याचा जवळपास असतो. म्हणून कार्तिक मासात पौर्णिमेस चन्द्र कृत्तिकेत किंवा थोडा मागे (भरणीत अगर अश्विनीत) अथवा पुढे (रोहिणीत अथवा मृगात) असेल. पण या दिवसांतली एकदंर ग्रहस्थिती विचारात घेता (प्रकरण १५ मध्ये दाखविल्याप्रमाणे) या कार्तिक पौर्णिमेला चन्द्र अश्विनीत मानणे सुसंगत होईल. आणि त्या आधारे एक दिवस पूर्वी शुक्ल चतुर्दशीला चन्द्र रेवतीत असू शकत होता. त्या तिथीला श्रीकृष्णांनी उपप्लव्याहून प्रयाण केले. यात एकाद्या दिवसाचा बदल सुचविणे शक्य आहे.

महाभारतकारांनी हा समय शरद ऋतूच्या समाप्तीचा म्हटला आहे. या वेळी कार्तिक शुक्ल पक्ष चालू असून त्याचा वद्य पक्ष अद्याप शेष होता. पण प्रकरण २ मध्ये दाखविल्याप्रमाणे हा महिना अमावास्यान्त मानूनही कार्तिक शुक्ल पक्षाच्या समाप्तीला शरद ऋतुचा अन्त व हेमंताचे आगमन म्हणता येते.

**वृकस्थलापावेतोचा प्रवास**

श्रीकृष्ण वृकस्थली केव्हा पोचले? सर्वसाधारण कल्पना अशी आहे की, ते उपप्लव्याहून निघाले त्याच दिवशी सायंकाळी वृकस्थलास पोचले. पण येथे महाकवीची खुबी आहे की, श्रीकृष्ण वृकस्थली पोचण्याचा उल्लेख ते अशा प्रकारे करतात -

**वृकस्थलं समासाद्य केशवः परवीरहः**
**प्रकीर्णरश्मावादित्ये व्योम्नि वै लोहितायति।।उद्योग पर्व ८४-२०**
**अवतीर्य रथात् तूर्णं कृत्वा शौचं यथाविधि**
**रथमोचनमादिश्य संध्यामुपविवेश ह ।।२१**

" सूर्यकिरण अस्तव्यस्त होत असतां व (पश्चिम) आकाश लालिमायुक्त झाले असतां, वृकस्थली पोचून परमवीर श्रीकृष्णांनी शीघ्र रथातून उतरून (सेवकांना) रथ खोलण्याचा आदेश दिला, व स्नानादि कर्म उरकून ते संध्योपासनेस बसले." पण यात इतकेच म्हटले आहे की, श्रीकृष्ण वृकस्थली पोचले त्यावेळी सायंकाळ होत होती. श्रीकृष्ण उपप्लव्याहून निघाले त्याच दिवसाची ती

सायंकाळ होती असे म्हटलेले नाही ! खरे म्हणजे हा प्रवास काही दिवस चालला होता; महाभारतकारांनी याचे पुढील संकेत ठेवले आहेत.

या प्रवासात श्रीकृष्ण अनेक नगरांतून व राज्यांतून गेले आणि मार्गात शेकडो लोकांनी त्यांची भक्तिपूर्वक पूजाअर्चा केली. (84-13,14)

**पश्यन् बहुपशून् ग्रामान् रम्यान् हृदयतोषणान्**
**पुराणि च व्यक्तिक्रामन् राष्ट्राणि विविधानि च।।८४-१६**
**उपप्लव्यादथायान्तं जनाः पुरनिवासिनः**
**पथ्यतिष्ठन्त सहिता विश्वक्सेनादिदृक्षया।।१८**
**ते तु सर्वे समायान्तमग्निद्धमिव प्रभुम्**
**अर्चयामासुरर्चार्हं देशातिथिमुपस्थितम्।।१९**

"(श्रीकृष्णांनी) अनेक रमणीय, आनंददायक, विपुल गोधनाने समृद्ध गावे पाहिली, आणि विविध नगरांतून व राज्यांतून होत ते गेले-१६. नगरवासी जन उपप्लव्याहून येणाऱ्या श्रीकृष्णांच्या दर्शनार्थ मार्गाच्या बाजूने झुंडी करून उभे होते-१८. आपल्या देशात अतिथीरूपाने आलेले, ज्वलंत अग्नीसमान तेजस्वी, पूज्य भगवान श्रीकृष्ण समीप पोचल्यावर त्या सर्वांनी त्यांची सादर पूजा केली-१९".

या प्रवासाची योजना ठरल्यावर दुसरेच दिवशी प्रातःकाळी श्रीकृष्ण उपप्लव्याहून निघाले होतेः मग वाटेतील ठिकठिकाणच्या जनतेला त्यांच्या या शुभागमनाची वार्ता प्राप्त होऊन लोक सत्कारसामग्रीसह विशाल संख्येने श्रीकृष्णांच्या दर्शनार्थ कसे एकत्रित होऊ शकले? जर वृकस्थलापावेतोचा सारा प्रवास एकाच दिवसात संपला असता, तर त्या मार्गावर हे कसे संभव होते? पण तो प्रवास एकाहून अधिक दिवस चालला, व यामुळे त्या मार्गे श्रीकृष्णांच्या प्रवासाची शुभ पुर्वसूचना पसरू शकली.

याचा आणखीही एक संकेत पाहा. धृतराष्ट्राच्या आदेशाने दुर्योधनानेही मार्गात श्रीकृष्णांच्या स्वागतार्थ भलीमोठी व्यवस्था करून ठेवली. (श्रीकृष्णांनी तिचा लाभ घेतला नाही ही गोष्ट वेगळी.) "त्या वेळी त्यांची (भीष्म आदींची) (धृतराष्ट्राला) सहमति पाहून दुर्योधनाने (श्रीकृष्णांच्या प्रवासमार्गात) रमणीय विश्रांतिगृहे उभारण्याचे आदेश दिले-१२. तदनुसार अनेक रमणीय स्थानी सर्व प्रकारच्या रत्नांनी सुशोभित भिन्न भिन्न सभागृहांची रचना केली गेली -१३. राजा दुर्योधनाने तेथे श्रेष्ठ खाद्यपेये, भोजनांचे तऱ्हेतऱ्हेचे पदार्थ, सुवासिक पुष्पमाला, आदींची व्यवस्था करून दिली-१५. त्यातही विशेष रूपाने वृकस्थल गावी कौरवाधिपतीने एक बहुरत्नसंपन्न मनोरम सभागृह उभारून दिले-१६"



प्रवासास संमती दिल्यावर प्रातःकाळीच श्रीकृष्णांनी प्रवासास प्रारंभ केला होता. अशा स्थितीत वृकस्थळापावेतोचा मार्ग जर एकाच दिवसात पार केला असता, तर वाटेत अनेक स्थानी ही सारी व्यवस्था करण्यास वेळ कसा मिळाला असता? श्रीकृष्णांच्या या प्रवासाची अग्रिम सूचना पांडवांनी शीघ्रगामी दूतांच्याद्वारे हस्तिनापुरी ताबडतोब पाठविली असेल, आणि सम्राट दुर्योधनाने आपल्या असंख्य सेवकांकडून स्वागताची ही व्यवस्था तातडीने केली असेल; तरीही हे केवळ काही तासात होणे संभव नव्हते.

या अशा संदर्भात महाकवी संदिग्धपणे म्हणतात की, श्रीकृष्ण वृकस्थली सायंकाळी पोचले. पण ती सायं प्रवासारंभाच्या दिवसाची होती असे म्हणत नाहीत.

**श्रीकृष्णांचा हस्तिनापुरात कार्यक्रम**

वृकस्थली पोचण्यापासूनचा श्रीकृष्णांचा कार्यक्रम महाभारतात तपशीलवार दिला आहे. श्रीकृष्ण तेथे एकच रात्र थांबले; हे धृतराष्ट्राच्या वचनावरून स्पष्ट आहे.

**उपप्लव्यादिह क्षत्तरुपायातो जनार्दनः**
**वृकस्थले निवसति स च प्रातरिहैष्यति।।उद्योगपर्व,८६-१**

"विदुरा, उपप्लव्याहून निघालेले आणि आता जवळ येऊन पोचलेले श्रीकृष्ण (यावेळी) वृकस्थली थांबले आहेत. ते (उद्या) प्रातःकाळी येथे येतील." याचप्रमाणे वैशंपायन जनमेजयास म्हणतात-

**प्रातरुत्थाय कृष्णस्तु कृतवान् सर्वमान्हिकम्।**
**ब्राह्मणैरभ्यनुज्ञातः प्रययौ नगरं प्रति।।८९-१**

"प्रातःकाळी उठून श्रीकृष्णांनी सर्व आन्हिक कर्म उरकले आणि ब्राह्मणांचा आशीर्वाद घेऊन (हस्तिनापूर) नगरास गेले."

हस्तिनापुरास पोचल्यावर श्रीकृष्णांनी धृतराष्ट्रादीशी औपचारिक कुशलवार्ता केल्या. त्यानंतर त्यांनी विदुराचे घरी (दुपारचे) जेवण केले ८९-२३), आणि तिसऱ्या प्रहरी ते कुंतीस भेटले (९०-१); तेथून ते दुर्योधनाच्या महाली गेले. तेथे रात्रि-भोजनाचे आमंत्रण नाकारून (९१-१२) श्रीकृष्ण परत विदुराकडे आले (९१-३४). तेथे भोजन करून रात्री उभयतात दीर्घ वार्तालाप झाला. (९४-१). दुसरे दिवशी शांतिवार्ता झाली-

**कृतोदकानुजप्यः स हुताग्निः समलंकृतः।**
**ततश्चादिमुद्यन्तमुपातिष्ठत माधवः।।९४-६**
**अथ दुर्योधनः कृष्णं शकुनिश्चापि सौबलः**

**सन्ध्यां तिष्ठंतमभ्येत्य दाशार्हमपराजितम्।।७**
**आचक्षेतां तु कृष्णस्य धृतराष्ट्रं सभागताम्।**
**कुरूंश्च भीष्मप्रमुखान् राज्ञः सर्वांश्च पार्थिवान्।।८**

"संध्यातर्पण, जप व अग्निहोत्र करून श्रीकृष्णांनी अलंकृत होऊन उदयोन्मुख सूर्याची उपासना केली. अपराजेय श्रीकृष्ण संध्या करीत असता यावेळी दुर्योधन व शकुनि यांनी येऊन विनंती केली की, धृतराष्ट्र आणि कुरुकुलाचे भीष्मादि अन्य प्रमुख आणि इतरही सर्व राजे सभागृहात उपस्थित झाले आहेत" (आणि आपल्या आगमनाची प्रतीक्षा करीत आहेत.)

**शांतिवार्तेची तिथी**

दुर्योधनाच्या दुराग्रहामुळे शांतिवार्ता एकाच बैठकीत भंग पावली. महाभारतातील तिच्या समग्र वर्णनात बैठक दुसऱ्या दिवसावर लांबविल्याचा कोठेही संकेत नाही. दुर्योधनाची श्रीकृष्णास कैद करण्याचीही योजना झाली होती; पण आपले योगसामर्थ्य दाखवून ते तत्काळ सभेतून बाहेर आले आणि कुंतीचा निरोप घेऊन तसेच हस्तिनापुराहून परत निघाले. (१३७-३०). नगराच्या सीमेपावेतो येता येता त्यांनी एकट्या कर्णाशी बोलणे करून, त्याला तू वस्तुतः कुंतीचा (विवाहपूर्व) पुत्र असल्याने पांडव पक्षास येऊन मिळण्याची सूचना केली. पण कर्णाने दुर्योधनाचा पक्ष सोडणे अमान्य केले. यावर श्रीकृष्णांनी तेथेच कर्णाजवळ घोषित केले की,'सप्तमात् दिवसात्' (सातव्या दिवसानंतर) अमावास्या येत असून त्या तिथीला युद्ध प्रारंभ करावे (१४२-१८,पुढील प्रकरणात उद्धृत).

श्रीकृष्ण याप्रमाणे कर्णाला युद्धारंभ तिथी घोषित करीत होते (आणि त्याच्या थोडेच पूर्वी शांतिवार्ता झाली होती) त्या या दिवशी कोणती तिथि होती? 'सप्तमात् दिवसात्' या शब्दांत पंचमी विभक्ति असल्याने ती पुढील अमावास्या सातव्या दिवशी नसून सातव्या 'दिवसानंतर' आठव्या दिवशी होती. (याउलट, प्रकरण २ मध्ये दाखविल्याप्रमाणे 'पंचमे पंचमे वर्षे' यात पंचमी विभक्ति असल्याने तेथे पाचव्या वर्षी, वाचव्या वर्षात, असा आशय आहे.) यानंतर असे की, हा वद्य पक्ष फार अपवादात्मक असा तेरा दिवसांचा असल्याने (भीष्मपर्व २-३२, पुढे उद्धृत) यात दोन तिथिलोप होते. ते दोन्ही लोप एकमेकांजवळ असणे असंभव असल्याने एक लोप पक्षाच्या पूर्वार्धात व दुसरा उत्तरार्धात मानणे उचित आहे. तो दुसरा लोप अमावास्येचा नव्हता; कारण तिचा स्पष्ट उल्लेख उद्योगपर्व श्लोक १४२-१८, व शिवाय नंतर भीष्म



पर्व ३-३२ मध्येही आला आहे. आणि तो लोप चतुर्दशीचाही नव्हता; तिचा उल्लेख भीष्मपर्व ३-३३ (प्रकरण १३त उद्धृत) मध्ये आला आहे. याप्रमाणे शांतिवार्तेच्या या दिवसाची तिथी वद्य सप्तमी ठरते. तेथून गणना करीत, अष्टमीला दुसरा दिवस येतो व नंतर मध्ये एक तिथिलोप ठेवून चतुर्दशीला सातवा आणि अमावास्येला क्रमाने आठवा दिवस येतो.

शांतिवार्तेच्या या दिवशी चन्द्र पुष्य नक्षत्रात होता, हे या दिवशीच्या विविध महत्त्वपूर्ण घटनांच्या संबंधात महाभारतात अनेक ठिकाणी सांगितले आहे (उद्योग पर्व १५०-३; शल्य पर्व ३४-६, ३५-१०, ३५-१५, ३५-१६). हे उल्लेख पुढे संबंधित स्थळी उद्धृत केले आहेत,

जर अनेक लेखक समजतात त्याप्रमाणे श्रीकृष्ण वृकस्थलास प्रवासाच्या पहिल्याच दिवशी (आणि हस्तिनापुरास दुसऱ्या दिवशी) पोचले असे मानले, तर मध्यंतरी उपरोक्त वद्य सप्तमीपावेतो गेलेल्या शेष चार पाच दिवसांचा हिशेब कसा लावावयाचा? मग या लेखकांना असे सुचविणे भाग पडते की, श्रीकृष्ण हस्तिनापुरी पोचल्यावर चार पाच दिवसानंतर शांतिवार्ता झाली, अथवा शांतिवार्ता काही दिवस चालली, अथवा शांतिवार्ता भंग झाल्यावरही श्रीकृष्ण हस्तिनापुरात काही दिवस रेंगाळत राहिले.✱ परंतु अशा कल्पनांना महाभारतात काहीही आधार नाही.

**उपप्लव्यास परत पोचणे**

श्रीकृष्ण उपप्लव्यास परत केव्हा पोचले? हस्तिनापुरला जाताना त्यांचा प्रवास आरामाने काही दिवस चालला. पण परत जाताना तो एका दिवसातच संपला. हे कां व कसे झाले?

यावेळी अंतिम शांतिवार्ता विफल होऊन युद्ध अगदी अटळ झाले होते. उभय पक्षांची सैन्ये जय्यत तयार होती. युद्धारंभ तिथि निश्चित होऊन ती केवळ सात दिवस अंतरावर होती. एक एक क्षण महत्त्वाचा होता आणि

✱ उदाहरणार्थ पाहा K.S. Raghavan (पूर्व उल्लेखित); देवकीनंदन खेडवाल,'भारतीय कालगणना' (हिंदी, पृ.१२८); चिं.वि. वैद्य, 'महाभारताचा उपसंहार', पृ. १३३. बाळशास्त्री हरदास श्रीकृष्णांचा प्रवासारंभ कार्तिक शुक्ल द्वादशीला मानून म्हणतात की, एकाच दिवसात श्रीकृष्ण वृकस्थलास पोचून तेथे एक रात्र राहिले, दुसरी रात्र त्यांनी हस्तिनापुरात विदुराचे घरी घालवून नंतर सकाळी शांतिवार्ता होऊन भंग झाली, व श्रीकृष्ण तत्काळ तेथून परतले, आणि हस्तिनापुर सोडता सोडता त्यांनी कर्णाजवळ युद्धारंभार्थ सातव्या दिवसानंतर येणारी अमावस्या घोषित केली. ('भगवान श्रीकृष्ण', पृ.३८९-४२३). पण या क्रमाने शांतिवार्तेच्या दिवशी पुढील अमावास्या सातव्या दिवसानंतर कशी येईल?

त्यातही विशेष म्हणजे त्या दिवशी (वद्य सप्तमीला) पुष्य नक्षत्र योग असून पांडवांनी उपप्लव्याहून त्याच दिवशी कुरुक्षेत्राकडे प्रस्थान करावे अशी श्रीकृष्णांची इच्छा होती (शल्य पर्व ३५-१०, पुढे उद्‌धृत). यासाठी श्रीकृष्णांनी शक्य तितक्या लवकर उपप्लव्यास पोचून पांडवांना शांतिवार्तेचा वृत्तांत सांगणे आवश्यक होते.

श्रीकृष्णांचा हा परतीचा प्रवास महाकवि या प्रकारे वर्णन करतात-

**विसर्जयित्वा राधेयं सर्वयादवनंदनः**
**ततो जवेन महता तूर्णमश्वानचोदयत्।।उद्योगपर्व १३७-३०**
**ते पिबन्त इवाकाशं दारुकेण प्रचोदिताः**
**ह्या जगन्मुर्महावेगा मनोमारुतरंहसः।।३१**

"कर्णाला निरोप देऊन श्रीकृष्णांनी तत्काळ आपल्या रथाचे घोडे मोठ्या वेगाने हाकविले-३०. दारुकाने हाकलेले ते महावेगवान अश्व जणू आकाशच पार करीत वायूच्या वा मनाच्या वेगाने धावू लागले." आणि तरीही श्रीकृष्ण अधीर होऊन वारंवार दारुकाला आणखी शीघ्र चल असे म्हणत राहिले (१४३-५२). या शिवाय महाकवीने हेही सांगितले आहे की, श्रीकृष्णांनी यावेळी लांबचा राजमार्ग सोडून एक जवळचा मार्ग स्वीकारला.

**ते व्यतीत्य महाध्वानं क्षिप्रं श्येना इवाशुगाः**
**उच्चैर्जग्मुरुपप्लव्यं शाङ्‌र्गधन्वानमावहन्।।उद्योगपर्व १३७-३२**

"(लांबचा) राजमार्ग सोडून (जवळच्या वाटेने) जणू ससाण्याच्या वेगाने धावणारे ते अश्व श्रीकृष्णांना घेऊन अतिशीघ्र उपप्लव्यास पोचले." या प्रवासात श्रीकृष्ण कोणास दर्शन देण्यासाठी, किंवा विश्रांति घेण्यासाठी, कोठेही थांबले नाहीत; आणि अखेरीस त्याचदिवशी संध्याकाळच्या सुमारास ते उपप्लव्यास पोचले.

**पांडवांशी मसलत**

उपप्लव्यास पोचताच श्रीकृष्णांनी पांडवादिकांना प्रथम शांतिवार्तेचा स्थूल वृत्तांत कथन केला (१४७-१). त्यावर काही विचार विनिमय होऊन ते विश्रांती घ्यावयास गेले (१४७-२). तत्पश्चात सूर्यास्तानंतर पांडवांची श्रीकृष्णांशी वेगळी गुप्त चर्चा झाली.

**विसृज्य सर्वान् नृपतीन् विराटप्रमुखांस्तदा**
**पाण्डवाः भ्रातरः पञ्च भानावस्तं गते सति।।१४७-३**
**संध्यामुपास्य ध्यायन्तस्तमेव गतमानसाः**
**आनाय्य कृष्णं दाशार्हं पुनर्मन्त्रममन्त्रयन्।।४**



"यानंतर पांचही पांडव बंधूंनी विराटादि सर्व राजांना (आपापल्या शिबिरांकडे) परत पाठविले; आणि सूर्यास्तपश्चात संध्योपासना करून श्रीकृष्णांचे ध्यान करीत त्यांचे ठायी चित्त लावून त्यांनी श्रीकृष्णांना आमंत्रित केले व त्यांचाशी गुप्त चर्चा प्रारंभ केली."

हे दुसरे खलबत सूर्यास्तानंतर झाल्याच्या उल्लेखावरून दिसून येते की पहिल्या स्थूल वृत्तांताची (व अर्थातच श्रीकृष्ण उपप्लव्यास पोचण्याची) वेळ सूर्यास्तपूर्व सायंकाळच्या सुमाराची होती. या गुप्त बैठकीत केवळ पांडव व श्रीकृष्ण असून, यावेळी श्रीकृष्णांनी हस्तिनापुरच्या घटनांचा विस्तृत वृत्तांत दिला. त्याबरोबर त्यांनी हेही सांगितले की, दुर्योधनाने (कर्णाकडून श्रीकृष्णांची युद्धारंभतिथिविषयक घोषणा ऐकल्यावर) आजच पुष्य नक्षत्र योगावर आपल्या सैन्याला कूच करण्याचा आदेश दिला आहे.

**आज्ञापयश्च राज्ञस्तान् पार्थिवान्नष्टतेतसः**
**प्रयार्ध्वं वै कुरुक्षेत्रं पुष्योद्येति पुनः पुनः।।१५०-३**
**ततस्ते पृथिवीपालाः प्रययुः सहसैनिकाः**
**भीष्मं सेनापतिं कृत्वा संहृष्टा कालचोदिताः।।४**
**निर्याताश्च विनाशाय कुरुक्षेत्रं नराधिपाः।१९**

"दुर्योधनाने वारंवार त्या नष्टबुद्धि राजांना आदेश दिला आहे की, आज (चन्द्राचा) पुष्य नक्षत्र (योग) आहे, म्हणून कुरुक्षेत्राकडे प्रस्थान करा-३ तदनुसार कालप्रेरित राजे भीष्मांना सेनापति (करण्याचा निश्चय) करून सैनिकांसह (हस्तिनापुराहून) निघाले आहेत-४. त्या राजांनी स्वविनाशार्थ कुरुक्षेत्राकडे प्रस्थान केले आहे-१९." दुर्योधनाने आपल्या सैन्यास हे आदेश दिले व त्याच्या सैन्याने हस्तिनापुराहून कूच केले, त्यापूर्वी श्रीकृष्णांनी हस्तिनापुर सोडले होते (१५३-८). परंतु युद्धारंभ दिवस निकट होता; एकेक दिवस महत्त्वाचा होता; म्हणून हस्तिनापुरात काय होत आहे हे श्रीकृष्ण आपल्या योगमायेने जाणून घेत असले पाहिजे.

याच पुष्य नक्षत्र दिवशी पांडवांनीही आपल्या सैन्यासह कुरुक्षेत्राकडे कूच करावे अशी श्रीकृष्णांची इच्छा होती, म्हणून ते म्हणाले-

**न कुर्वन्ति वचो मह्यं कुरवः कालनोदिताः**
**निर्गच्छध्वं पांडवेयाः पुष्येण सहिता मया।। शल्य पर्व ३५-१०**

"कालप्रेरित कौरवांनी माझा सल्ला अमान्य केला आहे. पांडवांनो, माझ्यासह या पुष्य नक्षत्राच्या दिवशी तुम्ही (कुरुक्षेत्राकडे) प्रस्थान करा." श्रीकृष्णांचा आदेश पांडव कसा अमान्य करणार?

या दुसऱ्या बैठकीत पांडवांनी धृष्टद्युम्नास प्रमुख सेनापति करून सहा उपसेनापतीही नेमले. अध्याय १५१ मध्ये धृष्टद्युम्नाची निवड सांगितली असून, पुढे अध्याय १५७ मध्ये त्याच्या व उपसेनापतींच्या अभिषेकांचे वर्णन आहे. अध्याय १५१ वरून असा भ्रम होतो की, धृष्टद्युम्नाची प्रमुख सेनापती म्हणून निवड होताच पांडवांनी उपप्लव्याहून प्रयाण केले. पण त्या प्रयाणापूर्वी वरील अभिषेक झाले, आणि बलराम व रुक्मी यांच्या भेटीही झाल्या, असे एकूण वर्णनावरून दिसते.

**बलरामयात्राप्रारंभ**

कौरवपांडव विवादात बलरामांनी श्रीकृष्णांच्या दृष्टिकोणाशी आपला मतभेद अभिमन्युविवाहानंतर विराटनगरातील सभेत व्यक्त केला होता (उद्योग पर्व अध्याय २). त्यानंतर दुर्योधन श्रीकृष्णांचे साह्य मागण्यास द्वारकेस गेला, त्यावेळी बलरामांनी तो पुनः व्यक्त केला (उद्योगपर्व ७-२६ते३०). परंतु तोपावेतो अंधुक का होईना, शांतीची आशा शिल्लक होती. आणि बलराम एकंदर परिस्थितीवर बारकाईने लक्ष ठेवून होते असे दिसते. परंतु जेव्हा श्रीकृष्णांची अंतिम शांतिवार्ता असफल होऊन युद्धारंभ तिथि निश्चित झाली, तेव्हा बलराम तत्काळ पांडवांस व विशेषतः श्रीकृष्णांना उपप्लव्यास त्याच रात्री भेटले.

**तद् दृष्टोपस्थितं युद्धं समासन्नं महात्ययम्।।उद्योगपर्व १५७-१६**
**प्राविशद् भवनं राजन् पाण्डवानां हलायुधः।...१७**

"राजा जनमेजया, ते महाविनाशकारी युद्ध अगदी निकट आलेले पाहून हलधर बलराम पांडवांच्या निवासस्थानी आले." त्यांनी कौरवपांडवांच्या त्या स्वजनयुद्धापासून पूर्ण अलग राहण्यासाठी श्रीकृष्णांना प्रवृत्त करण्याचा प्रयास केला; पण श्रीकृष्णांनी त्या युद्धात स्वतः न लढता केवळ अर्जुनाचे सारथ्य करणे मान्य केले होते; व तें सोडण्यास ते तयार नव्हते. यावर दुःखी मनाने बलराम म्हणाले-

**तस्माद् यास्यामि तिर्थानि सरस्वत्या निषेवितुम्**
**न हि शक्ष्यामि कौरव्यान् नश्यमानानुपेक्षितुम्।।१५७-३४**
**एवमुक्त्वा महाबाहुरनुज्ञातश्च पाण्डवैः**
**तीर्थयात्रां ययौ रामो निर्वर्त्य मधुसुदनम्।।३५**

"यामुळे आता मी सरस्वतीच्या काठावरील तीर्थाची यात्रा करण्यास जातो, कारण कुरुकुलाच्या वंशजांच्या या (परस्पर) विनाशाचे दृष्य प्रत्यक्ष पाहणे मला सहन होणार नाही; असे म्हणून महाबाहु बलरामांनी पाण्डवांचा निरोप घेतला आणि श्रीकृष्णांना चिंतामुक्त करून बलराम तीर्थयात्रेस निघून



गेले." याप्रमाणे बलरामांची यात्रा तेथून उपप्लव्यापासूनच त्याच रात्री प्रारंभ झाली. श्रीकृष्णांची चिंतामुक्ति यासाठी की, बलराम क्रोधित होऊन त्या युद्धात दुर्योधनाकडून उतरले असते, तर एकूण परिस्थिती पांडवांसाठी फार बिकट व स्वतः श्रीकृष्णांसाठी अतिशय अडचणीची झाली असती.

बलरामांनी ही तीर्थयात्रा त्या युद्धाच्या अंतिम दिवशी भीम-दुर्योधनगदायुद्धाच्या प्रसंगी संपविली. त्यावेळी त्यांनी स्पष्ट म्हटले की यात्रारंभाच्या दिवशी चन्द्र पुष्य नक्षत्रात होता (शल्यपर्व ३४-६,७). याचे समग्र विवेचन मी पुढे केले असून, ते या निष्कर्षाची संपूर्ण पुष्टी करते की, ज्या दिवशी श्रीकृष्ण असफल शांतीवार्तेनंतर अत्यंत तातडीने हस्तिनापुराहून उपप्लव्यास परतले, त्याच पुष्य नक्षत्र दिवशी बलरामांची ही तीर्थयात्रा उपप्लव्यापासून प्रारंभ झाली.

बलराम निघून गेल्यानंतर त्याच रात्री रुक्मीही येऊन पांडवांना भेटला, व काही क्षणातच परत गेला.

**गते रामे तीर्थयात्रां भीष्मकस्य सुते तथा**
**उपाविशत् पाण्डवेयाः मन्त्राय पुनरेव च।।उद्योगपर्व १५८-३९**

"बलराम तीर्थयात्रेस निघून गेल्यावर आणि त्याचप्रमाणे रुक्मी परत गेल्यावर पांडव पुनः महत्त्वपूर्ण विचारविनिमयासाठी बसले."

**पांडवांचे कुरुक्षेत्राकडे प्रस्थान**

यानंतर त्याच पुष्यनक्षत्राच्या तिथीवर पांडव सैन्याने उपप्लव्याहून कुरुक्षेत्राकडे प्रस्थान केले. ते रात्रीच्या कोणत्या प्रहरी केले? सेनापतीची निवड करते समयी युधिष्ठिराने म्हटले होते-

**ब्रवीतु वदतां श्रेष्ठो निशां समभिवर्तते**
**ततः सेनापतिं कृत्वा कृष्णस्य वशवर्तिनः।।१५१-३७**
**रात्रेः शेषे व्यक्तिक्रान्ते प्रयास्यामो रणाजिरम्**
**अधिवासितशस्त्राश्च कृतकौतुकमङ्गलाः।।३८**

"विद्यानिधान श्रीकृष्णांनी आम्हाला (प्रधान सेनापतीच्या नियुक्तीत) कृपया मार्गदर्शन करावे. यावेळी निशा चालू आहे. सेनापतीची नियुक्ती केल्यावर आम्ही शस्त्रपूजन व धार्मिक मंगल विधि करून 'रात्री'चा शेष भाग समाप्त होण्याच्या वेळी श्रीकृष्णांच्या नेतृत्वाने रणभूमीकडे प्रस्थान करू." 'निशा' सूर्यास्तापासून सुर्योदयापावेतो असून तीत दोन्ही कडचे संध्या प्रहर येतात. परंतु 'रात्री'मध्ये संध्यासमय येत नाहीत. म्हणून युधिष्ठिराचा आशय असा की, पांडव सैन्य आगामी सूर्योदयापूर्वी उषःकालात (ब्राह्ममुहूर्तावर)

प्रस्थान करील. तिथी सूर्योदयी बदलते. म्हणून उषःकालाची ती वेळ पुष्यनक्षत्राच्या (वद्य सप्तमी) तिथीत मोजली जाऊन श्रीकृष्णांच्या इच्छेनुसार पांडवांचे उपप्लव्याहून त्या तिथीवर कुरुक्षेत्राकडे प्रयाण झाले. हेच वैशंपायनाने पुनः पुष्य नक्षत्राचा विशेष उल्लेख करून शल्य पर्वात म्हटले आहे.

**रौहिणेये गते शूरे पुष्येण मधुसूदनः।। शल्यपर्व, ३५-१५**
**पाण्डवेयान् पुरस्कृत्य ययावभिमुखः कुरून्।....१६**

"शूर बलराम (तीर्थयात्रेला) निघून गेल्यावर श्रीकृष्णांनी पुष्य नक्षत्रावर पांडवांना पुढे करून (उपप्लव्यापासून) कुरुक्षेत्राच्या दिशेने प्रयाण केले." ❐



प्रकरण ६

# तिथ्यांची विलक्षण गुंतागुंत

**युद्धारंभ तिथीचे कूट**

शांतिवार्ता असफल झाल्यावर हस्तिनापुर सोडत असताना श्रीकृष्णांनी कर्णाजवळ आगामी अमावास्या युद्धारंभ तिथी म्हणून घोषित केली हे मागील प्रकरणात सांगितले आहे. श्रीकृष्ण म्हणाले-

**ब्रुयाः कर्ण इतो गत्वा द्रोणं शान्तनवं कृपम्**
**सोम्योऽयं वर्तते मासः सुप्रापयवसेन्धनः।। उद्योगपर्व १४२-१६**
**सर्वौषधिवनस्फीतः फलवानल्पमक्षिकः**
**निष्पंको रसवत्तोयो नात्युष्णशिशिरो सुखः।।१७**
**सप्तमाच्चापि दिवसादमावास्या भविष्यति**
**संग्रामो युज्यतां तस्यां तामाहुः शक्रदेवताम्।।१८**

"कर्णा, येथून परत गेल्यावर द्रोण, भीष्म व कृप (आदि) यांना सांग की, हा सौम्य मास चालू असून जळाऊ लाकडे व (गुरांसाठी) चारा सुलभतेने उपलब्ध आहे.-१६; सर्वप्रकारच्या वृक्षलतांनी वने परिपूर्ण आहेत, झाडे फळांनी लदली आहेत, माशा फार कमी झाल्या आहेत, चिखल नाहीसा झाला आहे, पेयजल स्वादयुक्त आहे आणि फार उष्णता नाही व फार थंडीही नाही असे यावेळी सुखद वातावरण आहे-१७; (आजपासून) सातव्या दिवसानंतर (अर्थात आठवे दिवशी) अमावास्या असून तिची देवता इंद्र म्हटली गेली आहे; त्या अमावास्येला युद्ध प्रारंभ करा." पौर्णिमान्त मास पद्धतीने ही अमावास्या मार्गशीर्षाची व अमावास्यान्त पद्धतीने कार्तिकाची होती.

युद्धाच्या प्रारंभादिवशीच श्रीकृष्णांनी अर्जुनास गीतोपदेश केला. याप्रमाणे स्वतः श्रीकृष्णांचे वचनानुसार गीतोपदेश या अमावास्येला झाला. पण मग युद्धारंभ तिथी त्या अमावास्येऐवजी तिच्यानंतर अकरा दिवसांनी येणाऱ्या मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला मानून, गीता जयंती त्या एकादशीला साजरी करण्याची परंपरा कशी प्रचलित झाली आहे?

येथे कूट हे आहे की, महाकवीने आपल्या युद्धवर्णनाच्या ओघात पुढे असे म्हटले आहे की, लढाईच्या चौदाव्या दिवशी चंद्रोदय उत्तररात्री झाला होता. असा उशीराचा चन्द्रोदय कृष्णपक्षाच्या दुसऱ्या आठवड्यातच शक्य आहे. पण अमावास्येला युद्धारंभ मानला, तर लागोपाठ चौदावा दिवस शुक्ल पक्षात येईल; कृष्णपक्षाच्या दुसऱ्या आठवड्यात शक्य नाही. यामुळे काही विद्वानांनी युद्धारंभ तिथी मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला नेली; तसे केले म्हणजे लागोपाठ चौदावा दिवस त्यानंतरच्या कृष्णपक्षाच्या उत्तरार्धात येऊन तो उशीराचा चन्द्रोदय सिद्ध होतो. पण खुद्द महाभारतात या अशा वैकल्पिक तिथीचा काहीही उल्लेख नाही. आणि (पुढे दाखविल्याप्रमाणे) त्या तिथीची युद्धातील अन्य प्रमुख घटनांच्या तिथ्यांशी सुसंगतीही लागत नाही. हे पाहता, के. ल. दप्तरी (पूर्व उल्लेखित), पां. वा. काणे (पू.उ. VOLIII, pages 907-915) आदि काही अन्य विद्वान त्या अमावास्येला युद्धारंभ मानतात, पण चौदाव्या दिवसाच्या त्या चन्द्रोदयाच्या वर्णनाला प्रक्षिप्त (interpolation) म्हणतात. परंतु त्या वर्णनाला प्रक्षिप्त मानण्यालाही पुरेसे कारण नाही. अशाप्रकारे महाभारताच्या अभ्यासकांसाठी युद्धारंभाची (म्हणजेच गीताजयंतीची) तिथी एक मोठे कूट होऊन बसली होती.

**बलरामांच्या यात्रेचे कोडे**

यानंतर बलरामांच्या तीर्थयात्रेच्या दिवसांचे कोडे पहा. आपली यात्रा समाप्त करते समयी स्वतः बलरामांनी काढलेले पुढील उद्‌गार दर्शवितात की, यात्रा (चन्द्राच्या) पुष्य नक्षत्रावर प्रारंभ होऊन युद्धाच्या शेवटच्या दिवशी भीम-दुर्योधन गदाद्वंद्वाच्या समयी समाप्त झाली.

**चत्वारिंशत् अहान्यद्य द्वेच मे निसृतस्य वै**
**पुष्येण सम्प्रयातोऽस्मि श्रवणे पुनरागतः।। शल्यपर्व ३४-६**
**शिष्ययोर्वै गदायुद्धं द्रष्टुकामोऽस्मि माधव...७**

"माधवा, (उपप्लव्यास तुझा निरोप घेऊन यात्रेसाठी) मी निघालो होतो त्याला आज बेचाळीस दिवस होत आहेत; मी पुष्य नक्षत्रावर निघालो होतो व (आज) श्रवण नक्षत्रावर (तुझ्याकडे) परत येत आहे. (दुर्योधन व भीम या) माझ्या (गदाविद्येतील) उभय शिष्यांचे (एकमेकांशी) गदायुद्ध मी पाहू चाहतो."

यात्रेचे हे बेचाळीस दिवस आतापावेतो कूट होऊन बसले होते. मागील प्रकरणात पाहिल्याप्रमाणे, श्रीकृष्णांनी युद्धारंभार्थ घोषित केलेल्या अमावास्येच्या सात दिवस पूर्वी ही यात्रा प्रारंभ झाली होती. आणि लढाई अठरा दिवस झाली असे महाभारतात म्हटले आहे. म्हणून जे भाष्यकार त्या अमावास्येला युद्धारंभ



मानीत होते ते त्या पूर्व सात दिवसात युद्धाचे अठरा दिवस मिळवत राहिले; पण त्याने तीर्थयात्रेचे एकूण पंचवीस दिवसच सिद्ध होतात. बरे, ज्यांनी युद्धारंभ तिथी मार्गशीर्ष एकादशी पावेतो नेली ते आणखी केवळ अकरा दिवस जोडू शकले आणि त्यानेही एकूण छत्तीसच दिवस होतात, स्वतः बलरामांनी म्हटल्याप्रमाणे बेचाळीस नव्हे! याचप्रमाणे बलराम वचनात निर्दिष्ट नक्षत्रांचाही हिशेब बसत नव्हता. चन्द्र दर दिवशी सरासरीने एक नक्षत्र जातो; पण पुष्यापासून श्रवण न पंचवीस स्थाने दूर आहे न छत्तीस. उलट, ते अंतर (सत्तावीस नक्षत्रांचा एक चक्कर पूरा करून त्यात द्वितीय फेऱ्यातील पंधरा स्थाने मिळवून) बरोबर बेचाळीस स्थानांचे आहे. शेवटी दप्तरींनी (पाहा पू. उ. page 7 and 117) अशीही सूचना केली, की बलरामांच्या त्या वचनात पुष्याच्या जागी श्रवण व श्रवणाच्या जागी पुष्य वाचावे; आणि बलरामाची यात्रा उपप्लव्याऐवजी थेट द्वारकेपासून सुरू झाली असे समजावे. पंडित खेडवाल (पू.उ.पृ.१२९-१३०) बलरामांच्या त्या श्लोकात 'श्रवणे' ऐवजी 'श्रवणेन' वाचू पहातात; आणि मग तेथे श्रवण नामक नक्षत्राचा सारा संबंध हटवून 'श्रवणेन'चा आशय (गदायुद्धाचे स्थली येण्यापूर्वी) गदायुद्धाची बातमी (नारदापासून) श्रवण करून (ऐकून) असा घेऊ पाहतात; आणि श्लोकांत 'चाळीस आणि ('च') दोन' असे शब्द असता, ते चाळीस उणे दोन (अर्थात अडतीस) असेही म्हणू पाहतात! (यात 'श्रवणे' ऐवजी 'श्रवणेन' वाचल्याने छंदाच्या दृष्टीने एक अक्षर वाढते ते वेगळेच). अन्य कोणी बलरामांचा तो श्लोकच संशयास्पद आहे असे म्हणतात, तर कोणी त्या यात्रेचा आरंभ पांडवांच्या उपप्लव्याहून कुरुक्षेत्राकडे प्रस्थानानंतर एखादे दिवशी (तर आणखी कोणी त्याच्या एक दिवस पूर्वी) झाला असावा, असा तर्क करतात.

या साऱ्या संदर्भात पुढे प्रकरण ८ मध्ये या श्लोकाच्या मूळ पाठात कोणताही हस्तक्षेप न करता, या कूटाचाही सरळ उलगडा आढळून येईल.

**काही अन्य प्रश्न**

युद्ध समाप्तीनंतर विजयी पांडवांनी एकदम हस्तिनापुरात प्रवेश केला नाही. त्यांनी युद्धात मृत उभयपक्षीय योद्धांची प्रथम विधिवत् अन्त्येष्टिक्रिया केली आणि नंतर नगराच्या बाहेर नदी तटावर एक पूर्ण महिना शौचपालनात व्यतीत केला.

**तत्र ते सुमहात्मानो न्यवसन् पांडुनंदनाः**
**शौचं निवर्तयिष्यंतो मासमात्रं बहिःपुरात्।।शांतिपर्व१-२.**

"तेथे शहराबाहेर (नदीकाठावर) महात्मा पांडवांनी शौचपालन करीत

एक महिना निवास केला.* परंतु युद्धसमाप्ती नंतरच्या या एक महिन्याचा ठीक हिशोब न लावता येऊन आचार्य नीलकंठांनी तो समय केवळ बारा दिवस मोजण्याचा प्रयास केला, आणि अलीकडे बेलवलकर□ आदींनीही त्याचे अनुकरण केले. आता युद्धसमाप्तीनंतरच्या त्या महिन्यांचीही बरोबर गणना उपलब्ध झाली आहे.

शरशय्येवरून भीष्मांनी केलेला धर्मोपदेश शांतिपर्व व अनुशासन पर्वात आला आहे. त्याचे दिवस कोणी आठ, तर कोणी अकरा, तर कोणी तीस मोजतात. काही जण तर तो उपदेश प्रक्षिप्त मानतात. पण तो मूळ महाभारताचाच भाग असून, तिथ्यांसह त्याचे दिवस सप्रमाण निश्चित केलेले पुढे एका प्रकरणात आढळून येतील.

**भीष्मनिधनतिथीची गहन समस्या**

शेवटी भीष्मनिधन तिथीही कूट झाली होती. लढाईच्या दहाव्या दिवशी संध्याकाळचे सुमारास भीष्म अतिशय जखमी होऊन रणक्षेत्रावर रथातून खाली पडले. पण त्यांना इच्छामरणाचा वर प्राप्त असल्याने उत्तरायण प्रारंभाच्या शुभ समयापावेतो प्राण धारण करून ते शरशय्येवर पडले राहिले. जेव्हा त्यांच्या अंतिम प्रयाणाची वेळ प्राप्त झाली तेव्हा त्यांनी पुढील उद्‌गार काढले-

**अष्टपंचाशतं रात्र्यः शयनस्याद्य मे गताः**
**शरेषु निशिताग्रेषु यथा वर्षशतं तथा।। अनुशासनपर्व, १६७-२७**
**माघोऽयं समनुप्राप्तो मासः सौम्यः युधिष्ठिर**
**त्रिभागशेषः पक्षोऽयं शुक्लो भवितुमर्हति।।२८**

"तीक्ष्ण अग्राच्या बाणांवर शयन करीत आता माझ्या अठ्ठावन रात्री गेल्या आहेत; हा सारा वेळ शंभर वर्षासमान प्रतीत झाला. युधिष्ठिरा, हा

* प्रचलित रुढीनुसार मृताचे आप्त 'अशौच' पाळतात; अन्य कोणी त्यांना शिवल्यास त्या अन्यास 'विटाळ' होतो. पण महाभारतकार येथे 'शौच' म्हणतात. तसेच धृतराष्ट्रादि मेल्यावरही पाण्डवांनी 'शौच' पालन करून बाराव्या दिवशी श्राद्धादि केल्याचे आश्रमवासिक पर्वात (३९-१३.१६) म्हटले आहे, आणि उद्योगपर्व १७८-६० मध्ये भीष्म-परशुराम संवादातही या संदर्भात 'शौच' शब्दच आला आहे. असे दिसते की, महाभारतानुसार मृताच्या निकट आप्तांनी स्वतः 'शौच' म्हणजे विशेष शुद्धता पाळून पिंडदानादि कर्मे करावी; अर्थात या दरम्यान अन्य कोणाचाही स्पर्श झाल्यास त्या अन्याने नव्हे तर स्वतः त्यांनी स्नानादि द्वारे पुनः शुद्ध व्हावे. अन्यही व्रतांच्या बाबतीत असेच केले जाते.

□ भांडारकर संस्थेद्वारे प्रकाशित महाभारत, Vol XVII Part I Introduction, P. Lxxxvi, Footnote 2.



माघाचा सौम्य मास प्राप्त झाला असून पक्ष शुक्ल आहे; आणि तो (काही भाष्यकारांच्या मते माघ मास तर अन्य काहींच्या अनुसार शुक्ल पक्ष) या समयी 'त्रिभागशेष' आहे". येथे मी 'त्रिभागशेष' शब्दाचे भाषांतर केले नाही; कां की, त्यात एक कूट आहे. साधारणपणे त्याचा अर्थ 'ज्याचा तीन चतुर्थांश भाग अद्याप शेष आहे' असा केला जातो.

या श्लोकात शरशय्येवरील अठ्ठावन रात्री, आणि त्यांच्या समाप्तीसमयी माघ मास व शुक्ल पक्ष यांचा स्पष्ट उल्लेख आहे. पण विद्वानांच्या अनेकानेक स्पष्टीकरणात भीष्मांच्या या अठ्ठावन रात्रींची गणना बरोबर जमत नव्हती. जे मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला युद्धारंभ मानतात त्यांच्या मोजणीप्रमाणे युद्धाचा लागोपाठ दहावा दिवस पुढील कृष्णपक्षाच्या पंचमीला येतो; त्या दिवशी भीष्मांचे रणभूमीवर पतन मानून अठ्ठावन रात्री मोजल्या तर भीष्मनिधन (दोन महिन्यानंतरच्या) कृष्ण पक्षात येते; पण स्वतः भीष्म शुक्ल पक्ष म्हणतात. या अडचणीतून सुटण्यासाठी नीलकंठाचार्य शरशय्येच्या एकूण रात्री कमी करतात. ते 'अष्टपंचाशतं'चा विग्रह 'अष्टपंच अशतं' असा करतात; आणि 'अशतं'चा अर्थ शंभराहून कमी, आणि 'अष्टपंच' मधील दोन संख्यांच्या क्रम उलटा करून केवळ त्याचाच अर्थ पाचावर आठ म्हणजे 'अठ्ठावन' करतात. याप्रमाणे एकूण 'अष्टपंचाशतं'चा अर्थ (अठ्ठावन ऐवजी) 'शंभरात अठ्ठावन कमी अर्थात बेचाळीस' असा होतो! आता, नीलकंठांच्या मतानुसार युद्धारंभ तिथी मार्गशीर्ष शुक्ल पक्षाची ठीक एकादशी नसून त्रयोदशी (वा चतुर्दशी) आहे; आणि या गणनेने भीष्मांच्या गणभूमीवर पतनाची तिथी त्यानंतरची वद्य अष्टमी येते. तेथून बेचाळीस रात्री मोजून नीलकंठ भीष्मनिधन तिथी माघ शुक्ल पंचमीवर आणून ठेवतात. पण इतके करूनही त्या पंचमीला तो शुक्ल पक्ष किंवा माघ महिनाही वर सांगितलेल्या सर्वसाधारण अर्थाने 'त्रिभागशेष' (ज्याचा तीन चतुर्थांश भाग शेष आहे) म्हणता येत नाही. म्हणून नीलकण्ठ त्या शब्दाचा अर्थ त्रिभागमात्र 'म्हणजे ज्याचा एक तृतीयांश भाग व्यतीत झाला आहे' असा करून, त्याचा संबंध त्या शुक्ल पक्षाशी जोडू पाहतात.

काही अन्य अभ्यासक शरशय्येच्या रात्रींची संख्या कमी न करता, त्यांची गणना भीष्मांच्या रणभूमीवर पतनाऐवजी युद्धाच्या प्रथम दिवसापासून करू पाहतात. (पाहा श्री राघवन पु.उ. आणि पंडित गिरिधर शर्मा चतुर्वेदी, 'गीता प्रवचन गीता व्याख्यानमाला', हिन्दी, खण्ड ४, पृ. ७९-८५). हे लेखक श्लोक २७ च्या प्रथम पंक्तीत ('शयानस्य' ऐवजी 'ऽशयानस्य' अथवा 'अशयानस्य' वाचून) असा आशय पहातात की, भीष्मांनी मरणासमयापावेतो 'झोपेशिवाय'

अठ्ठावन रात्री घालवल्या होत्या; कारण भीष्मांची झोप युद्धाच्या प्रथम दिवसापासून उडाली होती ! पण त्या श्लोकात 'शरेषु निशिताग्रेषु' असे स्पष्ट म्हटले असून, त्याचा संबंध लढाईच्या दहाव्या दिवशी त्यांच्या शरीरात घुसलेल्या तीक्ष्णबाणामुळे त्यांच्या झालेल्या पतनाशी आहे.

पुणेची भांडारकर शोध संस्था त्या अठ्ठावन रात्री भीष्मांच्या रणभूमीवर पतनापासून मोजून वद्य पक्षात पोचते, आणि मग त्या वद्य पक्षालाच शुक्ल पक्ष मानावे असा आग्रह व्यक्त करते ! "The statement पक्षोऽयं शुक्लो भवितुमर्हति is intriguing. If the fortnight had actually been bright, Bhishma would have clearly said so. He would not have said that the *paksa* deserved to be regarded as *šukla*. The implication seems to be that the *paksa*, though not actually *šukla*, deserved to be regarded as *šukla.* And the reason for this is sugested by the word *tribhagašesah*. The *paksa* was *krsna*, but since three parts of it had still remained.---only one part having elapsed--- it could be regarded as *šukla* (that is, as the continuation of *šukla*).The *krshna-paksa* was *tribhāgasesah* that is to say, only one fourth of it had elasped. One fourth of a fortnight is 3.75 days. Therefore the date indicated in 153/28 would correspond to Magha-krsna-caturthi"*

तिकडे, जे श्रीकृष्णवचनानुसार अमावास्येला युद्धारंभ मानू चाहतात, त्यांच्या गणनेत भीष्मपतनदिन अर्थात शरशय्याप्रारंभ मार्गशीर्ष शुक्ल नवमीला येतो. तेथून अठ्ठावन रात्री मोजल्यास माघ शुक्ल अष्टमीला भीष्मांचे निधन दाखविता येईल; आणि त्या दिवशी माघ मास 'त्रिभागशेष' म्हणजे तीनचतुर्थांश शेष म्हणता येतो; कारण तेव्हा त्याचा अर्धा पक्ष जाऊन दीड पक्ष शेष होता (मात्र तो मास अमावास्यान्त मानला पाहिजे). या धारणेनुसार प्रचलित भारतीय पंचांगात भीष्म निधन तिथी माघ शुक्ल अष्टमीला दाखविली जाते. पण यात लढाईचा चौदावा दिवस शुक्लपक्षाच्या शेवटी येऊन त्याच्या उत्तररात्री चन्द्रोदय

* "Mahabharata," Vol XVII, Anus'asana Pravan, Introduction, P.LXXXiii-iv; यात उल्लेखिलेला श्लोक १५३/२८ म्हणजे वर १६७-२८ असा दिलेला श्लोक होय.



संभव नाही. आणि शिवाय विसंगतीची काहीही चिंता न करता याच पंचांगात गीता जयंती अमावास्येऐवजी मार्गशीर्ष एकादशीला दाखविली जाते !

भीष्मनिधन माघ शुक्ल अष्टमीला दाखविणारा एक उल्लेख महाभारताच्या काही पोथ्यात शांतिपर्व अध्याय ४७ मध्ये एका श्लोकात असून त्याची चर्चा पुढे (प्रकरण १० मध्ये) केली आहे. याशिवाय या तिथीचा उल्लेख 'भारतसावित्री' नामक एका लहानशा संस्कृत पद्यरचनेत 'माघमासे सिताष्टमी' या शब्दात आढळतो. परंतु त्या रचनेत भीष्मांचे रणभूमीवर पतन मार्गशीर्ष पौर्णिमेनंतर येणाऱ्या कृष्ण सप्तमीला दाखविले आहे; आणि तेथून माघ शुक्ल अष्टमी पावेतो अठ्ठावन रात्री पूर्ण होत नाहीत. यासाठी कधी कधी त्या वचनात 'सिताष्टमी' पूर्वी अवग्रह देऊन 'असिताष्टमी' असेही मानले जाते; त्याचा अर्थ (माघ मासाची) कृष्ण अष्टमी असा होतो. परंतु मग महाभारतात शुक्ल पक्षाचा जो स्पष्ट उल्लेख आहे त्याच्याशी विरोध येतो. वस्तुतः 'भारतसावित्री'चे मूळ शब्द निश्चित करणे अत्यंत कठीण आहे; त्यातील श्लोक अधिकांशतः अन्य कृतींमध्ये उद्धृत केलेले उपलब्ध होतात.*

पंडित गिरिधर शर्मा चतुर्वेदी (पूर्व उल्लेखित) निष्कर्ष काढतात की, या गहन कूटाचा पूर्ण उलगडा असंभव असून, महाभारतातील या संख्यानिदर्शक श्लोकात आतापावेतो नीट ध्यानात न आलेली काही गुप्त परिभाषा योजिलेली असावी, किंवा पोथी लेखनात काही चुका प्रविष्ट झाल्या असाव्या. अशाच नैराश्यपूर्ण स्वरात श्री चिंतामण विनायक वैद्यही लिहितात,"भारतीय युद्ध मार्गशीर्ष शुद्ध १३ सुरू झाले असे धरले तर, भीष्म मार्गशीर्ष वद्य ८ला पडले आणि तेव्हापासून अठ्ठावन रात्री मोजल्या तर माघ वद्य ८ येते, हे कोडे काय आहे...? हा विरोध कसा? याचा परिहार होणे बहुतेक अशक्यच आहे. युद्ध मार्गशीर्षात न मानता श्रीकृष्णांच्या म्हणण्याप्रमाणे कार्तिक अमावास्येस सुरू झाले असे मानले तर सगळाच घोटाळा होतो... जयद्रथाच्या वधाच्या दिवशी पहाटेस चन्द्र उगवू शकत नाही. ते दिवशी बहुतेक पौर्णिमा किंवा शुद्ध त्रयोदशी येते, म्हणजे पहाटेस उलटा चन्द्राचा अस्त होऊन काळोख होणार; मार्गशीर्ष शुद्ध ८ युद्धारंभ मानला तर ५८ दिवस येतील, पण त्या दिवशीच्या नक्षत्रापासून १८ व्या दिवशी बलरामाच्या वचनाप्रमाणे श्रवण नक्षत्र येणार नाही... असो. तर हा सर्व घोटाळा या अनुशासन पर्वातील ५८ रात्री व ५०

* पाहा डॉ. काणे, पूर्व उल्लेखित, Vol III pages 909-10 footnote 1773.

रात्रींच्या वचनांनी केला आहे. माघ वद्यात शुक्ल पक्ष पंचमीपर्यंत मानता येईल; पण त्रिभागशेष पक्ष म्हणता येणार नाही. अठ्ठावन रात्री म्हणजे सरासरी दोन महिने होतात. तेव्हा माघ वद्य अष्टमीच येणार आहे. असो. काही एक खोटे मानावे लागणार आहे. युद्धपर्वातील वचने तरी खोटी, नाही तर ही अनुशासन पर्वातील खोटी, असा हा अपरिहार्य विरोध आहे, हे मानावे लागते." (पूर्व उल्लेखित पृ. १२७-२८).

अशाच स्वरूपाचे विचार डॉ. काणे आदींनीही व्यक्त केले आहेत.

या अशा सर्व शंकाकुशंकांचे निरसन करून, महाभारतानुसार युद्धारंभ तिथि, बलरामयात्रेचे दिवस, भीष्मनिधन तिथि, सप्रमाण निश्चित केल्याचे पुढील विवेचनांत आढळून येईल. □



प्रकरण ७

# युद्धाचे रहस्यपूर्ण एकूण दिवस

## युद्धातील विश्राम दिवस

महाभारतकारांनी संदिग्ध शब्दप्रयोगात खुबीने दडविलेल्या काही रहस्यांच्या आधारे आता त्यांच्या विविध कालगणनात्मक व ज्योतिषात्मक कूटांचा पूर्ण उलगडा होत आहे; यात एक रहस्य हे आहे की, महाभारतात संपूर्ण विस्ताराने दिलेले महायुद्धाचे वर्णन प्रत्यक्ष लढाई एक एक दिवसाचे अंतर सोडून केलेल्या गणनेवर आधारित आहे. जरी प्रत्यक्ष लढाईचे दिवस अठरा म्हटले आहेत, तरी मधले विश्रांति दिवस समाविष्ट करून युद्धकालाचे एकूण दिवस पस्तीस मोजले आहेत. महाकवीने महाभारताच्या श्लोकांत याची मार्मिक प्रमाणे व संकेत ठेवले आहेत.

या विश्राम दिवसांचा ज्या विशिष्ठ कार्यांसाठी उपयोग केला जात असे, त्यातील काही कार्यांचा उल्लेख येथे सुरुवातीसच करतो; अन्य कार्यांचा उल्लेख पुढे संदर्भानुकूल येईल.

लढाईच्या प्रति दिवशी उभय सैन्यांची जी भिन्न भिन्न व्यूहरचना होत असे, तिची माहिती महाभारतात व्यूहांच्या विशिष्ट नावांसह दिली आहे. पांडवांनी लढाईच्या दुसऱ्या दिवशी आपल्या सेनेची रचना 'क्रौंचारूण' व्यूहात, तिसऱ्या दिवशी 'अर्धचन्द्राकार' व्यूहात, पाचव्या, सहाव्या, सातव्या व आठव्या दिवशी अनुक्रमे श्येन, मकर, वज्र व शृंगाटक व्यूहात, तर अकराव्या दिवशी पुनः क्रौंच व्यूहात आणि बाराव्या दिवशी 'मंडलार्ध' व्यूहात केली होती. अशाच प्रकारे कौरव सैन्याच्या व्यूहांचीही नावे दिली आहेत. दोन्ही सैन्यें अत्यंत विशाल होती आणि लढाईला प्रारंभ सूर्योदयावर (व एकदोनदा त्याच्याही पूर्वी) होत असे. त्यापूर्वी (प्रति दिवशी मरणाऱ्या सैनिकांनंतर उरणाऱ्या) शेष सैन्यांकडून या व्यूहरचनांचे पूर्वाभ्यास आवश्यक होते. अन्यथा, सूर्योदयाबरोबर सैन्य विशिष्ट रचनेनुसार रणक्षेत्रावर तयार उभे राहू शकले नसते. हे पूर्वाभ्यास मधल्या अवकाशदिनी होत असले पाहिजेत. पुऱ्या दिवसभराच्या घनघोर

लढाईने अत्यंत थकलेली सेना त्याच रात्री असे पूर्वाभ्यास करून पुनः सूर्योदयी तशाच भीषण लढाईसाठी उभी राहणे संभव मानता येईल काय?

याशिवाय, लढाईत प्रति दिवशी रणभूमी अगणित मानवाच्या व पशूंच्या (ज्यात प्रचंड हत्तीही होते) मृत देहांनी आणि उध्वस्त रथादींनी खचाखच भरून जात असे; याची स्पष्ट सूचना महाभारतात जागोजाग दिली आहे. (उदाहरणार्थ, द्रोण पर्व ४१-१८, १९,२०;९३-६; कर्णपर्व ९४-१३ ते १९). एका श्लोकात रक्त, चरबी, मांस यांचा रणभूमीवर चिखल झाल्याचाही उल्लेख आहे (द्रोणपर्व १४८-५६). महाकवीने हे उल्लेख कां केले आहेत? रणभूमीवर पुनः लढण्यापूर्वी या साऱ्याची साफसफाई उघडच आवश्यक होती; तिच्याशिवाय रणभूमीवर सुलभतेने रथ चालविणेही संभव नव्हते. ही साफसफाई विश्राम दिवशी होऊ शकत होती.

यानंतर, युद्धकालात कौरवांच्या बदलणाऱ्या प्रमुख सेनापतींच्या अभिषेकांवर विचार करू. भीष्मपतनानंतर द्रोणाचार्य कौरवसेनापति झाले, द्रोणानंतर कर्ण व त्याच्यानंतर शल्य सेनापति झाला. महाभारतकारांनी द्रोण व कर्णाला झालेल्या संपूर्ण धार्मिक विधिवत अभिषेकांची विस्तृत वर्णने दिली असून, शल्यालाही तसाच अभिषेक झाला असे म्हटले आहे. द्रोणांच्या अभिषेकाचे वर्णन असे आहे-

**अथाभिषिचुर्द्रोणं दुर्योधनमुखाः नृपाः**
**सैनापत्ये यथा स्कंदं पुरा शक्रमुखाः सुराः।। द्रोणपर्व, ७-६**
**ततः पुण्याहघोषेण स्वस्तिवादस्वनेन त**
**संरत्तवैर्गीतशब्दैश्च सूतमागधबन्दिनाम्।।८**
**जय शब्दैर्द्विजाग्र्याणां सुभगानर्तितैस्तथा**
**सत्कृत्य विधिना द्रोणं मेनिरे पाण्डवाञ्जितान्।।९**

"त्यानंतर, ज्याप्रमाणे पुरातनकाली इंद्रादि देवांनी स्कंदाला सेनापतिपदाचा अभिषेक केला होता तसा दुर्योधनादि राजांनी द्रोणास अभिषेक केला-६... पुण्याहवाचन, स्वस्तिवाचन, आदि धार्मिक विधि, भाट - बंदिजनांकडून स्तुतिगान, श्रेष्ठ ब्राह्मणांची जयजयकारयुक्त आशीर्वचने, नृत्यांगनांचे नृत्य, इत्यादि सर्वप्रकारे द्रोणाचा सत्कार केल्यावर कौरवांच्या मनात दृढ विश्वास निर्माण झाला की, आता पांडव निश्चित जिंकले जाणार, ८-९"

याप्रमाणे कर्णालाही अभिषेक झाला-

**सैनापत्येन सत्कर्तुं कर्णं स्कन्दमिवामराः**
**ततोऽभिषिचुः कर्णं विधिदृष्टेन कर्मणा।। कर्णपर्व १०-४३**



**दुर्योधनमुखा राजन् राजानो विजयैषिणः**
**शातकुम्भमयैः कुम्भैर्माहेयैश्चाभिमन्त्रितैः।।४४**
**औदुम्बरे सुखासीनमासने क्षौमसंवृते**
**शास्त्रदुष्टेन विधिना सम्भारैश्च सुसम्भृतैः।।४६**
**ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्यास्तथा शूद्राश्च सम्मताः**
**तुष्टुवुस्तं महात्मानभिषिक्तं वरासने।।४७**

"ज्याप्रमाणे (पूर्वकाली) देवांनी स्कंदाला आपला सेनापती केले होते, त्याप्रकारे दुर्योधन आणि त्याच्या अधीनस्थ विजयाभिलाषी राजांनी कर्णाला सेनापती करून, त्याचा सत्कार करण्याच्या इच्छेने शास्त्रोक्त विधीद्वारा त्याच्यावर अभिषेक केला. कर्णावर सिंचन करण्यासाठी सुवर्ण आणि मातीच्या पात्रांत अभिमंत्रित जल ठेवले होते... औदुंबराच्या सुंदर आसनावर मृदु रेशमी कपडा अंथरला होता व त्यावर कर्ण आरामाने विराजमान झाला होता. शास्त्रीय विधीने उपरोक्त सुसज्जित सामग्रीद्वारा कर्णाला अभिषेक केला गेला आणि उच्चासनस्थित अभिषिक्त सेनापती महात्मा कर्णाचे चारही वर्णांच्या आदरणीय व्यक्तींनी स्तुतिगान केले."

अशा विशाल प्रमाणावर हे अभिषेक अवकाशदिनीच होऊ शकत होते. प्रत्यक्ष लढाईच्या दिवशी एखाद्या रात्रिप्रहरी, थकून निद्रावश असलेल्या सैन्याला अत्यावश्यक आरामापासून वंचित करून, ते झाले नसते; आणि तिकडे लढणे सूर्योदयी पुनः आरंभ होत असे. द्रोण व शल्य यांचे अभिषेक विश्रांतिदिवशी झाले याची तर पुढे दाखविल्याप्रमाणे महाभारतात प्रमाणेही आहेत.

जर हे विश्राम दिवस (ज्यांच्यासाठी आणखी प्रमाणे पुढील प्रकरणांतून दिली आहेत) प्रत्यक्ष लढाईच्या अठरा दिवसात जोडले, तर एकूण युद्धकाल पस्तीस दिवसांचा होतो. या गणनेमुळे महाभारताच्या युद्धविषयक कालगणात्मक (आणि ज्योतिषात्मक) कूटांचा उलगडा सहज प्रकारे कसा होतो, हे वाचकांना लवकरच आढळून येईल. पण तत्पूर्वी महाकवीच्या यासंबंधी आणखी एका सूक्ष्मतेवर विचार आवश्यक आहे.

**विश्रामदिनात एक अपवाद**

जरी लढाईच्या प्रत्येक दिवसानंतर (उभय पक्षांच्या संमतीने) विश्रांतीचा एक दिवस येत असे, तरी त्यात एक अपवादही झाला. प्रत्यक्ष लढाईच्या चौदाव्या दिवसाला लागून अवकाश दिवस नव्हता. त्या दिवशी अर्जुनाने सूर्यास्तापूर्वी जयद्रथ वध केला. (प्रकरण १८); पण त्यानंतर अंधाऱ्या रात्रीतही दुर्योधनाने लढाई चालू ठेवली. मशाली जाळून प्रकाश करण्यात आला. त्याचे

महाभारतकारांनी मार्मिक वर्णन दिले आहे, पण मध्यरात्री पावेतो दोन्ही सेना अत्यंत थकून गेल्या. हे पाहून दयेने प्रेरित होऊन अर्जुनाने प्रस्ताव केला की, थोडा वेळ लढणे बंद करून उभय पक्षांनी रणक्षेत्रावरच काहीशी विश्रांती घ्यावी, आणि उत्तररात्री चन्द्रोदय झाल्यावर पुनः लढणे चालू करावे. यावेळी द्रोण कौरवांचे सेनापति होते; आणि त्यांनीही आपल्या सेनेची अवस्था व इच्छा पाहून अर्जुनाची सूचना मान्य केली; आणि तदनुसार उभय सैन्यांनी रणभूमीवरच विश्रांती घेण्यास प्रारंभ केला.

परंतु सायंकाळी झालेल्या जयद्रथवधामुळे अति उद्विग्न झालेल्या दुर्योधनाने शत्रुपक्षाकडून आलेला असा विश्रांती प्रस्ताव मान्य केल्याबद्दल द्रोणांना दोष दिला. इतकेच नव्हे, तर त्याने त्यांच्या इमानदारीवरही संशय घेतला. (द्रोणपर्व १८५-२,३,४,८). दुर्योधनाच्या कटुवचनांनी अतिशय विव्हल होऊन द्रोणांनी उत्तर दिले की, आता यानंतर (चन्द्रोदयावर पुनः चालू होणारी) लढाई अंतिम जय किंवा (आपला) मृत्यु होई पावेतो स्थगित न करता चालू ठेवीन.

**निहत्य सर्व पांचालान् युद्धे कृत्वा पराक्रमम्।। द्रोणपर्व १८५-१२**
**विमोक्ष्ये कवचं राजन् सत्येनायुधमालभे।...१३**

"राजा (दुर्योधना), सत्याला स्मरून व धनुष्याला स्पर्श करून मी प्रतिज्ञा करतो की, आता लढाईत पराक्रम करून समस्त पांचालाचा वध केल्यावरच मी कवच उतरवीन (विश्रांती घेईन)". (येथे 'सर्व पांचालान्'मधे संपूर्ण पांडव पक्ष आला आहे; कारण पांचाल राजकुमार धृष्टद्युम्न पांडवांचा प्रमुख सेनापती होता.) तसे पाहिले तर काही तासांपूर्वीही जयद्रथवधानंतर दुःखी दुर्योधनाशी बोलताना द्रोणांनी असा विचार व्यक्त केला होता (द्रोणपर्व, १५१-३४). पण असे दिसते की, ते उद्‌गार इतक्या शब्दशः कडक निर्धाराचे नसून, त्यात थकलेल्या सैन्याला थोडीशी विश्रांती देण्याची मुभा होती. मात्र आता दुर्योधनाच्या वाग्बाणांनी अति पीडित होऊन, द्रोणांनी 'जय किंवा मृत्यु' या स्वरूपाची निःसंदिग्ध प्रतिज्ञा केली.

अशा परिस्थितीत उत्तररात्री चन्द्रोदयानंतर पुनः चालू झालेली लढाई होत असता अरुणोदय झाला.

**अथ चन्द्रप्रभां मुष्णन्नदित्यस्य पुरः सरः**
**अरुणोऽभ्युदयांचक्रे ताम्रीकुर्वन्निवाम्बरम्।।१८६-२**
**तथो रथाश्वांश्च मनुष्ययाना -**
**न्युत्सृज्य सर्वे कुरुपाण्डुयोधाः**
**दिवाकरस्याभिमुखं जपन्तः**



**संध्यागताः प्रान्जलयो बभूवुः।।४**
**ततो द्वैधीकृते सैन्ये द्रोणः सोमकपाण्डवान्**
**अभ्यद्रवत् सपाञ्चालान् दुर्योधनपुरोगमः।।५**

"त्यानंतर सूर्याच्या पूर्वी दृश्यमान होणाऱ्या अरुणाचा उदय झाला, व त्यामुळे चन्द्रप्रकाश क्षीण होऊन आकाश लालसर झाले-२. त्यावेळी सर्व कौरव पाण्डव योद्ध्यांनी आपापले रथ, अश्व व मनुष्ययान (पालख्या, डोल्या आदि) सोडून, सूर्याच्या दिशेकडे तोंड करून, हात जोडून जपस्वरूपात संध्यावंदन केले.-४ नंतर द्रोणांनी आपल्या सेनेचे दोन विभाग केले, आणि दुर्योधनाच्या पुढून (त्याच्या दृष्टीसमोर) सोमक, पांडव व पांचालांवर हल्ला चढवला.-५"

अरुणोदयानंतर यथाक्रम सूर्योदय झाला, परंतु उभय सैन्ये रणभूमीवरच उभी राहिली.

**ते तथैव महाराज दंशिता रणमूर्धनि**
**संध्यागतं सहस्रांशुमादित्यमुपतस्थिरे।।द्रोणपर्व १८७-१**
**उदिते तु संहस्रांशौ तप्तकांचनसप्रभे**
**प्रकाशितेषु लोकेषु पुनर्युद्धमवर्तत।।२**

"महाराज (धृतराष्ट्र), ते सर्व योद्धे तसेच कवच धारण करीत राहून भूमीवरच प्रातःसंध्याकालीन सहस्रांशु सूर्याची (स्तोत्ररूपाने) प्रार्थना करू लागले-१. तप्तसुवर्णासमान शोभिवंत सूर्यबिंबाचा पूर्ण उदय झाल्यावर त्याचा प्रकाश सर्वत्र पसरला व लढाई पुनः चालू झाली-२." या रात्रियुद्धानंतर विश्रामदिवस नव्हता हे महाकवीने पुढील श्लोकात पुनः स्पष्ट केले आहे-

**ते रात्रौ कृतकर्माणः श्रान्ताः सूर्यतेजसा**
**क्षुत्पिपासापरीताङ्गा विसंज्ञा बहवोऽभवन्।।१८७-६**

" ते (योद्धे) रात्री युद्ध करून थकले होते व सकाळी सूर्याच्या उन्हानें व भूकतहानेनें त्रस्त झाले; आणि यामुळे त्यानंतर बरेचसे (लढताना) आपली शुद्धही नीट ठेवू शकत नव्हते."

अशाप्रकारे चोदाव्या दिवशी लढाई रात्रीच्या समाप्तीपावेतो चालू राहून, त्यानंतर विश्रामदिवसविना प्रत्यक्ष लढाईच्या पंधराव्या दिवसात प्रवेश करून गेली. आणि शेवटी त्या दिवशी द्रोणांचे रणभूमीवर निधन झाले.

जर विश्रामदिवशी रणभूमीची साफसफाई होऊन दुसरे दिवशी पुनः लढाई होत असे, तर या पंधराव्या दिवसापूर्वी विश्राम दिवस नसल्याने त्या दिवशी लढाई कशी झाली? या संदर्भात महाभारतकार विशेष रीत्या म्हणतात

की, या दिवशी "नासीद् रथपथस्तत्र सर्वमायोधनं प्रति" (१८७-२०). 'सर्व रणभूमीवर रथ चालण्यास रस्ता नव्हता.' मात्र तरीही काही अति बलवान घोडे कसेबसे रथ हाकत होते (१८७-२१,२२). आणि या दिवशी मुख्यत्वे विशिष्ट योद्धयांत वैयक्तिक द्वंद्व युद्धे झाली; महाकवीने त्यांचा नामनिर्देशासह उल्लेख केला आहे.

**अंतिम युद्ध दिवस**

पण विश्रामदिनांतील या एका अभावाची पूर्ती महाकवीने एका अन्य कूटकल्पनेने करून दिली. लढाईचा शेवटचा अठरावा दिवस प्रत्यत्र लढण्याच्या दोन अर्धदिवसात विभाजित करून, त्यांनी एकूण युद्धकालात ते दोन वेगळे मोजले! त्या अठराव्या दिवशी शल्य, जो त्यावेळी कौरवांचा सरसेनापती होता, मध्यान्ह समयास मारला गेला; व त्यानंतर दुर्योधन रणांतून पळून जाऊन रणभूमीवर लढाई बंद पडली. आणि सर्वसामान्य समजूत अशी आहे की, (त्या युद्धाचा अंत करणारे) भीम-दुर्योधन गदायुद्ध त्याच दिवशी अपराण्ह प्रहरी झाले. ही धारणा शल्य पर्वाच्या प्रारंभी आलेल्या पुढील श्लोकांमुळे होते

**ततः शल्यो महाराज कृत्वा कदनमाहवे**
**ससैन्योऽथ मध्यान्हे धर्मराजेन पातितः ।। शल्यपर्व, १-१०**
**ततो दुर्योधनो राजा हतबन्धू रणाजिरात्**
**अपसृत्य ऱ्हदं धोरं विवेश रिपुजात् भयात्।।११**
**अथापराण्हे तस्यान्हः परिवार्य सुयोधनः**
**ऱ्हदादाहूय युद्धाय भीमसेनेन पातितः।।१२**

"महाराज (जनमजेय), नंतर आपल्या सेनेसह त्या युद्धात भीषण संहार केल्यावर मध्यान्ह समयी शल्य युधिष्ठिराकडून मारला गेला-१०. तत्पश्चात राजा दुर्योधन, ज्याचे सर्व बंधू मारले गेले होते, रणांगणातून पळून शत्रूच्या भयाने घोर (विशाल दुर्गम) (द्वैपायन नामक) सरोवरात जाऊन बसला-११." आणि या संदर्भात श्लोक १२ चा परंपरेनुसार असा अर्थ केला जातो की, त्याच दिवसाच्या (तस्यान्हः) अपराण्ह प्रहरी (अपराण्हे) पांडवांनी दुर्योधनाला घेरून युद्धार्थ सरोवराच्या बाहेर येण्याचे आव्हान केले, व त्याला भीमाने गदायुद्धात मारून खाली पाडले.

परंतु शल्यपर्वातच नंतर आलेल्या विस्तृत वर्णनावरून स्पष्ट होते की, शल्यवधाच्या दिवशी रात्रिप्रारंभापावेतो पांडवांना सरोवरांत लपून बसलेल्या दुर्योधनाचा पत्ताही लागला नव्हता. म्हणून त्या दिवसाच्या 'अपराण्ह' प्रहरी भीमाने दुर्योधनास मारणे शक्यच नव्हते. त्या विस्तृत वर्णनानुसार शल्यवधानंतर



दुर्योधन रण सोडून पळून गेल्यावर संजय (जो कौरवांकडून लढत असे) कैद झाला. परंतु महर्षि व्यास तेथे उपस्थित होऊन त्यांच्या आदेशाने त्याला सोडून देण्यात आले; मात्र त्याचे कवच व शस्त्रे काढून घेण्यात आली. यानंतर संजय हस्तिनापुराकडे जाण्यास निघाला. त्यावेळी सायान्ह समय होता असे स्पष्ट म्हटले आहे. संजय धृतराष्ट्रास सांगतो -

**अनुज्ञातस्त्वहं तेन न्यस्तवर्मा निरायुधः**
**प्रतिष्ठं येन नगरं सायान्हे रुधिरोक्षितः।। शल्यपर्व,२९-४१**

"नंतर त्याच्या (सात्यकीच्या) अनुज्ञेने व शस्त्रकवचादि रहित होऊन मी (संजय) सायंकाळच्या वेळी हस्तिनापुर नगराकडे येऊ लागलो; त्यावेळी माझे शरीर रक्तबंबाळ झाले होते."

संजय एक कोस चालून गेल्यावर त्याला वाटेत दुर्योधन एकटाच भेटला. संजयाने त्याला त्या दिवसाच्या लढाईच्या शेवटच्या क्षणांची हकीकत सांगितली.. ती ऐकल्यावर दुर्योधनाने धृतराष्ट्रासाठी संजयाजवळ एक संदेश दिला; आणि संजयाच्या समक्ष त्याने जवळच्याच द्वैपायन सरोवरात प्रवेश केला (२९-५४).

दुर्योधन सरोवरात लपून बसल्यानंतर तेथे कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा आले. संजयाकडून त्यांना दुर्योधनाचे लपण्याचे स्थान कळले. पण तितक्यात दुर्योधनाचा सर्वत्र शोध करीत पाण्डवही त्याच दिशेने येत असलेले पाहून, ते तिघे संजयासह चुपचाप आपल्या रथात बसून कौरवशिबिरांकडे गेले. यावेळी सूर्यास्त होऊन गेला होता. संजय धृतराष्ट्रास सांगतो-

**तत्र गुल्माः सूर्ये चास्तमिते सति।। २९-६४**
**सर्वे विचक्रुशुः श्रुत्वा पुत्राणां तव संक्षयम्...।।६५**

"त्यावेळी सूर्यास्त झाला होता व तेथील सर्व पहारेकरी तुझ्या पुत्रांचा संपूर्ण विनाश झाल्याचे ऐकून भयभीत होत्साते जोरजोराने आक्रोश करीत होते."

इकडे सरोवराच्या आसपास कोणी नाही असे पाहून, थकलेले पांडव देखील आपल्या शिबिराकडे विश्रांतीसाठी चालले गेले. अशाप्रकारे सूर्यास्तापावेतोही विजयी पांडव व लपून बसलेला दुर्योधन समोरासमोर आले नव्हते.

सरोवरापासून पांडव चालले गेल्यावर अश्वत्थामादि तिघे पुनः हळूहळू तेथे परत आले. त्यांनी दुर्योधनाला हाक मारून त्याच्याशी वार्तालाप सुरू केला. यापूर्वी सूर्यास्त होऊन चुकला होता. त्यांचे संभाषण चालू असतां योगायोगाने दिवसभराच्या कामामुळे थकलेले काही शिकारी व्याध तेथे पाणी

पिण्यासाठी आले. रात्रीच्या अंधारात त्यांचे तेथे येणे अश्वत्थामादिकांच्या ध्यानात आले नाही. परंतु व्याधांनी मात्र ते संभाषण ऐकून दुर्योधनाचे त्या सरोवरात लपणे ओळखले; आणि धनलोभाने त्यांनी सरळ पांडव शिबिरात जाऊन ती बातमी दिली. ती मिळताच पांडव पुनः सरोवराजवळ आले. त्यांना येताना पाहून अश्वत्थामा, कुतवर्मा व कृपाचार्य तेथून निघून गेले, आणि दुर्योधन पुनः सरोवरात लपून बसला.

पण यावेळी पांडवांनी त्याला आव्हान देऊन बाहेर बोलावले. दुर्योधनाने मायाप्रयोगाने सरोवराचे पाणी स्तम्भित करून टाकल्यामुळे (२९-५४), पांडव स्वतः त्याच्यापावेतो जाऊ शकत नव्हते. दुर्योधन सरोवराच्या आतूनच प्रत्युत्तर देत राहिला. ही बोलाचाली बराच वेळ चालू राहिली. आणि येथे रहस्य हे आहे की, शेवटी दुर्योधन बाहेर येऊन भीमाशी गदायुद्ध करण्यास उभा राहिला, तो पावेतो रात्र समाप्त होऊन दुसरा दिवस उजाडला होता. याचवेळी नारदाच्या आग्रहावरून बलराम तीर्थयात्रा समाप्त करून, भीम व दुर्योधन या आपल्याच दोन्ही शिष्यांचे गदायुद्ध पाहण्यास तेथे आले. त्या दिवशी गदायुद्ध सुमारे अर्धा दिवस चालून भीमाच्या प्रहाराने दुर्योधन खाली पडला. गदायुद्धाच्या त्या अर्ध्या दिवसाला शल्यवध दिवसाच्या अर्ध्या दिवसाच्या लढाईत जोडून महाकवीने खुबीने प्रत्यक्ष लढाईच्या अठराव्या दिवसाची गणना पुरी केली, आणि अशाप्रकारे आणखी एक कूट केले !

या साऱ्या वृत्तांवरून स्पष्ट आहे की शल्यवधाचे दिवशी अपराण्ह काळी भीम-दुर्योधन गदायुद्ध होण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. पण मग त्याच शल्यपर्वाच्या पहिल्या अध्यायात श्लोक १२ मध्ये गदायुद्धास अनलक्षून 'अथापराण्हे तस्यान्हः' कसे म्हटले आहे? त्यात शाब्दिक रहस्य हे आहे की, महाभारतकारांनी तेथे 'अपराण्ह' शब्दाचा प्रयोग दिवसाचा अपराण्ह प्रहर या सामान्य अर्थाने केला नसून 'अपर+अहन्' अर्थात दुसरा दिवस या अर्थाने केला आहे.* म्हणून या श्लोकाचा वास्तविक आशय 'त्याच्या (म्हणजे शल्यवधाच्या) दुसऱ्या दिवशी भीमाने दुर्योधनास खाली पाडले' असा आहे. आधी मध्यान्हाचा मुद्दाम उल्लेख करून त्यानंतर लागलीच 'अपराण्ह' शब्दाचा प्रयोग केल्याने, त्याच्या या दुसऱ्या असाधारण अर्थाची वाचकांच्या मनात सहसा कल्पनाही येत नाही !

या संबंधात दुसरी एक कूटोक्ति महाभारताच्या प्रारंभी आढळून येते.

---

* महाकवीने 'अपराण्हे' शब्दाता काहीसा चमत्कारिक प्रयोग पुढील स्थानींही केला आहे. "अपराण्हेऽपराण्होऽस्य सूतपुत्रस्य मारिष। छिन्नमंजलिकेनाजौ सोत्सेधमपतच्छिरः।।" कर्णपर्व,९१-६४



समग्र महायुद्धाचा सारांश केवळ तीन श्लोकांत देऊन महाकवी म्हणतात-

**अहानि युयुधे भीष्मो दशैव परमास्त्रवित्**
**अहानि पंच द्रोणस्तु ररक्ष कुरुवाहिनीम्।। आदिपर्व, २-३०**
**अहनी युयुधे द्वे तु कर्णः परबलार्दनः**
**शल्योऽर्धदिवसे चैव गदायुद्धमतः परम्।।३१**
**तस्यैव दिवसस्यांते द्रौणिहार्दिक्यगौतमाः**
**प्रगुप्तं निशि विश्वस्तं जघ्नुर्यौधिष्ठिरं बलम्।।३२**

"महास्त्रज्ञाता भीष्माने दहा दिवस युद्ध केले, द्रोणाने पाच दिवस कौरवसेनेचे अधिपत्य केले-३० शत्रुदमन कर्णाने दोन दिवस युद्ध केले, आणि शल्याने अर्धा दिवस; त्यानंतर गदायुद्ध झाले-३१ त्याच दिवसाच्या शेवटी अश्वत्थामा, कृप आणि कृतवर्मा यांनी विजयाने आश्वस्त होऊन गाढ निजलेल्या (शेष) पांडवसैन्याची कत्तल केली.-३२" या श्लोकाच्या बारकाईपूर्ण अध्ययनाने दिसून येईल की, शल्याने (कौरवांचा प्रमुख सेनापति म्हणून) केलेल्या अर्धा दिवस लढाईच्या नंतर गदायुद्ध झाले इतकेच येथे म्हटले असून, त्या दोन्ही घटना शब्दशः एकाच दिवशी झाल्या असे म्हटले नाही. मात्र याच्यापुढे महाकवी म्हणतात की, गदायुद्धाच्याच दिवशी रात्री अश्वत्थामाने कत्तल केली; आणि ते बरोबरच आहे. पण महाकवीने त्या तिन्ही घटना इतक्या खुबीने एकामागून एक उल्लेखिलेल्या आहेत की, त्या सर्व शब्दशः एकाच रोजी झाल्याचा भास होतो.

**एक ओळ जी प्रक्षिप्त नाही**

या भ्रमाने विद्वानांच्या मनावरही किती पगडा बसविला आहे याचे एक उदाहरण पाहा. कुरुक्षेत्रावर युद्ध चालू असता बलरामांनी सरस्वतीच्या किनाऱ्यावर केलेल्या तीर्थयात्रेचे विस्तृत वर्णन शल्यपर्वात आले आहे. त्या यात्रेच्या अंतिम चरणात बलराम वृद्धकन्यातीर्थ नामक स्थानी पोचले असताना त्यांनी युद्धात शल्यवध झाल्याची वार्ता ऐकली.

**तत्रस्थश्चापि शुश्राव हतं शल्यं हलायुधः।। शल्यपर्व,५२-२६**
**तत्रापि दत्वा दानानि द्विजातिभ्यः परंतपः**
**शुश्राव शल्यं संग्रामे निहतं पाण्डवैस्तदा।।२७**
**समन्तपञ्चकद्वारात् ततो निष्क्रम्य माधवः**
**पप्रच्छर्षिगणान् रामः कुरुक्षेत्रस्य यत्फलम्।।२८**

"तेथे असतानाच बलरामांनी शल्य मारला गेल्याचे ऐकले-२६. तेथेही ब्राह्मणांना अनेक दाने देऊन शत्रुनाशक बलरामांनी युद्धात पांडवांच्या हस्ते

शल्य मारला गेल्याचे ऐकले-२७. मग समंतपंचक द्वारातून निघून (कुरुक्षेत्रात प्रवेश करीत) बलरामांनी ऋषींना कुरुक्षेत्राचे (कुरुक्षेत्रात निवास करण्याचे) पुण्यफल विचारले-२८." ही घटना शल्यवधदिवसाच्या अपराण्ह अथवा सायान्ह समयाची असली पाहिजे. यात समंतपंचक व कुरुक्षेत्राचा विशेष उल्लेख दर्शवितो की, यावेळी बलराम रणक्षेत्राच्या जवळून जात होते. तेथून ते तडक विष्णुआश्रम, प्लक्षप्रस्त्रवण व तसेच पुढे कारपवन तीर्थांस गेले. कारपवनावर त्यांनी एक रात्र घालवली -

**सम्प्राप्तः कारपवनं प्रवरं तीर्थमुत्तमम्**
**हलायुधस्तत्र चापि दत्त्वा दानं महाबलः।। शल्यपर्व, ५४-१२**
**तत्रोष्यैकां तु रजनीं यतिभिर्ब्राह्मणैः सह**
**मित्रावरुणयोः पुण्यं जगामाश्रममच्युतः।।१४**

"कारपवनाच्या श्रेष्ठ तीर्थस्थानी पोचून महाशक्तिसंपन्न बलरामांनी तेथेही दान देऊन-१२. तेथे एक रात्र घालवून बलराम ब्राह्मण व मुनींसहित पावन मित्रा-वरुण आश्रमावर आले.-१४"

बलरामांनी (शल्यवधाची बातमी ऐकल्यानंतर) या स्थली एक रात्र मुक्काम केल्याचा हा स्पष्ट उल्लेख अत्यंत महत्त्वाचा आहे. याच रात्रीनंतर बलराम कारपवनातून मित्रावरुण स्थानी गेले; आणि तेथे यमुनेत स्नान करून ते ऋषींबरोबर धार्मिक कथा संवाद करीत असता, नारदमुनींनी तेथे येऊन, त्यावेळी सुरू होण्याच्या बेतात असलेले भीम-दुर्योधनांचे गदायुद्ध पाहण्यास चलण्याची सूचना केली. यावर बलरामांनी आपली तीर्थयात्रा समाप्त करून ते गदायुद्ध स्थळावर गेले, आणि त्यानंतर त्या सकाळच्या वेळी त्यांच्या उपस्थितीत ते गदायुद्ध सुरू झाले. अशा प्रकारे या वर्णनानुसारही शल्यवध आणि गदायुद्ध या दरम्यान एक रात्र गेली होती. याचाच अर्थ असा की, गदायुद्ध शल्यवधाच्या दुसऱ्या दिवशी ('अपर अण्हे') झाले.

पण असे असताही त्या दोन्ही घटना एकाच दिवशी झाल्या या भ्रामक धारणेने ग्रस्त होऊन, आणि शल्यवधाची बातमी ऐकल्यावर बलरामांनी कारपवनात एक रात्र घालविण्याच्या उल्लेखाची त्या धारणेशी संपूर्ण विसंगती पाहून, त्या उल्लेखाची ती वरील ओळ (श्लोक १४ चा पूर्वार्ध) पुणेच्या भांडारकर संशोधन संस्थेने प्रक्षिप्त मानली आहे. परंतु वरील सर्व विवेचन सिद्ध करण्यास पुरेसे आहे की, ही पंक्ती मूळ महाभारताचीच असली पाहिजे. येथे उल्लेखनीय आहे की, तीर्थयात्रेच्या वर्णनात चमसोद्भेद, सप्तसारस्वत, तैजस आदि अन्यही काही स्थानी बलरामांनी एक एक रात्र घालविल्याचे



म्हटले आहे.

शल्यवध आणि गदायुद्ध यामधील एक दिवसाचे हे गूढ अंतर अभ्यासकांच्या ध्यानात आले असते, तर विश्रामदिवस बाजूस ठेवूनही युद्धकालातील एकूण तिथ्या ते अठरा ऐवजी एकोणीस मोजू शकले असते! मात्र वस्तुतः महाभारतकारांनी कुरुक्षेत्रावरील महायुद्धात प्रत्यक्ष लढाईचे दिवस

$१७\frac{१}{२} + \frac{१}{२} = १८$ मोजले असून, मधले विश्राम दिवस जोडून युद्धकालाच्या एकूण दिवसांची (व तिथ्यांची ) संख्या ३५ आहे. याअनुसार तपशीलवार तालिका पुढे प्रकरण १५ मध्ये दिली आहे. ❐

प्रकरण ८

# युद्धकालीन तिथ्या

### बलरामयात्रेचे बेचाळीस दिवस

या साऱ्या स्पष्टीकरणाने महाभारत युद्धाच्या कालगणने विषयीची विविध कूटे आता बरोबर उलगडतात. महाभारतात युद्धकाळ अठरा दिवसांचा दर्शविला आहे. पण ते प्रत्यक्ष लढाईचे दिवस आहेत. युद्धकालाची एकंदर गणना करण्यासाठी त्या दिवसांत प्रत्यक्ष लढाईच्या प्रत्येक दिवसानंतर एक अवकाश दिवस जोडणें आवश्यक आहे. अशाप्रकारे सतरा विश्राम दिवस होतील. मागील प्रकरणात पहिल्याप्रमाणे जरी एक अवकाश दिवस कमी होता, तरी प्रत्यक्ष लढाईचा शेवटचा एक दिवस दोन लागोपाठ दिवसात विभागला गेला; आणि त्यामुळे पूर्ण युद्धकाल पुनः पसतीस दिवसांचा होतो!

या गणनेने आता बलरामयात्रा कालाच्या कूटाचा उलगडा होतो. त्या यात्रेची सुरूवात उपप्लव्यापासून युद्धारंभाच्या सात दिवस अगोदर झाली होती. त्या सात दिवसांत युद्धकालाचे पसतीस दिवस जोडले, म्हणजे यात्रासमाप्ती गदायुद्धाचे वेळी बलरामांच्या वचनात म्हटल्याप्रमाणे बरोबर बेचाळीसाव्या दिवशी होते. त्या श्लोकात दिलेली नक्षत्रेही बरोबर जमतात. (सत्तावीस नक्षत्रांची एक फेरी पूर्ण करून) श्रवण पुष्यापासून बरोबर बेचाळीसाव्या स्थानावर असून, चंद्र दर दिवशी सरासरी एक नक्षत्र पार करतो.

### गीताजयंतीची वास्तविक तिथी

अशा रीतीने युद्धरंभाची म्हणजेच गीताजयंतीची वास्तविक तिथी स्वतः श्रीकृष्ण वचनानुसार वरील अमावास्या ठरते. श्रीकृष्णांनी कर्णास त्या तिथीला युद्ध प्रारंभ करा असे आव्हान केले असतां, नीलकण्ठ आणि काही भाष्याकार 'संग्रामो युज्यताम् तस्याम्' या शब्दांचा अर्थ 'त्या दिवशी युद्धाची तयारी आरंभ करा' असा करतात. परंतु युद्धाची तयारी त्याच्या पूर्वी उभय सैन्ये कुरूक्षेत्रावर पोचली तेव्हाच सुरू झाली; त्या अमावास्येला प्रत्यक्ष लढाईस प्रारंभ व्हावयाचा होता- आणि आता स्पष्ट झाल्याप्रमाणे तो तसा वस्तुतः



झालादेखील. त्या आधारे, आणि मधले विश्राम दिवस मोजून, प्रत्यक्ष लढाईचा चौदावा दिवस म्हणजेच युद्धकालातील सत्तावीसावा दिवस होतो; त्याची तिथी वद्य एकादशी असून त्या तिथीला उत्तर रात्री चन्द्रोदय झाला; आणि ते कूटही आता सुटते. त्या चन्द्रोदयाचे पुढील सुन्दर वर्णन महाभारताच्या मूळ कर्त्याचेच असून, मागाहून कोणी त्यात घातलेले नाही.

ततः कुमुदनाथेन कामिनीगण्डपाण्डुना
नेत्रानन्देन चन्द्रेण माहेन्द्री दिगलङ्कृता।। द्रोणपर्व,१८४-४६
दशशताक्षककुब्दरिनिसृतः
किरणकेसरिभासुरपिंजरः
तिमिरवारणयूथनिवारणः
समुदियादुदयाचलकेसरी।।४७
हरवृषोत्तमगात्रसमद्युतिः स्मरशरासनपूर्णसमप्रभः
नववधूस्मितचारुमनोहरः प्रविसृतः कुमुदाकरबांधवः।।४८
ततो मुहूर्ताद् भगवान् पुरस्ताच्छशलक्षणः
अरुणं दर्शयामास ग्रसन् ज्योतिः प्रभाः प्रभुः।।४९
अरुणस्य तु तस्यानु जातरूपसमप्रभम्
रश्मिजालं महच्चन्द्रो मन्दं मन्दमवासृजत्।।५०
उत्सारयन्तः प्रभया तमस्ते चंद्ररश्मयः
पर्यगच्छञ्शनैः सर्वा दिशं खं च क्षितिं तथा।।५१
ततो मुहूर्ताद् भुवनं ज्योतिर्भूतमिवाभवत्
अप्रख्यमप्रकाशं च जगामाशु तमस्तथा।।५२
ततः प्रववृत्ते युद्धं पुनरेव विशाम्पते।...५६

"त्यानंतर नेत्रांना आनंददायक, श्वेतकमलनाथ, व रमणीच्या कपोलसदृश पांडुवर्ण चन्द्राने इन्द्राची (म्हणजे पूर्व) दिशा सुभोभित केली-४६ गुहेतून सिंह बाहेर यावा तद्वत चन्द्रबिंब इन्द्राच्या स्वामित्वाखालील पूर्व दिशेच्या बाहेर येऊन उदयाचलावर दृश्यमान झालें; सिंहाच्या आयाळाच्या लांब केसासमान भासणारी आपली पिंगळ वर्णाची किरणें प्रसारित करीत, चन्द्राने एखादा सिंह हत्तीच्या कळपांना विदीर्ण करून टाकतो तद्वत, अंधःकाराला नष्ट करून टाकले- ४७. शंकराच्या श्रेष्ठ वृषभाच्या अर्थात नंदीच्या (श्वेत) शरीराप्रमाणे कांतिमान, कामदेवाच्या (श्वेत) पुष्पधनुष्याप्रमाणे प्रभेने परिपूर्ण, नववधूच्या मधुर स्मितप्रमाणे मनोहर, व (चन्द्रोदयाबरोबर उमलणाऱ्या) कमलांच्या समूहाचा (अथवा श्वेत कमल युक्त सरोवराचा) प्रियमित्र असा चन्द्र हळूहळू सर्व दिशांनी

प्रकाश पसरवू लागला- ४८. सुमारे एक मुहूर्तानंतर शशलक्षण भगवान चन्द्र नक्षत्रांची प्रभा फिकी करीत आपला अरुण प्रकाश दर्शवू लागला-४९. अरुणकांतीनंतर चन्द्राने हळूहळू सुवर्णाच्या प्रभेसमान आपल्या किरणांचे विशाल जाल पसरवून दिले- ५०. चन्द्रकिरणें आपल्या प्रकाशाने अंधःकाराला दूर सारीत हळूहळू साऱ्या दिशांना, भूतलाला, व आकाशालाही व्याप्त करू लागलीं- ५१. नंतर थोड्या क्षणांतच समस्त भूभाग जणू ज्योतिर्मय झाला, व लवकरच अंधार पूर्ण नाहीसा होऊन गेला-५२. राजा, तदनंतर युद्ध पुनः चालू झाले-५६"

हे सर्व स्पष्टपणें पूर्व दिशेला क्षितीजावर दिसणाऱ्या प्रत्यक्ष चन्द्रोदयाचें मार्मिक वर्णन असून, महाभारतयुद्धाच्या गूढ कालगणनेशी पूर्ण सुसंगत आहे. काही भाष्यकारांनी सुचविल्याप्रमाणें तें केवळ मेघावरणातून बाहेर पडणाऱ्या चन्द्राचे वर्णन नव्हे.

**भीष्मनिधनाची वास्तविक तिथी**

आणि भीष्मनिधनतिथीच्या कूटाचाही हा सरळ उलगडा पाहा. त्या अमावास्येला युद्धारंभ झाल्यावर प्रत्यक्ष लढाईचा दहावा (मधले विश्रांती दिवस मिळून एकूण युद्धकालाचा एकोणिसावा) दिवस पुढील वद्य तृतीयेला येतो. त्या दिवशी सायंकाळी भीष्मांचे रणभूमीवर पतन झाले, आणि तेव्हापासून त्यांची भीषण शरशय्या प्रारंभ झाली. त्या वद्य तृतीयेपासून आपण एकूण ५८ रात्री मोजू.

१३ रात्री, त्या कृष्ण पक्षाच्या शेष
१५ रात्री, पुढील शुक्ल पक्षाच्या (पौष मास)
१५ रात्री, त्यानंतर येणाऱ्या कृष्ण पक्षाच्या
<u>१५</u> रात्री, पुढील शुक्ल पक्षाच्या (माघ मास)
५८

या गणनेप्रमाणे आपण माघ शुक्ल पौर्णिमेच्या रात्रीच्या समाप्तीकालावर येऊन पोहोचतो. आणि याच उषःकालसमयी महात्मा भीष्मांचे निधन झाले. त्यावेळी महाभारतात म्हटल्याप्रमाणे महिना माघ व पक्ष शुक्ल होता. आता प्रश्न राहिला महाकवीच्या 'त्रिभागशेष' शब्दाचा. त्याचा वास्तविक आशय हा आहे की, त्यावेळी त्या शुक्ल पक्षाचे (अर्थात त्याची जी अंतिम तिथी पौर्णिमा तिच्या समाप्ती कालाचे) तीन 'मुहूर्त' शेष होते. 'भाग' शब्दाचा अर्थ येथे 'मुहूर्त' असा आहे. एका दिवसात तीस मुहूर्त असतात. येथे 'त्रिभाग' शब्दाचा आशय त्या शुक्ल पक्षाचा, अगर त्या माघ महिन्याचाही, गणिताच्या हिशोबाने



तीन चतुर्थांश भाग असा नव्हे. कूटसम्राट महाकवीच्या या एका श्लेषात्मक 'त्रिभागशेष' शब्दानेही ('अपराण्हे' प्रमाणे) इतक्या दीर्घकाल पसरलेला भ्रम पाहिला, म्हणजे मन आश्चर्याने थक्क होतें*।

आता हे उघड होईल की, महाभारताच्या काही पोथ्यांत शांतिपर्व अध्याय ४७ च्या सुरवातीस आढळणारा पुढील श्लोक अनधिकृत (इंटरपोलेशन) मानला पाहिजे "शुक्ल पक्षस्य चाष्टम्यां माघमासस्य पार्थिव। प्राजापत्ये च नक्षत्रे मध्यं प्राप्ते दिवाकरे।।". यांत माघ शुक्ल अष्टमीचा मध्यान्हकाल म्हटला असून तो भीष्मनिधन समय आहे असा अर्थ केला जातो. पण महाभारतात दिलेले अनेक कालगणनात्मक (आणि ज्योतिषात्मक) संकेत याच्या विरूद्ध जातात. आणि जर भीष्मांचे प्राणोत्क्रमण मध्यान्हप्रहरी झाले असते, तर त्यांनी शरशय्येवरील आपला काळ 'अठ्ठावन रात्री' असा न मोजता, त्यांत अर्धा (अथवा एक चतुर्थांश) 'अहन्' जोडला (किंवा कमी केला) असता. पण वर पाहिल्याप्रमाणे तो काळ बरोबर अठ्ठावन रात्री होता. वस्तुतः शांतिपर्वाच्या या संपूर्ण अध्यायांत भीष्मांनी मृत्यूच्या काही दिवस पूर्वी (माघ शु. दशमीला) केलेले श्रीकृष्णांचे ध्यान दिले असून, त्या ध्यानानंतर त्यांची श्रीकृष्णांशी प्रत्यक्ष भेट होऊन त्यांनी पाच दिवस शरशय्योपदेश केल्यावर प्राणत्याग केला. या साऱ्या संदर्भात वरील श्लोक उघडच गैरलागू असून, तो गाळला तरी एकूण कथनाच्या ओघात बाधा पोचत नाही, हे आढळून येईल.

आणखी एक खुलासा. अठ्ठावनावी रात्र म्हणजे पौर्णिमेचीच रात्र असल्याने ती समाप्त झाली की, शुक्ल पक्षही समाप्त होतो, आणि म्हणून जर भीष्मनिधन शुक्ल पक्षात झाले असेल तर ती अठ्ठावनावी रात्र त्यावेळी पूर्ण समाप्त नव्हती, किंवा तें निधन कृष्णपक्षात झालें म्हणावे लागेल अशी शंका कोणी उपस्थित करील. पण महाभारतात, येथे 'रात्री' शब्दाचा उपयोग आहे. संस्कृतांत शास्त्रीय परिभाषेनुसार 'निशा' शब्दात सूर्यास्तापासून सूर्योदयापावेतोचा पूर्ण समय येतो; परंतु 'रात्रि' मध्ये दोन्हीकडचे सन्धासमय समाविष्ट नाहीत. म्हणून भीष्मनिधनाच्या वेळी अठ्ठावन रात्री पूर्ण झाल्या होत्या आणि तरीही शुक्ल पक्ष होता हें महाकवीचें वचन बरोबर ठरते. कारण ती घटना कृष्णपक्षाच्या प्रथम सूर्योदयाच्या पूर्वी उषःकालात होत होती. महाभारतात अन्यत्रही रात्रि व निशा या शब्दांचा असाच सूक्ष्म उपयोग केला आहे. आणि आता

* 'भाग' शब्दाचा 'मुहूर्त' या अर्थाने उपयोग महाभारतात अन्यत्र ही आला आहे, पाहा द्रोणपर्व, १८६-१, १९१-९

महाभारतकारांनी येथे त्या शुक्ल पक्षाला अनुलक्षून 'भवति' असे सरळ न म्हणता, 'भवितुम् अर्हति' असे आडवळणातले शब्द का घातले हेही स्पष्ट होईल. पौर्णिमेची 'रात्र' संपली होती, तरीही कृष्णपक्षास प्रत्यक्ष प्रारंभ झाला नसल्याने, त्या संधिकालास शुक्ल पक्ष मानणे उचित आहे असे भीष्मांचे तें मार्मिक वचन आहे.

### तिथ्यांचे काही संकेत

महाभारतयुद्धातील विश्रामदिवस (व आणखीही काही रहस्यपूर्ण संकेत) ध्यानात घेतले म्हणजे महाकवीने निश्चित संख्येत निर्देशिलेल्या दिनगणनांचा व तिथ्यांचा हिशेब अशा प्रकारे बरोबर लागतो. पण त्याशिवायही याची अन्य सूक्ष्म प्रमाणे महाभारताच्या श्लोकांत उपलब्ध होतात. त्यातील काही या प्रकरणात पाहू.

वाचकांनी युद्धतिथ्याविषयक तीन भिन्न गणना दृष्टीसमोर ठेवणे इष्ट होईल, प्रथम गणनेनुसार अमावास्येला युद्धारंभ होऊन, लढाई शेवटपावेतो (वर सांगितलेला एक अपवाद वगळून) एक दिवसा आड झाली. द्वितीय गणनेप्रमाणे युद्धारंभ अमावास्येला झाला, परंतु लढाई लागोपाठ दररोज झाली. तिसऱ्या गणनेनुसार युद्धारंभ मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला होऊन लढाई दररोज चालली. या तीन गणनांच्या आधारे प्रत्यक्ष लढाईचे दिवस क्रमशः पुढील तिथ्यांवर येतात.

| लढाईचा दिवस | | प्रथम गणना | द्वितीय गणना | तृतीय गणना |
|---|---|---|---|---|
| १ | (गीता जयंती) | अमावास्या | अमावास्या | शुक्ल एकादशी |
| २ | | शुक्ल द्वितीया | शुक्ल प्रतिपदा | शुक्ल द्वादशी |
| ३ | | शुक्ल चतुर्थी | शुक्ल द्वितीया | शुक्ल त्रयोदशी |
| ४ | | शुक्ल षष्ठी | शुक्ल तृतीया | शुक्ल चतुर्दशी |
| ५ | | शुक्ल अष्टमी | शुक्ल चतुर्थी | पौर्णिमा |
| ६ | | शुक्ल दशमी | शुक्ल पंचमी | वद्य प्रतिपदा |
| ७ | | शुक्ल द्वादशी | शुक्ल षष्ठी | वद्य द्वितीया |
| ८ | | शुक्ल चतुर्दशी | शुक्ल सप्तमी | वद्य तृतीया |
| ९ | | वद्य प्रतिपदा | वद्य अष्टमी | वद्य चतुर्थी |
| १० | (भीष्म पतन) | वद्य तृतीया | वद्य नवमी | वद्य पंचमी |
| ११ | | वद्य पंचमी | वद्य दशमी | वद्य षष्ठी |
| १२ | | वद्य सप्तमी | वद्य एकादशी | वद्य सप्तमी |
| लढाईचा दिवस | | प्रथम गणना | द्वितीय गणना | तृतीय गणना |



| | | | | |
|---|---|---|---|---|
| १३ | (अभिमन्यु वध) | वद्य नवमी | वद्य द्वादशी | वद्य अष्टमी |
| १४ | (जयद्रथ वध) | वद्य एकादशी | वद्य त्रयोदशी | वद्य नवमी |
| १५ | (द्रोण वध) | वद्य द्वादशी | वद्य चतुर्दशी | वद्य दशमी |
| १६ | | वद्य चतुर्दशी | पौर्णिमा | वद्य एकादशी |
| १७ | (कर्णवध) | शुक्ल प्रतिपदा | वद्य प्रतिपदा | वद्य द्वादशी |
| १७ | १/२ (शल्य वध) | शुक्ल तृतीया | वद्य द्वितीया | वद्य त्रयोदशी |
| १८ | (गदायुद्ध) | शुक्ल चतुर्थी | | |

आता विशेष असे की, महाभारतकारांनी लढाईच्या प्रत्येक दिवसाचे वर्णन देताना काही प्रसंगी सूर्यास्त होताच सर्वत्र अंधार व्यापल्याचे म्हटले आहे. काही दिवशी सूर्यास्ताबरोबर लढाई स्थगितं झाली. उलट काही दिवशी ती सूर्यास्तानंतरही काही वेळ चालू राहिली; त्यात सूर्यास्तानंतर पर्याप्त चन्द्र प्रकाशाचा संकेत मिळतो. केवळ प्रत्यक्ष लढाईच्या चौदाव्या दिवशी सूर्यास्तानंतर संपूर्ण अंधःकार असताही लढाई मध्यरात्रीपावेतो मशालींच्या उजेडात चालल्याचे वर्णन आहे. या संदर्भात वरील तिथिगणनांचे परीक्षण केले तर प्रथम गणना अशा सर्व संकेतांशी जुळते, पण बाकी दोघांचा काही संकेतांशी समन्वय झाला तरी अन्य संकेतांनी त्यांचे खंडन होते.

युद्धारंभाच्या दिवशी सूर्यास्त होताच लढाई थांबली.

**ततः सैन्येषु भग्नेषु मथितेषु च सर्वशः**
**प्राप्ते चास्तं दिनकरे न प्राज्ञायत किञ्चन।। भीष्मपर्व, ४९-५२**

"त्यानंतर सैन्यें अत्यंत पीडित व अस्ताव्यस्त झाली; आणि सूर्य अस्तास गेल्यावर कोणास काहीच ओळखता येईना." सूर्यास्त होताच इतका अंधार झाला हे या दिवशी शुक्ल एकादशी असल्याचे खंडन करून अमावास्येची पुष्टी करते.

यानंतर प्रत्यक्ष लढाईच्या दुसऱ्या, तिसऱ्या, चौथ्या व पाचव्या दिवशीही सूर्यास्तानंतर लढाई बंद झाली, पण त्यात अंधाराचा असा संकेत नाही. याचा अर्थ असा की, चंद्रप्रकाश होता, पण तो इतका फिकट की, सूर्यास्तानंतर थोडा वेळही लढाई चालू ठेवली नाही. प्रथम गणनेच्या तिथ्या याच्याशी सुसंगत आहेत. सहाव्या दिवशी सूर्यास्तानंतर अंधाराचा उल्लेख नाही, पण सूर्यास्तानंतर लढाई आणखी काही वेळ चालू राहिल्याचा सर्वप्रथम उल्लेख येतो.

**अन्योन्यागस्कृतां राजन् यमराज्यविवर्धनम्**
**मुहूर्तास्तमिते सूर्ये चक्रुर्युद्धं सुदारुणम्।। भीष्मपर्व, ७९-६०**

"राजा (धृतराष्ट्र), सूर्यास्त झाल्यावर एक मुहूर्तभर योध्द्यांनी परस्परांवर भीषण प्रहार करीत यमलोकाची वृद्धी करणारे महाभयंकर युद्ध केले." हे शुक्ल दशमींचे समर्थन व तृतीया गणनेच्या कृष्ण प्रतिपदेचें खंडन करितें. सातव्या दिवशीही सूर्यास्तानंतर लढाई काही वेळ चालू राहिल्याचे म्हटले आहे, आणि तेही पुनः अंधाराच्या संकेता शिवाय. हें देखील प्रथम गणनेची पुष्टी करून तिसऱ्या गणनेचें खंडन करतें.

यानंतर आपण प्रत्यक्ष लढाईच्या आठव्या दिवसाकडे येतो. त्या दिवशीही सूर्यास्तानंतर लढणे चालू राहिले. त्या दिवशींच्या सूर्यास्ताचा पुढील श्लोकात उल्लेख आहे.

**एवं तव बलं सर्वं हेडिम्बेन दुरात्मना**
**सूर्यास्तमवेलायां प्रभग्नं विद्रुतं दिशः।।भीष्मपर्व, ९४-५०**

म्हणजे असे की, सूर्यास्तसमयी घटोत्कचाच्या भयंकर पराक्रमामुळे कौरवसेना त्राहि भगवान करू लागली. यांतर सेनापति भीष्मांनी भगदत्ताला घटोत्कचाच्या प्रतिकारार्थ पाठविले. यावर पुनः भयानक युद्ध भडकले. आणि याप्रमाणे लढाई चालू असता (९६-७८) 'रात्रि' समय प्राप्त झाला. संजय म्हणतो-

**रात्रिः समभवत् तत्र नापश्याम ततोऽनुगान्**
**ततोऽवहारं सैन्यानां प्रचक्रुः कुरुपाण्डवाः।।भीष्मपर्व ९६-७९**
**....न्यविशन्त यथाकालं गत्वा स्वशिबिरं तदा।।८०**

"या परिस्थितीत रात्रीचा समय प्राप्त झाला व आम्हाला आमचे मागचे (अतिरिक्त बाण वगैरे सामग्री घेऊन येणारे) सेवक नीट दिसेनात. त्यावेळी कौरवपांडवानी आपापल्या सैन्याला परतण्याचा आदेश दिला -७९ ..... आणि शिबिरात पोचून ते नेहमीप्रमाणे विश्राम करू लागले-८०". वर म्हटल्याप्रमाणे 'निशा' सूर्यास्तसमयी तर 'रात्रि' काही वेळानंतर प्रारंभ होते. अंधकाराचा उल्लेख न करता कांही वेळ लढणे चालू राहण्याचे वर्णन चन्द्रप्रकाश दर्शवून, प्रथम गणनेच्या शुक्ल चतुर्दशीचे समर्थन करते.

पण मग संजय (जो कौरवांकडून लढत असे) रात्रिसमय आल्यावर "नापश्याम ततोऽनुगान्" असे का म्हणतो? त्या युद्धात कौरवांनी रणभूमीची पश्चिम बाजू व्यापली होती आणि म्हणून लढताना त्यांच्या सैन्याचे तोंड पूर्व दिशेकडे असे (हे प्रकरण १७ मध्ये स्पष्ट केले आहे). म्हणून शुक्ल चतुर्दशीच्या



त्या रात्रिप्रारंभकाली कौरव योद्ध्यांवर समोरून स्वच्छ चन्द्र प्रकाश पडत होता, आणि त्यांची छाया मागे अनुचरांवर पडून ते नीट दिसेनासे झाले. ती छायाही एक दोन माणसांची नव्हे, तर हत्ती, रथ इत्यादींनी युक्त विशाल सैन्याची. 'रात्रिपूर्व' समयांत अस्तंगत सूर्याचा संधिप्रकाश पश्चिमेकडून येत राहिला; पण 'रात्रि' प्रारंभ झाल्यावर तोही बंद झाला; आणि उलट, चन्द्राचे जवळजवळ पूर्ण बिंब पूर्वाकाशात आणखी वर चढून पश्चिमेस पडणारी छाया अधिक दाट झाली.

याउलट, जेव्हा चन्द्रप्रकाशरहित अंधार सूचित करावयाचा असतो, तेव्हा महाभारत म्हणते की त्यावेळी कोणालाही मागे अगर पुढे काहीच दिसत नसे. या संदर्भात लढाईच्या प्रथम दिवसाच्या, व अकराव्या दिवसाच्या, सूर्यास्त दृश्याचे वर्णन पाहावे. आणि त्याशिवाय, चवदाव्या दिवशींच्या पूर्वरात्रिकालाचेही हे वर्णन पाहा-

**तमसा चावृते लोके न प्राज्ञायत किंचन।। द्रोणपर्व, १५४-२२**

"सर्वत्र अंधःकार व्याप्त होऊन कोणाला काहीच नीट ओळखता येईना". आणि तसेच प्रत्यक्ष लढाईच्या सोळाव्या दिवशी (वद्य चतुर्दशीला)-

**गिरिमस्तं समासाद्य प्रत्यपद्यत भानुमान्।। कर्णपर्व, ३०-३७**
**तमसा च महाराज रजसा च विशेषतः**
**न किंचित् प्रत्यपश्याम शुभं वा यदि वाशुभम्।।३८**

"सूर्याचा अस्त झाला व सर्वत्र अंधःकार व त्यातही विशेष रूपाने धूळ व्याप्त होऊन शुभ वा अशुभ (मित्र वा शत्रू) काहीच उमजत नव्हते." लढाईच्या आठव्या दिवशी अशी स्थिती नव्हती.

श्लोक ९६-७९ मध्ये "नापश्याम ततोऽनुगान्" ऐवजी भांडारकर संस्था व काही अन्य 'नापश्याम ततो रणम्' असा पाठ स्वीकारतात. तो घेतला तरी येथे 'रणम्' चा अर्थ रणभूमी ऐवजी प्रत्यक्ष लढाई असा होऊ शकेल. (महाकवीने त्या शब्दाचा असा उपयोग भीष्मपर्व ९८-२३ मध्ये केला आहे.) आणि मग त्या वचनाचा अर्थ असा होईल,"आम्ही त्यानंतर लढाई चालू पाहिली नाही, अर्थात लढणे स्थगित झाले."

नवव्या दिवशी प्रथम गणनेनुसार वद्यपक्षाची प्रतिपदा होती. त्या दिवशी सूर्यास्तानंतरचे दृश्य विशेष 'घोर' भासत होते असा दोनदा उल्लेख आहे.

**युद्ध्यतामेव तेषांतु भास्करेऽस्तमुपागते**
**संध्या समभवत् घोरा नामश्याम ततो रणम्।। भीष्मपर्व, १०७ -१**
**तस्मिन् रात्रिमुखे घोरे पांडवा वृष्णिभिःसह**

**सृञ्जयाश्च दुराधर्षा मन्त्राय समुपाविशन्।।१०**

"याप्रमाणे दोन्ही सैन्ये युद्ध करीत असतां सूर्यास्त होऊन संध्यासमय घोर (भयाण) भासू लागला, व आम्ही त्यानंतर लढाई चालू पाहिली नाही (लढणे स्थगित झाले) - १. त्या घोर रात्रिप्रारंभकाली वृष्णींसह पांडव व शूर सृंजय गुप्त विचारविनिमयार्थ एकत्र बसले-१०". त्या वद्य प्रतिपदेस सूर्यास्तानंतरचा समय चन्द्रप्रकाशाच्या अभावी रणभूमीवर अधिकच भयाण प्रतीत होत होता. महाभारतात चन्द्रप्रकाशयुक्त सायंकाळचे 'घोर' असे वर्णन केलेले आढळत नाही.

लढाईच्या दहाव्या दिवशींच्या (प्रथम गणनेनुसार) वद्य तृतीया तिथीची एक स्पष्ट पुष्टी पाहा. महाकवी म्हणतात की, त्या दिवशी सकाळी सूर्योदयानंतर "अवाक्शिराश्च भगवान् उपातिष्ठत चन्द्रमाः" (भीष्मपर्व ११२-१२), "भगवान चन्द्र आकाशात डोके खाली करून दृश्यमान होता." पश्चिम क्षितीजाकडे खाली जाणाऱ्या चन्द्रबिंबाचे असे दृश्य (स्वच्छ आकाशात) कोणत्याही वद्य तृतीयेला सूर्योदय समयी दिसू शकते. द्वितीय गणनेच्या शुक्ल नवमीला ते संभव नाही.

लढाईच्या अकराव्या दिवशी प्रथम गणनेने वद्य पंचमी असून, महाभारतांत म्हटल्या प्रमाणें सूर्यास्त होतांच सर्वत्र अंधार पसरला.

**सूर्ये चास्तमनुप्राप्ते तमसा चाभिसंवृते**
**नाज्ञायत तदा शत्रुर्न सुहृन्न च कश्चन।।द्रोणपर्व, १६-४९**

"सूर्यास्त झाल्यावर सर्वत्र अंधार व्याप्त होऊन शत्रू किंवा मित्र कोणीही नीट ओळखू येईना."

यानंतर प्रत्यक्ष लढाईचा चौदावा दिवस पाहा. याच्या रात्रीची वर विस्तृत चर्चा झाली आहे. या दिवशी सूर्यास्त होताच सर्वत्र अंधार झाला, मात्र तरीही मशाली जाळून मध्यरात्रीपावेतो लढाई चालली. त्या रात्री असा अंधार, व नंतर उत्तररात्री चंद्रोदय, द्वितीय गणनेचे खंडन करून प्रथम गणनेची संपूर्ण पुष्टी करतो हे पुनः सांगणे नकोच.

**धर्मयुद्धाचे नियम**

सूर्यास्तानंतर लढणे चालू राहिल्याचे महाभारतात असे कित्येक उल्लेख असताही, अशी समजूत प्रसृत होऊन गेली की, त्या युद्धात दररोज लढणें सूर्यास्तावर स्थगित होत असे. वस्तुतः तसे प्रतिदिवशी झाले नाही आणि कौरवपाण्डवांचा तसा युद्धनियमही नव्हता. उभय पक्षांनी त्या युद्धासाठी काही नियम मान्य केले होते, परंतु महाकवीने ते सांगण्यातही पुनः संदिग्ध शब्द



वापरले आहेत.

**ततस्ते समयं चक्रुः कुरुपांडवसोमकाः। भीष्मपर्व, १-२६**
**धर्मान् संस्थापयामासुर्युद्धानाँ भरतर्षभ**
**निवृत्ते विहिते युद्धे स्यात्प्रीतिर्नः परस्परम्।।२७**
**वाचा युद्धप्रवृत्तानां वाचैव प्रतियोधनम्**
**निक्रांताः पृतनामभ्यात् न हन्तव्याः कदाचन।।२८**

"यानंतर कौरव, पाण्डव व सोमक वीरांनी त्या युद्धांत लढणे नियमित करण्यासाठी काही नियम केले. युद्धाच्या दरम्यान प्रत्यक्ष लढण्यापासून निवृत होण्याच्या (लढणे स्थगित करण्याच्या) काळात आम्ही परस्परांशी सलोख्याचा व्यवहार करावा (दगलबाजीने हल्ला करू नये)...लढाईत शब्दांचे उत्तर शब्दांनीच द्यावे, रणभूमी सोडून पळून जाणाऱ्याची कधीही हत्या करू नये." येथे केवळ "निवृत्ते विहिते युद्धे" (युद्धाच्या दरम्यान प्रत्यक्ष लढाईपासून निवृत्त होण्याच्या काळात) इतकेच म्हटले आहे.. पण कित्येक भाषांतरकार त्यांत स्वतःच 'सूर्यास्तानंतर' 'रात्रिसमयी' इत्यादी शब्द जोडून देतात.* परंतु आता स्पष्ट होईल की, महाकवीने आपल्या त्या शब्दात युद्धकालाच्या दरम्यान येणारे विश्रामदिवसही खुबीने अंतर्भूत केले आहेत, आणि प्रतिदिवशी लढाईचे स्थगन बरोबर सूर्यास्तावरच होण्याचे म्हटले नाही.

आता या सर्व तथ्यांच्या आधारे त्या महायुद्धाची संपूर्ण सुसंगत दैनंदिनी प्रकरण १५ मध्ये दिली आहे. त्यांत युद्धकालातील घटनांशिवाय युद्ध समाप्तीनंतर पांडवांनी नदीतटावर घालवलेला शौचपालनाचा एक महिनाही तंतोतंत दाखविला आहे. तो महिना कमी करून केवळ बारा दिवस मोजण्याचे कारण नाही. जे त्या प्रकारे मोजू पाहतात त्यांचे म्हणणे असे आहेकी, शौच (अशौच) पालनाचे पहिले अठरा दिवस युद्धाच्या अठरा दिवसातच मानले जावे, का की लढाईच्या प्रथम दिवसापासूनच योद्धे मरत होते. परंतु महाकवीने शौचपालनाचा तो पुरा महिना संपूर्ण युद्धसमाप्तीच्या पश्चात झालेल्या दाहक्रियेनंतर दाखविला आहे. याशिवाय, आता सिद्ध होत असल्याप्रमाणे युद्धकालाचे एकूण दिवसही अठरा नसून पसतीस होते. आणि शौचपालन करीत असताच लढणेही चालू ठेवणे ही कल्पनाच विचित्र नाही काय? □

---

* उदाहरणार्थ, पाहा श्री राजगोपालाचार्य लिखित The Mahabharata, p 205, व गीता प्रेसने या श्लोकाचे दिलेले हिंदी भाषांतर.

प्रकरण ९

# काही विश्राम दिवसांची सूक्ष्म प्रमाणे

महाभारतात युद्धाचे विश्राम दिवस लक्षात घेऊन त्या आधारे एकूण युद्धकाल पसतीस दिवस मोजला, म्हणजे युद्धकालातील विविध घटनांशी संबद्ध कालगणनात्मक कूटे सुसंगत सुटतात हे आपण येथोपावेतो पाहिले. पण याशिवाय विशिष्ट विश्राम दिवसांचे सूक्ष्म संकेतही महाभारताच्या श्लोकांत आहेत.

### आठवा विश्रामदिवस

प्रत्यक्ष लढाईच्या आठव्या व नवव्या दिवसाच्या दरम्यान दुर्योधनाची दुःशासन आदींशी गुप्त बैठक झाली. त्यात कर्णाने म्हटले की, भीष्म युद्धातून निवृत्त होतील तर मी पांडवांना तत्काल जिंकीन. या दृष्टीने भीष्मांचे मन वळविण्यासाठी दुर्योधन मोठ्या लवाजम्यासह भीष्मांच्या शिबिराकडे गेला. पण भीष्मांनी निवृत्त होण्या ऐवजी पुढील दिवशी पराक्रमाची पराकाष्ठा करण्याचे आश्वासन दिले. यानंतर दुर्योधन परत आला. यावेळी रात्रिसमय होता; हे यावरून स्पष्ट आहे की दुर्योधनाच्या त्या मिरवणुकीत दीप जळत होते, (भीष्मपर्व ९७-३१,३२). शिवाय संभाषणाच्या शेवटी भीष्म दुर्योधनास म्हणाले-

**सुखं स्वपिहि गांधारे श्वोऽपि कर्ता महारणम्**
**ये जनाः कथयिष्यन्ति यावत् स्थास्यति मेदिनी।।भीष्मपर्व ९८-२३**

"दुर्योधना, आता तू (परत जाऊन) स्वस्थ झोप घे. उद्या मी असा भीषण संग्राम करीन की, जगाच्या अंतापावेतो लोक त्याचे वर्णन करीत राहतील." याप्रमाणे दुर्योधन आपल्या शिबिरात गेला.

**प्रविष्टः स निशां तां च गमयामास पार्थिवः**
**प्रभातायां च शर्वर्यां प्रातरुत्थाय तान् नृपः ।।१८-२६**
**राज्ञः समाज्ञापयत सेनां योजयतेति ह**
**अद्य भीष्मो रणे क्रुद्धो निहनिष्यति सोमकान्।।२७**

"तदनंतर (आपल्या शिबिरात) प्रवेश करून राजा दुर्योधनाने ती रात्र घालविली; व रात्र संपून पहाट झाल्यावर प्रातःकाळी उठून त्याने (आपल्या सैन्यातील) राजांना आदेश दिला की, सेनेला लढाई साठी तयार होण्याची आज्ञा द्या, आज क्रुद्ध भीष्म रणभूमीवर सोमकांचा विनाश करणार आहेत." त्या दुर्योधन- भीष्म भेटीच्या वेळी रात्र होती याचा उल्लेख श्लोक ९८-२८ मध्येही आला आहे.*१

दुर्योधनाची ही भीष्मभेट कोणत्या रात्री झाली? ज्यांना अवकाश दिनांची कल्पना नाही ते साहजिकच ही घटना लढाईच्या आठव्या दिवशीच्या रात्रीची मानतात.*२ पण मागील प्रकरणात दाखविल्याप्रमाणे या दिवशी लढणें सूर्यास्तानंतरही रात्रिप्रारंभापावेतो चालू राहून. तत्पश्चात उभय सेना अतिशय थकलेल्या अवस्थेत आपापल्या शिबिरात गेल्या व आराम करू लागल्या. आणि दिवसभराच्या भीषण लढाईनंतर अतिशय थकलेल्या ('श्रान्तेषु भग्नेय मृदितेषुच' भीष्मपर्व, ९६-७८) आपल्या सैन्याच्या अत्यावश्यक विश्रामात व्यत्यय आणून त्याच रात्री दुर्योधनाने भीष्मशिबिराकडे ती विशाल मिरवणूक काढली असेल काय? तिचे हे वर्णन पाहा-

**तं प्रयान्तं नरव्याघ्रं भीष्मस्य शिबिरं प्रति**
**अनुजग्मुर्महेश्वासाः सर्वलोकस्य धन्विनः।।भीष्मपर्व, ९७-२३**
**भ्रातरश्च महेश्वासास्त्रिदशा इव वासवम्**
**हयानन्ये समारुह्य गजानन्ये च भारत ।। २४**
**रथानन्ये वरश्रेष्ठं परिवव्रुः समन्ततः। २५**
**प्रगृह्णन्नञ्जलीन् नृणामुद्यतान् सर्वतो दिशः**
**शुश्राव मधुरा वाचो नाना देशनिवासिनाम् ।।२९**
**संस्तूयमानः सूतैश्च मागधैश्च महायशाः**
**पूजयानश्च तान्सर्वान् सर्वलोकेश्वरेश्वरः।।३०**
**प्रदीपैः काञ्चनैस्तत्र गन्धतैलावसेचितैः**
**परिवव्रुर्महाराज प्रज्वलद्भिः समन्ततः।।३१**
**काञ्चनोष्णीषिणस्तत्र वेत्रझर्झरपाणयः**
**प्रोत्सारयन्तः शनकैस्तं जनं सर्वतो दिशम्।।३३**

*१ खरे म्हणजे ही घटना रात्री झाली हे निर्विवादच आहे. ती दिवसा झाली म्हटले तर विश्रामदिवस आपोआपच सिद्ध होईल; कारण प्रत्यक्ष लढाईचे दिवशी ती दिवसाचे वेळी शक्य नव्हती.

*२ उदाहरणार्थ, भांडारकर संस्थेद्वारा प्रकाशित Bhishma Parvan, Introduction, P.C XVIII.

"भीष्मांच्या शिबिराकडे जात असता त्या पुरूषसिंहाच्या (दुर्योधनाच्या) मागोमाग देशोदेशीहून त्याच्या (सैन्यांत) आलेले धनुर्धारी महावीर (योद्धे) व त्याचे स्वतःचे महाधनुर्धारी भाऊ, इन्द्राच्या मागे चालणाऱ्या देवांसमान चालत होते. भरतश्रेष्ठा, त्यातील काही घोड्यांवर, काही हत्तीवर तर कांही रथात आरूढ होते, व त्यांनी त्या नरश्रेष्ठ दुर्योधनाला सर्व बाजूंनी घेरून ठेवले होते-२३, २४,२५. यावेळी नाना देशींच्या रहिवाशांनी चारी दिशांकडून वर केलेल्या नमस्कारांजलीचा स्वीकार करीत दुर्योधन त्यांचे मधुर स्तवन श्रवण करीत होता. सूत, मागध, आदि त्या महायशस्वी सर्वराजाधिराज दुर्योधनाचे गुणगान करीत होते, आणि तोही त्या सर्वांचा यथोचित सन्मान करीत पुढे जात होता २९,३०. सेवकगण सुगंध आणि तेल यांनी युक्त सुवर्णमय पेटलेले दीप घेऊन महाराज दुर्योधनाच्या चारी बाजूंनी चालत होते ३१. डोक्यावर सोनेरी पगडी धारण करून हातांत वेत व झांजा घेतलेले (राजसेवक) त्या जनसमुदायाला हळूहळू सगळीकडे हटवीत जात होते-३३."

महाभारतकारांनी या मिरवणुकीचे दिलेलें हे इतके विस्तृत वर्णन पाहिले म्हणजे, रात्रीच्या वेळी जमलेला असा जनसागर, आणि असे उत्साहपूर्ण उन्मुक्त वातावरण, दिवसभर भीषण लढाई करून थकल्या भागलेल्या (व पुनः दुसऱ्या दिवशी तशीच लढाई करण्यास बाध्य) सैन्याचें दिसत नाही. उलट तें एक रात्र विश्राम घेऊन दुसरे दिवशीही प्रत्यक्ष लढाईपासून निवृत्त राहिल्यानंतर प्राप्त रात्रीचे असले पाहिजे. अनुमान उघडच आहे की, ही अशी विशाल मिरवणुक मधल्या विश्राम दिवसाच्या रात्रिप्रारंभकाळी निघाली होती, व त्याच्या काही वेळ पूर्वी दुर्योधनाची कर्ण आदिशी गुप्त मसलत झाली होती.

**संजयाचे वृत्तांत कथन**

महर्षि व्यासांच्या आदेशावरून संजयाने अंध राजा धृतराष्ट्रास समग्र युद्ध वृत्तांत निवेदन केला. यासाठी व्यासांनी संजयाला दिव्य दृष्टि दिली. पण संजय केवळ हस्तिनापुरीच राहून त्या दिव्य दृष्टीने कुरूक्षेत्रावरील सुमारे युद्ध पाहत होता, व तदनुसार धृतराष्ट्रास वृत्तांत सांगत राहिला, अशी जी समजूत प्रचलित आहे ती पूर्ण निराधार आहे.❋

❋ या भ्रमाची अनेक उदाहरणे मी "ज्ञानेश्वरी विरुद्ध गीता" पुस्तकांत दिली आहेत. त्याशिवाय आणखी एक पहा. गो.नी. दांडेकर लिहितात ('श्री महाभारत', पृ.२३९-४०)," (व्यास धृतराष्ट्रास म्हणाले,'तुला इथे बसूनच युद्धवार्ता कळू शकेल अशी व्यवस्था मी करतो... हा संजय.... याला इथे बसूनही सर्व व्यापार कळू शकतील, अशी दिव्य दृष्टि मी देतो.' व्यासांनी संजयाच्या मस्तकावर हात ठेवताच त्याला जणू पूनर्जन्मच झाला! .... व्यास गेल्यावर संजय हर्षित स्वरात म्हणाला,'राजा, मला कुरुक्षेत्रावरील सर्व घडामोडी जणू माझ्यासमोरील अंगणातच घडत असल्याप्रमाणे पहाता येत आहेत.'



संजय स्वतः कुरूक्षेत्रावर लढत असे. त्याच्या 'दिव्य' दृष्टीचा प्रभाव इतकाच होता की, त्या विशाल रणभूमीवर कोठेही एका स्थळी असता, त्याला रणांगणावरील सर्व घटना ज्ञात होत असत; व शिवाय योद्ध्यांच्या बाह्य आचरणा शिवाय त्यांचे मनोगतही कळत असे. पण त्याने कुरूक्षेत्रावर प्रत्यक्ष उपस्थित असणे आवश्यक होते. म्हणूनच त्याला ती दिव्यदृष्टि देताना व्यास असेही म्हणाले की -

**नैनं शस्त्राणि छेत्स्यन्ति नैनं बाधिष्यते श्रमः**
**गावल्गणिरयं जीवन् युद्धादस्माद् विमोक्ष्यते।। भीष्मपर्व, २-१२**

"याला शस्त्रे मारू शकणार नाहीत आणि श्रमाने हा थकणार नाही. हा संजय या युद्धांतून जिवंत बाहेर पडले." संजय जर युद्धासमयी हस्तिनापुरातच बसून राहणार असता तर या आश्वासनाची आवश्यकता नव्हती.

संजय त्या युद्धांत प्रत्यक्ष लढत असे याचे अनेक उल्लेख महाभारतात आहेत; उदाहरणार्थ, भीष्मपर्व अध्याय ९४,९६ व ११९, द्रोणपर्व अध्याय २५ व ३०. आणि हेच शल्यपर्व अध्याय २९ मध्येही सांगितले असून, त्याची चर्चा वर प्रकरण ७ मध्ये 'अंतिम युद्धदिवस' शीर्षकाखाली केली आहे. खरे म्हणजे, संजय त्या युद्धात प्रत्यक्ष लढण्याचे उल्लेख इतके स्पष्ट आहेत की, युद्धकालात तो स्वतः न लढता केवळ हस्तिनापुरीच असे ही भ्रामक धारणा कशी प्रसृत झाली याचे आश्चर्य वाटते!

पण मग संजयाने धृतराष्ट्रास युद्धवृत्तांत केव्हां सांगितला? सर्व युद्ध संपल्यावर सांगितला काय? तसे नाही. महाभारतानुसार संजयाने धृतराष्ट्रास युद्धवृत्तांत कुरुक्षेत्रावरून हस्तिनापुरी जाऊन चार हप्त्यात कथन केला. त्याने प्रथम वृत्तांत लढाईच्या दहाव्या दिवशी झालेल्या भीष्मपतनानंतर दिला;' तो भीष्मपर्वात आला आहे. त्यात उभय सेना लढाई प्रारंभ होण्याच्या काही दिवस पूर्वी कुरुक्षेत्री पोचल्या तेथपासूनची हकीकत असून, युद्धारंभ दिवशी झालेला सुप्रसिद्ध गीतासंवादही त्यात आला आहे. संजयाने धृतराष्ट्रास हा प्रथम वृत्तांत दिल्यावर तो हस्तिनापुराहून परत कुरूक्षेत्री आला.

संजयाने दुसरा वृत्तांत द्रोणवधानंतर सांगितला, तो द्रोणपर्व होय. तिसरा वृत्तांत कर्णवधानंतर दिला (कर्णपर्व); व शेवटचा वृत्तांत दुर्योधनाच्या मृत्यूनंतर दिला, जो शल्यपर्वात व सौप्तिक पर्वाच्या प्रथम नऊ अध्यायात आला आहे.

**दहावा विश्राम दिवस**

आता आपण भीष्मपतनानंतर झालेल्या घटनांकडे वळू.

प्रत्यक्ष लढाईच्या दहाव्या दिवशी सायंकाळी भीष्म रथांतून रणभूमीवर खाली पडले. त्यानंतर रात्र झाली व ती समाप्त झाल्यावर (अर्थात दुसरा दिवस उजाडल्यावर) कौरव आणि पांडव दोघेही (पुनः) भीष्मांच्या जवळ आदरयुक्त येऊन बसले.

**व्युष्टायां तु महाराज शर्वर्याः सर्वपार्थिवाः**
**पाण्डवा धार्तराष्ट्राश्च उपातिष्ठन् पितामहम्।।भीष्मपर्व, १२१-१**
**उपारभ्य च युद्धेभ्यः संनाहान् विप्रमुच्य ते**
**आयुधानि च निक्षिप्य सहिताः कुरुपाण्डवाः ।।६**

"महाराज (धृतराष्ट्र), रात्र संपल्यावर पाण्डव व कौरव मिळून सर्व राजे पितामह भीष्माजवळ आले -१. कौरव व पाण्डव युद्धापासून निवृत्त होऊन कवचे खोलून व शस्त्र काढून ठेवून-६" (शत्रुंजय भीष्मांच्याजवळ येऊन बसले). यावेळी भीष्मांनी दुर्योधनास पांडवांशी संधी करण्याचा उपदेश केला; पण तो व्यर्थ गेला.

**ततस्ते पार्थिवाः सर्वे जग्मुः स्वानालयान् पुनः**
**तूष्णींभूते महाराज भीष्मे शन्तनुनन्दने।। भीष्मपर्व, १२२-१**

"महाराज (धृतराष्ट्र), शंतनुनन्दन भीष्मांनी बोलणे बंद केल्यावर ते सर्व राजे पुनः आपापल्या निवास स्थानी (शिबीरांकडे) चालले गेले." जर हा प्रत्यक्ष लढाईचा दिवस असता, तर कौरव व पांडव या सकाळी भीष्मांकडे आले असते तरी शस्त्रादिसह येऊन थोडा वेळ तेथे थांबून नंतर शिबिरांकडे परत न जाता, रणक्षेत्राकडे जाण्याच्या तयारीत असते. पण ही विश्राम दिवसाची सकाळ होती.

यानंतर एकटा कर्ण भीष्मास भेटून गेला. भीष्मांनी त्याला पांडवांच्या पक्षास मिळण्याची सूचना केली; पण कर्ण दुर्योधनास सोडू चाहत नव्हता. कर्ण तेथून दुर्योधनाकडे गेला (११२-३९). संजयाचा प्रथम वृत्तांत व म्हणून भीष्मपर्वही येथे संपतो. त्यादिवशी यानंतर झालेल्या घटना संजयाने (द्रोणवधानंतर दिलेल्या) दुसऱ्या वृत्तांतात कथन केल्या आहेत.

भीष्मपतनानंतरच्या या विश्राम दिवशी सेनापतिरहित निराश झालेले कौरव सैन्य कर्णाचे विशेष स्मरण करून त्याला ताबोडतोब बोलवा अशी ओरड करू लागले (द्रोणपर्व अध्याय १). यावर कर्ण पुनः दुर्योधनाकडे आला; व त्याने कौरव सैन्यास धीर देऊन त्याची हिंमत वाढवली, (अध्याय २). नंतर त्याने पुनः भीष्माकडे जाऊन (नवा सरसेनापति कोणास करावे याविषयी)



काही बोलणे केले, आणि दुर्योधनाजवळ येऊन त्या पदासाठी द्रोणांचे नाव सुचविले. त्याप्रमाणे दुर्योधनाने सैन्यासमक्ष द्रोणांना विधिवत अभिषेक केला; त्याचे वर्णन वर प्रकरण ७ मधे उद्धृत केले आहे.

संजयाने वरील साऱ्या घटनांची हकीकत ज्या प्रकारे दोन वेगळ्या वृत्तांतात कथन केली, त्यावरून हा मधला विश्राम दिवस होता हे दिसून येते. भीष्मपर्वाच्या प्रारंभीच्या श्लोकांत म्हटले आहे की, संजय आपल्या पहिल्या वृत्तांतासाठी भीष्मपतनानंतर (कुरुक्षेत्राहून) हस्तिनापुरी गेला होता.

**अथ गावल्गणिर्विद्वान् संयुगादेत्य भारत... भीष्मपर्व १३-१**
**ध्यायते धृतराष्ट्राय सहसोत्पत्य दुःखितः**
**आचष्ट निहतं भीष्मं भरतानां पितामहम्।।२**
**संजय उवाच**
**संजयोऽहं महाराज नमस्ते भरतर्षभ**
**हतो भीष्मः शान्तनवो भरतानां पितामहः।।३**
**कुकुदं सर्वयोधानां धाम सर्व धनुष्मताम्**
**शरतल्पगतः सोऽद्य शेते कुरुपितामहः।।४**

"राजा (जनमेजय), विद्वान गवल्गणिपुत्र संजय रणक्षेत्रावरून (हस्तिनापुरी) आला....१. आणि चिंताग्रस्त धृतराष्ट्राजवळ लागलीच जाऊन त्याने दुःखी स्वरात भरतकुलपितामह (भीष्म) (रणभूमीवर) मरणोन्मुख पडल्याची वार्ता सांगितली-२. (संजय म्हणाला) महाराज भरतश्रेष्ठ, मी संजय आपल्यास नमस्कार करतो. भरतकुलपितामह शन्तनुपुत्र भीष्म (युद्धात जखमी करून) पाडले गेले आहेत-३. सर्व योद्ध्यांचे ध्वजस्वरूप अग्रणी, सर्व धनुर्धाऱ्यांचे आश्रय, कुरुकुलाचे ते पितामह 'अद्य' (आतां) स्वतः बाणशय्येवर पडले आहेत-४".

जर मधले अवकाश दिवस ध्यानात न घेतले तर याचा आशय असा होईल की, संजय भीष्मपतनाच्याच दिवशी रात्री हस्तिनापुरी धृतराष्ट्रास हा वृत्तांत सांगण्यास गेला होता. वरील श्लोकातील 'अद्य' शब्दाने (ज्याचा साधारण अर्थ शब्दशः 'आज' असा होतो) हा भ्रम निर्माणही होतो. पण आपण वर पाहिल्याप्रमाणे, हा वृत्तांत भीष्मपतनापावेतोच समाप्त न होता त्या दिवसाची रात्र संपल्यावर कौरवपांडव भीष्माजवळ आले इत्यादि घटनाही त्यात संजयाने सांगितल्या आहेत. यावरून उघड होते की, संजय भीष्मपतनाच्या दुसऱ्या दिवशी सकाळी हस्तिनापुरी गेला. म्हणून वरील श्लोकांतील 'अद्य' चा अर्थ

शब्दशः 'आज' असा नसून 'आता' 'वर्तमानसमयी' असा आहे. आणि भीष्मापतनानंतरचा हा दिवस विश्रामदिवस नसता, तर त्या सकाळी संजय इकडे धृतराष्ट्राजवळ असता, व तिकडे कुरुक्षेत्रावर द्रोणांच्या सेनापतित्वाखाली लढाई सुरू होऊन गेली असती. पण संजय संपूर्ण युद्धकाळात प्रत्यक्ष लढाईचे समयी केव्हाही अनुपस्थित नव्हता. धृतराष्ट्रास आपला प्रथम वृत्तांत सांगून संजय हस्तिनापुराहून परत कुरुक्षेत्री आल्यानंतर कर्णाने कौरव सैन्यास हिंमत देणे व द्रोणास अभिषेक इत्यादि घटना झाल्या.

भीष्मपतन (अमावास्यान्त) मार्गशीर्षाच्या वद्य तृतीयेस झाले, म्हणून या विश्रामदिवशी वद्य चतुर्थी होती. या तिथीचे विशेष महत्त्व असे की, प्रत्यक्ष गीतोपदेश युद्धारंभीच्या अमावास्येस झाला, तरी संजयकथनरूपाने त्याचे प्रथम प्रकाशन या दिवशी झाले. तोपवतो प्रत्यक्ष श्रीकृष्णार्जुन संवाद होऊन (मधले अवकाश दिवस जोडून) एकोणीस दिवस होऊन गेले होते. आणि म्हणून गीतेत धृतराष्ट्राच्या तोंडी 'अकुर्वत' व संजयाच्या तोंडी 'उवाच'. 'आह', 'बभूव' 'अभाषत' असे भूतकाळाचे प्रयोग आले आहेत.

### अकरावा विश्राम दिवस

प्रत्यक्ष लढाईच्या अकराव्या दिवसानंतर येणाऱ्या विश्राम दिवशी मार्गशीर्ष वद्य षष्ठी होती. पंचमीला सूर्यास्तानंतर सर्वत्र अंधार होऊन लढाई स्थगित झाली. त्या रात्री द्रोणांनी दुर्योधनास आश्वासन दिले की, लढाईत जर कोणी कसेही करून अर्जुनाला मुख्य क्षेत्रापासून दूर गुंतवून ठेवले, तर मी युधिष्ठिरास जिवंत पकडीन. हे ऐकून राजा सुशर्माने आपले पांच भाऊ व हजारो संशप्तक वीर यांसह मान्य केले की, आम्ही मुख्य रणक्षेत्रापासून दूर अर्जुनाशी प्राणांकित युद्ध करू. इतके सांगून द्रोण व दुर्योधन यांच्या जवळून सुशर्मा आदि चालले गेले (द्रोणपर्व अध्याय १७ श्लोक ११ ते १८). या प्राथमिक आश्वासनानंतर सुशर्मा आदींनी त्या संबंधात अग्रीसमोर विधिवत जाहीर शपथ घेतली. तो विधी केल्हा झाला? महाभारतकारांनी त्याचे विशेष वर्णन दिले आहे.

**ततो ज्वलनमानर्च्य हुत्वा सर्वे पृथक् पृथक्**
**जगृहुः कुशचीराणि चित्राणि कवचानि च।।द्रोणपर्व, १७-२२**
**ते च बद्धतणुत्राणा घृताक्ता कुशचीरिणः**
**मौर्वीमेखलिनो वीराः सहस्त्रशतदक्षिणाः ।।२३**
**ब्राह्मणांस्तर्पयित्वा च निष्कान् दत्वा पृथक् पृथक्**
**गाश्च वासांसि च पुनः समाभाष्य परस्परम्।।२६**



**प्रज्वाल्य कृष्णवर्त्मानमुपागम्य रणव्रतम्**
**तस्मिन्नग्नौ तदा चक्रुः प्रतिज्ञा दृढनिश्चयाः ।।२७**
**शृण्वतां सर्वभूतानामुच्चैर्वाचो बभाषिरे**
**सर्वे धनंजयवधे प्रतिज्ञां चापि चक्रिरे।।२८**

"त्या सर्व (हजारों) योद्ध्यांनी अग्नीची अलग अलग पूजा करून त्यात हवन केले, आणि कुशचीर व विविध कवचे धारण केली-२२. लाखोंनी दक्षिणा देणाऱ्या त्या वीरांनी कवचे व कुशचीर चढवून तुपाचा लेप केला व धनुष्याच्या दोरीची मेखला कमरेस बांधली -२३. ब्राह्मणांना अलग अलग स्वर्णमुद्रा, गायी व वस्त्रे देऊन तृप्त केले, व पुनः आपसांत बोलणें करून अग्नि प्रज्वलित केला. नंतर जवळ जाऊन (प्राणांतिक) लढाईचे व्रत घेऊन त्या अग्नीच्या साक्षीने त्या दृढनिश्चयी वीरांनी प्रतिज्ञा केली- २६-२७. अर्जुनवधाची प्रतिज्ञा करून त्या सर्वांनी सर्व लोकांना (साऱ्या कौरव सैन्याला) ऐकू जाईल इतक्या उच्च स्वरांत असे म्हटले-२८". सर्व सैन्यासमक्ष या अशा विधिवत प्रतिज्ञाग्रहणाची घटना प्रत्यक्ष लढाईच्या (अकराव्या) दिवशींच रात्रिप्रारंभकालीं दिवसभराच्या भीषण लढाईने थकलेल्या योद्ध्यांना विश्रांती न घेऊ देता झाली असे मानावे काय?

बरे, तो शपथ समारंभ प्रत्यक्ष लढाईच्या बाराव्या दिवसाच्या सूर्योदयापूर्वी रात्रींच्या समाप्ति प्रहरी झाला असेल काय? पण मग असेंही मानावे लागेल की. सुशर्मादींच्या त्या शपथविधीसाठी सैन्याला मध्यरात्रीच झोपेंतून उठविले असले पाहिजे; कारण बाराव्या दिवशी लढाई प्रातःकालीच सुरू झाली होती, व अर्थातच त्यापूर्वी सुशर्मा व त्याच्या अनुयायांचे तें जाहीर शपथग्रहण होऊन त्याप्रमाणे द्रोणांनी सैन्याची रचनाही केली होती. (२०-१,२,३)

सयुक्तिक अनुमान हेंच होईल की, तो जाहीर शपथविधी मधल्या विश्राम दिवशीं झाला. मात्र 'अद्य', 'तदा', अशा शब्दांचा संदिग्ध प्रयोग करून महाकवीने तो विश्राम दिवस गूढ ठेवण्याचा कुशल प्रयत्न केला आहे. अकराव्या दिवशी लढाई स्थगित झाल्यानंतर द्रोण दुर्योधनाला म्हणतात (अर्जुनाला जर कोणी मुख्य रणूमीपासून दूर गुंतवून ठेवील तर)-

**एवं तेऽ हं महाराज धर्मपुत्रं युधिष्ठिरम्**
**समानेष्यामि सगणं वशमद्य न संशयः ।। द्रोणपर्व १७-९**

* 'महाराज (दुर्योधना), अशा स्थितींत मी 'अद्य'तुमच्यासाठी धर्मपुत्र युधिष्ठिराला त्याच्या (संरक्षक) सैनिकांसह पकडून आणीन यांत शंका नको." याच वेळी त्रिगर्तराज सुशर्मा अर्जुनाला प्रमुख युद्धक्षेत्रापासून दूर लढाईत

गुंतविण्याचे आश्वासन देत म्हणतो-

**अद्यास्त्वनर्जुना भूमिरत्रिगर्ताथ वा पुनः**

**सत्यं ते प्रतिजानीमो नैतन्मिथ्या भविष्यति।।१७-१६**

"आम्ही आपल्याला सत्यप्रतिज्ञेवर सांगतो की, 'अद्य' या भूलोकांतून अर्जुन नाहींसा होईल किंवा त्रिगर्त तरी नष्ट होतील; हे मिथ्या होणार नाही." या दोन्ही स्थळी 'अद्य' चा आशय शब्दशः आज असा शक्य नाही; कारण हा संवाद लढाईच्या अकराव्या दिवशी रात्री झाला होता. उघडच त्याचा अर्थ लढाईच्या येत्या दिवशी असा आहे. त्याचप्रमाणे जाहीर शपथविधीनंतर सुशर्माच्या योद्धयांनी म्हटले-

**यदि त्वसुकरं लोके कर्म कुर्याम संयुगे**

**इष्टाँल्लोकान् प्राप्युयामो वयमद्य न संशयः।।१७-३६**

"पण जर 'अद्य' आम्ही लढाईत (अर्जुनवधाचे) या लोकींचे दुष्कर कर्म केले तर निःसंशय आम्ही श्रेष्ठ परलोकास जाऊ." येथेही 'अद्य' चा आशय 'आता, अर्थात लढाईच्या येत्या दिवशीं' असा आहे. या श्लोकाच्या पुढेच संजयाचा हा श्लोक आहे -

**एवमुक्त्वा तदा राजंस्तेऽ भ्यवर्तन्त संयुगे**

**आव्हयन्तोऽर्जुनं वीराः पितृजुष्टां दिशं प्रति।।१७-३७**

यांत 'तदा' चा संबंध 'अभ्यवर्तन्त' शी नसून, 'उक्त्वा' शी आहे. म्हणून या श्लोकाचा अर्थ असा होईल, "राजा (धृतराष्ट्रा), त्यावेळी असे बोलून (नंतर ठरलेल्या वेळी लढाई पुनः सुरू झाल्यावर) अर्जुनाला पितरांच्या (म्हणजे दक्षिण) दिशेकडे चलण्याचे आव्हान देत ते वीर रणभूमीवर उभे राहिले."

**तेरावा विश्राम दिवस**

लढाईच्या तेराव्या दिवशी जयद्रथ व अन्य काही योद्धयांनी मिळून अभिमन्यूचा वध केला. अर्जुनास ते कळल्यावर त्याने प्रतिज्ञा केली की, पुढल्या दिवशी सूर्यास्तापूर्वी जयद्रथवध करीन अन्यथा अग्निप्रवेश करीन. हेरांच्या द्वारे त्याची जयद्रथास सूचना मिळून तो दुर्योधनाकडे गेला. दुर्योधनाने त्याला पूर्ण संरक्षणाचे आश्वासन दिले, व ते दोघे सेनापति द्रोणांकडे गेले. यावेळी रात्रिसमय चालू झाला होता.

**एवमाश्वासितो राजन् पुत्रेण तव सैन्धवः**

**दुर्योधनेन सहितो द्रोणं रात्रावुपागमत्।। द्रोणपर्व, ७७-३१**

"राजा (धृतराष्ट्र), या प्रकारे दुर्योधनाने आश्वस्त केल्यावर जयद्रथ त्याच्यासह त्या रात्रीसमयी द्रोणाजवळ गेला." इकडे श्रीकृष्णांनी अर्जुनाला



बजावले की, तू अविचाराने घाईत अशी प्रतिज्ञा करून अत्यंत धोका पत्करला आहेस. अर्जुनाने पराक्रमाची पराकाष्ठा करून प्रतिज्ञा पाळण्याबद्दल आत्मविश्वास व्यक्त केला. पण तरीही अर्जुन व श्रीकृष्ण या दोघांनाही त्या रात्री झोप आली नाही.

**तां निशां दुःखशोकार्तौ निःश्वसन्ताविवोरगौ**

**निद्रां नैवोपलेभाते वासुदेवधनंजयौ।।७७-१**

"दुःख व शोक यांनी ग्रस्त होऊन, सर्पासमान दीर्घ निःश्वास टाकीत श्रीकृष्ण व अर्जुन यांना त्या रात्री झोप आली नाही."

या रात्रीच्या समाप्तिसमयी ते दोघेही संतप्त मनः स्थितींत होते; व अनेक अपशकून झाले. महाभारतकारांनी त्यांचे दिलेले हें वर्णन प्रस्तुत संदर्भात फार महत्वाचें आहे.

**ववुश्च दारुणा वाताः रुक्षा धोराभिशंसिनः**

**सकबन्धस्तथा ऽऽदित्ये परिधिः समदृश्यत।। द्रोणपर्व ७७-३**

"रुक्ष, भयसूचक, दारुण वारे वाहू लागले; सूर्यबिंबात शिररहित शवासमान भयावह आकृतीसह एक अति अशुभ घेरा दिसू लागला-३". येथे सूर्यबिंबाचा उल्लेख दर्शवितो की, यावेळी रात्र संपून सूर्योदय झाला होता. या समयी अर्जुनाने श्रीकृष्णास विनविले की, त्यांनी सुभद्रा व विधवा उत्तरा यांचे सान्त्वन करावे. त्याप्रमाणे-

**ततोऽर्जुनगृहं गत्वा वासुदेवः सुदुर्मनाः**

**भगिनीं पुत्रशौकार्तामाश्वासयत दुःखिताम्।।७७-११**

"यावर श्रीकृष्ण अत्यंत दुःखी अंतःकरणाने अर्जुनाच्या शिबिरात गेले, आणि त्यांनी आपल्या पुत्रशोकार्त दुःखी बहिणीचे सांत्वन केले." श्रीकृष्ण सुभद्रेस म्हणाले-

**प्राप्स्यते चाप्यसौ पापः सैन्धवो बालधातकः**

**अस्यावलेपस्य फलं ससुहृद्गणबान्धवः। ७७-१८**

**व्युष्टायां तु वरारोहे रजन्यां पापकर्मकृत्**

**न ही मोक्ष्यति पार्थात् स प्रविष्टोऽप्यमरावतीम्।।१९**

**श्वः शिरः श्रोष्यसे तस्य सैन्धवस्य रणे हृतम्**

**समन्तपञ्चकाद् बाह्यं विशोका भव मा रुदः।।२०**

"सुभद्रे, अभिमन्यूसारख्या बालाचा वध करविणारा हा पापी जयद्रथ रात्र संपल्यावर आपल्या आप्तमित्रांसह या दृष्कृत्याचे फळ भोगेल. तो पापी (इन्द्राच्या) अमरावतीत लपला तरी अर्जुनाच्या हातून सुटणार नाही. रणभूमीवर

जयद्रथाचा शिरच्छेद होऊन त्याचे मस्तक समन्तपंचक क्षेत्राबाहेर फेकले गेल्याने तू उद्या ऐकशील. शोक सोड, रडू नको."

येथे महत्वाचा प्रश्न असा की, श्रीकृष्णाने या संभाषणात उल्लेखिलेली रात्र, जी संपल्यावर जयद्रथवध होणार होता, कोणत्या दिवसाची होती? वरील तपशीलवार वर्णनावरून स्पष्ट आहे की, अभिमन्युवध व अर्जुनप्रतिज्ञा यानंतर एक रात्र आधीच निघून गेली होती. अर्थात श्रीकृष्णांनी उल्लेखिलेली ती रात्र मधल्या विश्राम दिनाची होती; आणि त्या दिवसाच्या सकाळी (सूर्योदयानंतर) श्रीकृष्णांनी सुभद्रेला हे आश्वासन दिले होते. सुभद्रा, द्रौपदी, उत्तरा आदींचे सान्त्वन करून श्रीकृष्ण पुनः अर्जुनापाशी आले; आणि ते व अन्य योद्धे आपापल्या शिबिरांकडे गेले.

**ततोऽभ्यनुज्ञाय नृपान् कृष्णो बन्धूंस्तथार्जुनम्**
**विवेशान्तःपुरे राजंस्ते च जग्मुर्यथालयम्।। ७८-४४**

"तदनंतर तेथे उपस्थित राजे, बन्धुजन आणि स्वतः अर्जुन यांचा निरोप घेऊन श्रीकृष्ण आपल्या अंतःपुरात गेले आणि त्या बरोबरच ते राजेही आपापल्या शिबिरांकडे चालले गेले." जर हा दिवस प्रत्यक्ष लढाईचा असता तर यावेळी ते शिबिरांकडे नव्हे, सरळ रणभूमीवर लढण्यासाठी गेले असते.

पण या विश्रांति दिवसाचे आणखीही एक स्पष्ट प्रमाण आहे. वरील घटनेनंतर आणखी एक रात्र आली, आणि या रात्री श्रीकृष्णांनी अर्जुनाच्या शय्येजवळ भगवान शंकराच्या पूजासामग्रीची व्यवस्था करून त्याला शांत चित्ताने झोपी जाण्यास सांगितले; व ते स्वतःही निजले.

**सुप्यतां पार्थ भद्रं ते कल्याणाय व्रजाम्यहम्**
**स्थापयित्वा ततो द्वाःस्थान् गोप्तृंश्चात्तायुधान् नरान्।। ७९-६**
**दारुकानुगतः श्रीमान् विवेश शिबिरं स्वकम्**
**शिश्ये च शयने शुभ्रे बहुकृत्यं विचिन्तयन्।।७**

"'अर्जुना, तुझे कल्याण असो; आता स्वस्थ झोप घे, मी तुझ्या हितसाधनार्थ जात आहे' असे म्हणून श्रीकृष्णांनी तेथे सशस्त्र द्वारपाल व रक्षक नियुक्त केले, आणि सारथी दारुकासह स्वतः आपल्या शिबिरात चालले गेले. तेथे (अर्जुनाच्या हितार्थ) अनेक संभाव्य कार्यांवर विचार करिता करिता ते शुभ्र शय्येवर निजले." या द्वितीय रात्रीच्या पूर्वार्धात श्रीकृष्णांना झोप लागली, पण मध्यरात्रीच्या सुमारास त्यांना जाग आली.

**तस्यां रजन्यां मध्ये तु प्रतिबुद्धो जनार्दनः ।।७९-२०**
**स्मृत्वा प्रतिज्ञां प्रार्थस्य दारुकं प्रत्यभाषत...२१**



"ती रात्र चालू असता श्रीकृष्णांना जाग आली, व अर्जुनाच्या प्रतिज्ञेचे स्मरण करून ते सारथी दारुकास म्हणाले ..." येथे 'प्रतिबुद्ध' शब्द त्या रात्री दारुकाशी झालेल्या संभाषणाच्या पूर्वी श्रीकृष्णांची निद्रावस्था दर्शवितो. अर्जुनालाही त्या रात्री एक प्रकारचे 'स्वप्न' पडले.

**कुन्तीपुत्रस्तु तं मंत्रं स्मरन्नेव धनंजयः**
**प्रतिज्ञामात्मनो रक्षन् मुमोहाचिन्त्यविक्रमः।।८०-१**
**तं तु शोकेन संतप्तं स्वप्ने कपिवरध्वजं**
**आससाद महातेजा ध्यायन्तं गरुडध्वजः।।२**

"महापराक्रमी अर्जुन आपल्या प्रतिज्ञापालनाची चिंता करीत. आणि (भगवान श्रीशंकराच्या प्रार्थनापर) मंत्राचे ध्यान करीत, झोपेच्या (अथवा तन्द्रावस्थेच्या) अधीन झाला. त्यासमयी चिंतामग्न कपिध्वज अर्जुनाच्या 'स्वप्ना' त गरुडध्वज श्रीकृष्ण त्याच्या जवळ आले". या 'स्वप्नावस्थेत' श्रीकृष्ण अर्जुनाला शंकराजवळ घेऊन गेले. शंकरांनी प्रसन्न होऊन अर्जुनाला महान पाशुपतास्त्र दिले. हर्षित चित्ताने श्रीकृष्ण व अर्जुन शिबिरास परत आले.

**अनुज्ञातौ क्षणे तस्मिन् भवेनार्जुनकेशवौ**
**प्राप्तौ स्वशिबिरं वीरौ मुदा परमया युतौ।। ८१-२४**

"शंकराची अनुज्ञा घेऊन ते दोघे वीर श्रीकृष्ण व अर्जुन त्याच क्षणी परमहर्षित होऊन आपल्या शिबिरास परत आले." असे दिसते की वस्तुतः हे स्वप्न म्हणजे श्रीकृष्णांनी निर्माण केलेला अर्जुनाचा एक गूढावस्थेचा अनुभव होता. शेवटी ती रात्र संपली.

**तयोः संवदतोरेवं कृष्णदारुकयोस्तथा**
**सात्यगाद् रजनी राजन् अथ राजान्वबुध्यत।। ८२-१**

"श्रीकृष्ण व दारुक यांचे हे असे संभाषण चालता चालता रात्र संपली; आणि तिकडे राजा युधिष्ठिराला जाग आली."

यावरून स्पष्ट होते की, ज्या या रात्रीत अर्जुनाला झोप येऊन त्या गूढ 'स्वप्नावस्थे' चा अनुभव आला (आणि श्रीकृष्णांनाही काही वेळ झोप येऊन नंतर त्यांनी दारुकाशी संभाषण केले)', ती त्या प्रथम रात्रीपेक्षा (ज़िच्यात त्या उभयतांना मुळीच झोप आली नव्हती) निश्चितपणे भिन्न होती. द्वितीय रात्रीच्या त्या 'स्वप्न' चा उल्लेख द्रोणपर्वाच्या शेवटीं व्यास-अर्जुन संवादातही आला आहे (२०२-१४५,१४६)

आणि यानंतर पुनः द्वितीय सूर्योदय व प्रातःकाळ आला. त्यावेळेस सैन्य लढाईसाठी तयार होत होते. श्रीकृष्णांनी युधिष्ठिराजवळ जाऊन (८२-२९ ते

३४) अर्जुनाची प्रतिज्ञा अवश्य पूर्ण होईल असे आश्वासन दिले. इतक्यात स्वतः अर्जुनही तेथे आला (८४-१). येथे पुनः महत्त्वाची गोष्ट अशी की, या द्वितीय प्रातःकाळी अर्जुन व श्रीकृष्ण दोघेही विशेष प्रसन्न वृत्तीत होते. (याउलट प्रथम रात्रीच्या शेवटी ते अगदी वेगळ्या संतप्त व चिंताग्रस्त स्थितीत होते). अर्जुनाची प्रसन्न वृत्ती पाहून युधिष्ठिराने म्हटले-

**व्यक्तमर्जुन संग्रामे ध्रुवस्ते विजयो महान्**
**यादृग्रूपा च ते च्छाया प्रसन्नश्च जनार्दनः ।। ८४-४**

"अर्जुना, आज लढाईत तुला खात्रीने महान विजय प्राप्त होईल हे उघड आहे. तुझा चेहरा तें दर्शवीत आहे, आणि श्रीकृष्णही प्रसन्नचित्त आहे." अर्जुनाने युधिष्ठिराला रात्रीचा 'स्वप्नानुभव' सांगितला, तो ऐकून उपस्थित सर्वांना आनंद झाला. युधिष्ठिराची अनुज्ञा घेऊन ते सर्व (मागील सकाळप्रमाणे शिबिरांकडे न जातां) सरळ रणक्षेत्राकडे गेले.

**अनुज्ञातास्ततः सर्वे सूहृदो धर्मसूनुना**
**त्वरमाणाः सुसन्नद्धा हृष्टा युद्धाय निर्ययुः।।८४-८**

"त्यानंतर युधिष्ठिराची अनुज्ञा घेऊन, कवच आदींनी पूर्ण सुसज्ज व हर्षोल्लासाने प्रफुल्लित ते सर्व स्वजनमित्र शीघ्रतेने युद्धासाठी गेले."

या (द्वितीय) प्रातःकालसमयी पांडवांभोवती अनेक शुभशकुन होत होते. (या उलट पूर्व दिवशींच्या प्रातःकाळी वर उद्धृत केल्याप्रमाणे फार अशुभ शकुन झाले होते.)

**तमनुप्रयतो वायुः पुण्यगन्धवहः शुभः**
**ववौ सहर्षयन् पार्थं द्विषतश्चापि शोषयन्।।२४**
**ततस्तस्मिन् क्षणे राजन् विविधानि शुभानि च**
**प्रादुरासन् निमित्तानी विजयाय बहूनि च**
**पाण्डवानां त्वदीयानां विपरीतानि मारिष।।२५**

"जसजसा अर्जुन पुढे जाऊ लागला, सुमंगल सुगंधी वायु त्याच्या मागोमाग वाहू लागला, आणि त्याच्या चित्ताची प्रसन्नता आणखी वाढून, उलट कौरव उदास होऊ लागले-२४. त्यासमयी पांडवांचा विजय व कौरवांचा पराजय सूचित करणारे अनेक शकुन झाले -२५".

अशा प्रकारे अभिमन्युवधाच्या दिवशींची सायंकाळ आणि जयद्रथवधाचा दिवस यांच्या दरम्यान दोन स्पष्टपणे भिन्न रात्री (व दोन भिन्न प्रातः काळ) गेल्याचे महाभारतात दर्शविले असल्याने, मधला विश्रामदिन सिद्ध होतो.

तरीही येथे एका विशेष ओळीवर अधिक विचार इष्ट होईल. आपल्या



त्या प्रतिज्ञेच्या शेवटी अर्जुन असे म्हणाला-

**धर्मादपेता ये चान्ये मया नात्रानुकीर्तिताः**
**ये चानुकीर्तितास्तेषां गतिं क्षिप्रामवाप्नुयाम्।।७३-४५**
**यदि व्युष्टामिमां रात्रिं श्वो न हन्यां जयद्रथम्।।४६**

"जर ही रात्र संपल्यावर 'श्वः' (उद्या) मी जयद्रथाचा वध न केला, तर मी आता उच्चारलेल्या व न उच्चारलेल्या सर्व धर्मभ्रष्टांची दुर्गति मला शीघ्र प्राप्त होवो.' येथे अर्जुनाने' व्युष्टां इमां रात्रिं श्वः' असे म्हटले असल्याने, त्याचा आशय तो शब्दशः 'उद्या' जयद्रथवध करणार होता असा भासू शकतो. पण महाभारतातील युद्धवर्णनात अनेक स्थळी श्वः' चा अर्थ प्रत्यक्ष लढाईच्या येत्या (पुढील) दिवशी असा असतो. आणि येथेही 'श्वः' च्या पूर्वी 'ही रात्र संपल्यावर' असे म्हटले असले तरी 'श्वः' चा तोच अर्थ असू शकतो. 'श्वः' चा कोणताही अर्थ घेतला तरी तो दिवस चालू रात्रीनंतरचा येणार होता. अर्जुनाचा आशय असा दिसतो की, ही आजची रात्र गेल्यावर मी प्रत्यक्ष लढाईच्या पुढल्या दिवशी जयद्रथवध करीन; मग कौरवांना वाटल्यास (जयद्रथवधानंतर दुर्योधनाने खरोखर केल्याप्रमाणे) विश्राम दिवस न घेता शब्दशः पुढल्या दिवशी लढाई चालू ठेवावी, अथवा नेहमीप्रमाणे मध्ये एक विश्रामदिवस घेऊन लढाई करावी. अभिमन्युवध व जयद्रथवध या दरम्यान दोन रात्री गेल्याची स्पष्ट प्रमाणें पाहता, अर्जुनाच्या त्या प्रतिज्ञेनंतर एक विश्रामदिवस जाऊन नंतर जयद्रथवध झाला हे निःसंदेह आहे. आणि महाभारतकार अर्जुनाची प्रतिज्ञा फोल ठरेल असे काहीही त्याच्या तोंडी घालणार नाही हे सांगावयास नकोच. या संदर्भात अर्जुनाच्या त्या उद्गारांचा अशय घेतला पाहिजे.

**अंतिम विश्राम दिवस**

लढाईच्या सतराव्या दिवशी अपराण्ह समयीं कर्णवध झाला. त्यानंतर सायंकाळापावेतो लढणे चालून नंतर खिन्न मनाने कौरव सैन्य शिबिरात परतले. संजय धृतराष्ट्रास सांगतो-

**प्रत्युपायाम सायान्हे निर्जिताः सव्यसाचिना**
**हतप्रवीरा विध्वस्ता निकृत्ता निशितैः शरैः।। शल्यपर्व ३-८**

"आमचे कित्येक श्रेष्ठ वीर मारले जाऊन, आणि अर्जुनाकडून पराजित व तीक्ष्ण बाणांनी व्यथित होऊन, आम्ही सायंकाळचे वेळी (शिबिरांकडे) परतलो" (शिवाय पाहा ४-३). यानंतर प्रमुख कौरवपक्षीय योद्धे रात्रिप्रारंभकाली रणभूमीपासून सुमारे आठ कोस दूर हिमालय पर्वतावर गेले.

**ततो वाहान् समाश्वस्य सर्वे युद्धाभिनन्दिनः**
**ऊने द्वियोजने गत्वा प्रत्यतिष्ठन्त कौरवाः।। शल्यपर्व, ५-५०**
**आकाशे विद्रुमे पुण्ये प्रस्थे छिमवतः शुभे**
**अरुणां सरस्वतीं प्राप्य पपुः सस्नुश्च ते जलम्।।५१**

"त्यानंतर युद्धोत्साहाने भरलेले ते कौरव वीर आठ कोसांहून किंचित कमी अंतरावर गेले, आणि आपल्या वाहनांना विश्रांती देऊन त्यांनी तेथे डेरा घातला-५०. मोकळ्या आकाशाखाली हिमालय पर्वताच्या निर्वृक्ष पवित्र मंगल पठारावर ते पोचले, आणि अरुणा व सरस्वती नद्यांच्या संगमावर* त्यांनी स्नान व जलपान केले-५१".

कर्णवधामुळे अति उद्विग्न होऊन त्यांनी 'ती रात्र' हिमालयाच्या पठारावर घालवली.

**अथ हैमवते प्रस्थे स्थित्वा युद्धाभिनन्दनः**
**सर्व एव महायोधास्तत्र तत्र समागताः।। शल्यपर्व ६-१**
**----------------------- ते रात्रिमुषितास्ततः।। ३**
**रणे कर्णे हते वीरे त्रासिता जितकाशिभिः**
**नालभञ्शर्म ते पुत्रा हिमवन्तेमृते गिरिम्।। ४**

"लढण्यासाठी उत्साहपूर्ण ते सर्व महायोद्धे हिमालयाच्या उंच पठारावर जाऊन (महत्त्वपूर्ण खलबतासाठी) तेथे एकत्र बसले-१..... त्यांनी ती रात्र तेथे घालविली-३. युद्धात वीर कर्णाचा वध झाल्याने, आणि विजयोल्हासपूर्ण पाण्डवांकडून त्रस्त झाल्याने, तुमचे (धृतराष्ट्राचे) पुत्र हिमालय पर्वताशिवाय अन्यत्र मनःशांती प्राप्त करू शकले नाहीत-४". सेनापतीपदासाठी अश्वत्थामाने शल्याचें नांव सुचवले. अन्य सर्वांनी त्याला पाठिंबा दिला. शल्यानेही संमती दिली; आणि "यानंतर" शल्याला विधिवत अभिषेक करण्यात आला.

**एवमुक्तस्ततो राजा मद्रधिपतिमञ्जसा।। शल्यपर्व ७-६**
**अभ्यषिञ्चत सेनाया मध्ये भरतसत्तम**
**विधिना शास्त्रदृष्टेन क्लिष्टरूपो विशाम्पते।। ७**
**अभिषिक्ते ततस्तस्मिन् सिंहनादो महानभूत्**
**तव सैन्येऽभ्यवाद्यन्त वादित्राणि च भारत।। ८**

"महाराज (धृतराष्ट्र), शल्याने अशा प्रकारे (संमती व आश्वासनयुक्त) भाषण केल्यावर (ततः) तत्पश्चात, (वारंवार होणाऱ्या पराभवांनी) दुःखी (झालेल्या) दुर्योधनाने शास्त्रोक्त विधीप्रमाणे आपल्या सैन्याच्या मध्ये मद्रराज शल्याला (सेनापतिपदाचा) अभिषेक केला -६,७. भरतकुलश्रेष्ठा (राजा धृतराष्ट्र), शल्याला तो अभिषेक होताच तुमच्या (कौरव) सैन्यात जोरजोराने (हर्ष व उत्साहप्रदर्शक) सिंहनाद होऊन वाद्येही वाजवली गेली-८."

येथे एक रहस्य ठेवण्यात आले आहे. शल्याला सेनापति करण्याचा निर्णय हिमालयावर (कर्णवधानंतर रात्रिसमयी) घेतला गेला होता; तरी त्याला प्रत्यक्ष अभिषेक ती रात्र संपल्यावर तेथून परत खाली कुरुक्षेत्रावर आल्यानंतर सैन्याच्या समक्ष केला गेला ! केवळ एका रात्रीसाठी संपूर्ण विशाल सेना रणभूमीपासून इतक्या दूर हटविणे संभव नव्हते. फक्त प्रमुख योद्धे हिमालयावर गेले होते. आणि अभिषेक सैन्याच्या उपस्थितीत झाल्याचे वरील श्लोकात म्हटले आहे; सैनिक नीतीला अनुसरून तें आवश्यकही होतें.

त्या अभिषेकानंतर कौरव सैन्याने केलेला प्रचण्ड हर्षनाद स्वतः युधिष्ठिराने ऐकला. त्यावेळी तो आपल्या सैन्यासह कुरुक्षेत्राच्या आपल्या विभागात होता.

**सैन्यस्य तव तं शब्दं श्रुत्वा राजा युधिष्ठिरः**
**वार्ष्णेयमब्रवीत् वाक्यं सर्वक्षत्रस्य पश्यतः।। ७-२४**
**मद्रराजः कृतः शल्यो धार्तराष्ट्रेण माधव**
**सेनापतिर्महेश्वासः सर्वसैन्येषु पूजितः।। २५**

"तुमच्या (कौरव) सेनेचा तो हर्षनाद ऐकून युधिष्ठिराने आपल्या सर्व योद्ध्यांच्या समक्ष श्रीकृष्णांस म्हटले की, दुर्योधनाने (त्याच्या) समस्त सेनेला पूजनीय अशा महाधनुर्धर मद्रराज शल्याला सेनापती केला आहे." तो अभिषेक व हर्षनाद दूरस्थ हिमालयाच्या पठारावर झाला असता तर युधिष्ठिराला त्याची वार्ता हेरांकडून कळली असती, स्वतःच्या कानाने नव्हे.

शल्याला सेनापति करण्याचा हिमालयावर घेतलेला निर्णय कथन करून महाभारतकार लागलीच संदिग्ध शब्दात म्हणतात की, "ततः" (तदनंतर) शल्याला अभिषेक केला गेला. पण या "ततः" चा आशय 'तत्काळनंतर' असा नसून, त्यात प्रमुख कौरव योद्धे हिमालयावर ती रात्र घालवून परत कुरुक्षेत्रावर आल्याचे खुबीने सुचविले आहे!

या संबंधात दुसरा एक महत्त्वाचा संकेत असा की, त्या अभिषेकानंतर (पुनः प्रत्यक्ष लढाई सुरू होण्यापूर्वी) आणखी एक रात्र गेली. त्या रात्री कौरव वीर (शल्याच्या सेनापतित्वाने आश्वस्त होऊन) प्रसन्नचित होते; उलट, तिच्या पूर्वीच्या रात्री (हिमालयाच्या पठारावर) ते फार अस्वस्थ व उद्विग्न होते.

* अरुणा व सरस्वती या नद्यांच्या संगमाचा उल्लेख वनपर्व ८३ - १५१ मध्ये आला आहे. शिवाय शल्यपर्व अध्याय ४ पाहा.

**अभिषिक्ते तथा शल्ये तव सैन्येषु मानद**
**न कर्णव्यसनं किंचिन्मेनिरे तत्र भारत ।। शल्यपर्व ७-२१**
**प्रहर्षं प्राप्य सेना तु तावकी भरतर्षभ**
**तां रात्रिमुषितां सुप्ता हर्षचित्ता च साभवत्।। २३**

"माननीय राजा धृतराष्ट्र, अशा प्रकारे तुमच्या (कौरव) सैन्यामध्ये शल्याला अभिषेक झाल्यावर कौरव सैनिकांना कर्णवधाचा किंचितही शोक उरला नाही-२१. अशा प्रकारे आनंदित होऊन तुमच्या (कौरव) सैन्याने मोठ्या सुखाने ती रात्र चांगल्या झोपेत घालविली-२३." कर्णवधानंतर गेलेल्या या द्वितीय रात्रीनंतर लढणे पुनः प्रारंभ झाले.

**व्यतीतायां रजन्यां तु राजा दुर्योधनस्तदा**
**अब्रवीत् तावकान् सर्वान् संनह्यन्तां महारथाः।। ८-१**

"रात्र समाप्त झाल्यावर राजा दुर्योधनाने आपल्या समस्त योद्ध्यांना एकत्रित करून, 'महारथ्यांनो, कवचादींनी सुसज्ज होऊन लढण्यासाठी तयार व्हा' असा आदेश दिला." आणि यानंतर लागलीच (सूर्योदयाच्याही काही पूर्वी) अरुणोदयावर ("पूर्वां संध्यां"८-४५) लढाई पुनः सुरू झाली. जर ही रात्र तीच असती, जिच्यात प्रमुख कौरव वीर रणक्षेत्राहून आठ कोस दूर हिमालयावर जाऊन निजले होते, तर खाली कुरुक्षेत्रावर लढाई इतक्या लवकर अरुणोदयी पुनः सुरू होणे संभव नव्हते.

शेवटी या अवकाश दिवसाचा आणखी एक निश्चित संकेत पाहा. शल्याला अभिषेक झाल्यावर कौरव सैन्याने केलेला महान हर्षध्वनी ऐकताच युधिष्ठिराने श्रीकृष्णांशी विचार विनियम केला. श्रीकृष्णांनी युधिष्ठिराला स्वतः रणभूमीवर शल्याचा वध करावा असा परामर्श दिला. या परामर्शानंतर श्रीकृष्ण 'सायंकाळी' आपल्या शिबिराकडे चालले गेले.

**यच्च चे तपसो वीर्यं यच्च क्षात्रं बलं तव**
**तद् दर्शय रणे सर्वं जहि चैनं महारथं।। शल्यपर्व ७-४१**
**एतावदुक्त्वा वचनं केशवः परवीरहा**
**जगाम शिबिरं सायं पूज्यमानोऽथ पाण्डवैः ।। ४२**

"आपल्या संपूर्ण तपोबलाचा, शौर्याचा व क्षात्रतेजाचा रणभूमीवर प्रयोग करून महारथी शल्याचा वध कर-४१; युधिष्ठिराला असा सल्ला देऊन शत्रुंजय श्रीकृष्ण पाण्डवांचा सत्कार स्वीकारीत 'सायं' (सायंकाळचे वेळी) आपल्या शिबिराकडे गेले-४२". ही सायंकाळ कर्णवधाच्या दिवसाची नव्हती व शल्यवधाच्याही दिवसाची नव्हती. कर्णवधाच्या दिवशी तर सायंकाळ पावेतो



शल्याला अभिषेक होण्याचा प्रश्नच नव्हता; शिवाय कर्णवध व शल्याभिषेक या दरम्यान एक रात्र गेल्याचा महाभारतात उल्लेखही आहे. आणि तिकडे शल्य आपल्या अभिषेकानंतर झालेल्या लढाईत पहिल्याच दिवशी मध्यान्ह प्रहरीं मारला गेल्याने, त्या दिवशी सायंकाळी श्रीकृष्णाने युधिष्ठिराला शल्यवधाचे तें मार्गदर्शन करण्याचा प्रश्नच नाही. अर्थात निष्कर्ष अनिवार्य आहे की, तो युधिष्ठिर- श्रीकृष्ण संवाद (आणि त्याच्या लागलीच पूर्वी झालेला शल्याभिषेक) कर्णवधानंतरच्या विश्रामदिवशी झाला होता. मात्र आश्चर्य याचे वाटते की, या विश्रामदिवसाच्या जाणीवेच्या अभावी महाभारताचे अभ्यासक आजपावेतो वरील श्लोक ७-४२ मधील 'सायं' शब्दाचा काय अर्थ करीत राहिले? अथवा यासाठीच तर या महाकाव्याला वेगवेगळ्या रचनांची एक विसंगतीपूर्ण गोधडी मानले जात नसेल?

अशा प्रकारे महाभारतातील युद्धवर्णनांत सूक्ष्म अध्ययनाने अशा या घटना आढळून येतात, प्रत्यक्ष लढाईच्या दिवशी झाल्याचा आभास होतो, पण ज्या वस्तुतः विश्रामदिवशी झाल्या.

**महाकवीची कूट कुशलता**

मराठी 'विविधज्ञानविस्तार' (वर्ष ९ अंक १) मधील एका लेखात रा. ल. गोखले यांनी महाभारत युद्धांत विश्राम दिवस असण्याची व त्या दिवसांत रणभूमीची सफाई होण्याची कल्पना व्यक्त केली आहे. परंतु त्यांच्या अनुसार खुद्द महाभारत काव्यांत दिलेलें युद्धवर्णन प्रायः लागोपाठ दररोज होणाऱ्या लढाईचे आहे, आणि लढाई अमावास्येस प्रारंभ होऊन तेथून लागोपाठ चौदावा दिवस शुक्ल त्रयोदशी येतो म्हणून महाभारताच्या मूळ पोथींत तो दिवस त्याच स्वरूपांत दाखविला असावा, पण मागाहून कोणी विश्राम दिवस जोडून तो दिवस अमावास्येपासून (चौदाव्या ऐवजी) सत्ताविसावा मोजून कृष्णपक्षाच्या उत्तरार्धात दर्शविण्यासाठी (मूळ महाभारतांतील वर्णनांत हस्तक्षेप करून) त्या दिवशी रात्रियुद्ध व उत्तररात्रीच्या चन्द्रोदयाचा उल्लेख कसा तरी घालून दिला असावा. पण गोखले त्या दिवसानंतर शेष लढाई लागोपाठ दररोजच मानतात. इतकेच नव्हे, तर त्या चौदाव्या दिवसापूर्वी येणारी भीष्मपतनाची तिथी त्यांनी लागोपाठ दररोज लढाईच्या गणनेनुसारच मोजली. हा सारा विसंगत प्रकार पाहून के. ल. दप्तरींनी 'विविधज्ञानविस्तार' मध्ये नंतर एका लेखात त्यांची सूचना नाकारून टाकली. (दप्तरींच्या लेखावरून दिसते की अन्य काही जणांनी भीष्म कधी दोन दिवसाआड युद्ध करीत असत असेही सूचवून पाहिले.)

वस्तुतः मागील कांही प्रकरणांत स्पष्ट केल्याप्रमाणे त्या चन्द्रोदयाचे

वर्णन मागाहून कोणी केलेला हस्तक्षेप नसून मूळ महाभारताचाच सुसंगत मार्मिक अंश आहे. महाभारतात दिलेले प्रदीर्घ युद्धवर्णन युद्धारंभापासून शेवटपावेतो विश्राम दिवस ध्यानात घेऊन गूढ रीत्या केलेले आहे. आणि याच आधारे महाभारताची शतकानुशतके अगम्य भासणारी कूटे आता त्यांतील श्लोकांच्या सूक्ष्म अध्ययनाने सरळ सुसंगत स्पष्ट होत आहेत.

विविध प्रकारची कूटनिर्मिती करण्यासाठी संदिग्ध शब्दरचना करण्यात महाकवीचा हातखंडा आहे. 'अद्य' शब्दाचा साधारणतः 'आज' असा अर्थ होतो. परंतु महाभारतातील युद्धवर्णनात काही स्थळी त्याचा आशय 'लढाई पुनः सुरू होण्याच्या दिवशी' असा होतो. याचे एक उदाहरण यापूर्वी दिले आहे. याशिवाय, शल्याला सेनापतित्वाचा अभिषेक झाल्यानंतर त्याने पुढील शब्दात कौरव सैन्याला आश्वासन दिले-

**अद्य चाहं रणे सर्वान् पंचालान् सह पाण्डवैः ।। शल्यपर्व ७-१३**
**निहनिष्यामि वा राजन् स्वर्गं यास्यामि वा हतः**
**अद्य पश्यन्तु मां लोका विचरन्तमभीतवत्।। १४**

"राजा (दुर्योधना), 'अद्य' मी लढाईत पांडवासह समस्त पांचालांचा वध करीन, अन्यथा स्वतः मारला जाऊन स्वर्गात जाईन; 'अद्य' सर्व लोक मला रणभूमीवर निर्भय पराक्रम करताना पाहोत." येथे 'अद्य' शब्दाचा आशय शब्दशः आज असा सहजच ध्यावासा वाटतो (उदाहरणार्थ गीता प्रेसचे हिंदी भाषांतर पाहा). पण शल्याच्या या भाषणानंतर एक रात्र गेल्यावर लढाई पुनः सुरू झाली हे आपण वर पाहिले आहे. म्हणून येथे 'अद्य' चा आशय 'आता लढाई पुनः प्रारंभ झाल्यावर','लढाईच्या येत्या दिवशी' असा आहे.

अशाच खुबीने महाभारतकार 'श्वः' चा उपयोग करतात. त्या शब्दाचा सामान्य अर्थ शब्दशः 'उद्या' असा आहे. पण महाभारताच्या युद्धवर्णनात अनेक स्थळी त्याचा आशय (मधला विश्राम दिवस सोडून) 'लढाईचा पुढला दिवस' असाही होतो.

याशिवाय महाकवी अनेक वेळा प्रथम घटना वर्णन करतात आणि 'ततः' (तदुपरान्त) असे म्हणून अन्य घटना सांगू लागतात. साहजिकच अशी कल्पना होते की ती दुसरी घटना प्रथम घटनेच्या तत्काळनंतर झाली असावी. पण वस्तुतः ती दुसरी घटना पहिलीच्या तत्काळनंतर न होता, त्या दोघात काही समयाचे (व दरम्यान अन्य एखाद्या घटनेचे) अंतर असते.

महाकवीच्या कथनाची एक वेगळ्या प्रकारचीही संदिग्धता पाहा. ज्या दिवशी शल्याला अभिषेक झाला त्या दिवशी रात्री कौरवांना चांगली झोप



आली (वर उद्धृत श्लोक ७-२३) आणि पांडवांनाही आली.

**सुष्वाप रजनीं तां तु विशल्य इव कुंजरः**
**ते च सर्वे महेष्वासाः पञ्चालाः पाण्डवास्तथा।।शल्यपर्व, ७-४४**
**कर्णस्य निधने हृष्टाः सुषुपुस्तां निशां तदा...।। ४५**

"युधिष्ठिराने त्या रात्री कोणतीही जखम नसलेल्या स्वस्थ हत्तीप्रमाणे गाढ झोप घेतली✻ आणि ते सर्व शूर पांचाल व पांडव वीर कर्णवधामुळे झालेल्या हर्षाने त्या रात्री सुखाने झोपले." वस्तुतः कर्णवधानंतर एक रात्र यापूर्वीच गेली होती; आणि त्या रात्रीही पांडवांनी कर्णवधामुळे होणाऱ्या हर्षाने सुखी झोप घेतलीच असेल. पण या द्वितीय रात्रीच्या संबंधात कर्णवधाचा विशेष उल्लेख केल्याने सहजच असा भ्रम होतो की, कर्णवधानंतर ही पहिलीच रात्र असावी; आणि त्यामुळे दरम्यानचा विश्रामदिवस ध्यानात येत नाही!

**वृत्तांत कथनाचे जाळे**

महाभारतकारांच्या आणखीही एका खुबीचा येथे उल्लेख केला पाहिजे. संपूर्ण महाभारत कथनस्वरूप असून कथनातही पोटकथने आहेत. सर्वप्रथम संवाद पौराणिक सौति व कुलगुरु शौनक यांचा असून, वर्तमान महाभारत सौतीने शौकनास कथन केले असे त्याचे स्थूल स्वरूप आहे. पण त्याने तें मुख्यतः वैशंपायनाने जनमेजयाला केलेल्या कथनाच्या पुनर्कथन स्वरूपात सांगितले आहे. राजा जनमेय हा परिक्षिताचा पुत्र, अभिमन्यूचा नातु, व अर्जुनाचा पणतू. वैशंपायन हा महर्षि व्यासांचा एक शिष्य. पण वैशंपायनानेही कौरव पांडवांचा सारा वृत्तांत बऱ्याच अंशी इतरांच्या कथनांच्या स्वरूपात कथन केला आहे. विशेषतः महायुद्धाचे विस्तृत वर्णन मूळ रूपाने संजयाने धृतराष्ट्रास केलेले कथन आहे.

या कथनोपकथनांच्या जाळ्यात गुरफटलेल्या युद्धवर्णनाची एक विशेष मौज पाहा. बहुधा प्रत्येक पर्वाच्या आरंभी वैशंपायन स्वतःच्या शब्दात जनमेजयास त्यातील घटनांचा अति त्रोटक सारांश सांगतो. त्यावर जनमेजय म्हणतो की, मी हे विस्ताराने ऐकू चाहतो. मग वैशंपायन त्याच घटनांचे वर्णन संजयाने धृतराष्ट्रास केलेल्या कथनाच्या रूपांत करतो. पण त्यातही पुनः संजय प्रथम केवळ संक्षिप्त वर्णन देतो; मात्र तें स्वतः वैशंपायनाच्या प्रारंभिक सारांशापेक्षा थोडे अधिक असते. तें एकल्यावर धृतराष्ट्रही संजयास म्हणतो की, हे सारे

✻ येथे 'विशल्य' शब्दांत सुंदर श्लेष आहे. हत्तीच्या संदर्भात त्याचा अर्थ जखमरहित, तर युधिष्ठिराच्या संबंधात 'कौरव सेनापति शल्यरहित' (अर्थात अंतिम लढाईत त्याच्या वधाविषयी आश्वस्त होऊन) असा होऊ शकतो.

मला पूर्ण विस्ताराने सांग. आणि यानंतर संजय सर्व तपशिलासह विस्तृत वर्णन कथन करतो. (व तेच वैशंपायन जनमेजयास व शेवटी सौति शौनकास कथन करतो).

अशा प्रकारे महाकवी त्या युद्धासंबंधी एकाच घटनाक्रमाची तीन कथने देतात, आणि मग त्यात मधूनमधून कूटमय शब्दरचना करून परस्पर विसंगतीचे आभास निर्माण केले जातात; आणि त्यामुळे या महाकाव्यात भिन्न भिन्न लेखकांच्या रचना समाविष्ट आहे असा भ्रम होतो! पण ही तीनही कथने एकाच प्रतिभासंपन्न महाकवीने फार कुशलतेने रचून निरनिराळ्या व्यक्तींच्या मुखांतून वदविली आहेत, व मुळात ती सर्व सुसंगत आहेत.

उदाहरणार्थ, शल्यपर्वात संजयाच्या विस्तृत वर्णनावरून भीम-दुर्योधन गदायुद्ध शल्यवधाच्या दुसरे दिवशी झाले असे दिसून येते, तर वैशंपायनाचे प्राथमिक कथन त्याच्या विरूद्ध सांगताना दिसते. परंतु आपण वर पाहिल्याप्रमाणे ही विसंगती महाकवीच्या 'अपराण्हे तस्यान्हः' शब्दांच्या संदिग्ध प्रयोगाने निर्माण होणारा केवळ आभास आहे. याचप्रमाणे वैशंपायनाच्या त्याच प्राथमिक कथनात दुर्योधनमृत्यूनंतर संजय हस्तिनापुरी पोचण्याची वेळ 'पूर्वाण्हसमय' म्हटली असून, त्या शब्दाचा सामान्य अर्थ दिवसाचा पूर्वभाग, अर्थात सूर्योदय व मध्यान्ह यादरम्यानचा काल, असा आहे. पण पुढे जाऊन स्वतः संजय ती वेळ 'प्रत्यूषकाल' म्हणजे सूर्योदयपूर्व उषःकाल अशी सांगतो (सौप्तिक पर्व ९-६०). पण ही विसंगति देखील केवळ वरवरची आहे; कारण, 'पूर्वाण्हसमय' चा अर्थही 'दिवसप्रारंभ होण्याच्या पूर्वीची वेळ' असा होऊ शकतो ! ❑



प्रकरण १०

# भीष्मोपदेशाच्या तिथ्या

### पाण्डवांची मरणोन्मुख भीष्मांस भेट

माघ पौर्णिमेला रात्रिसमाप्तिसमयी झालेल्या आपल्या निधनापूर्वी भीष्मांनी शरशय्येवरून युधिष्ठिरास विस्तृत धर्मोपदेश केला; तो शांतिपर्व आणि अनुशासन पर्वात आला आहे. तो किती दिवस चालला? वस्तुतः शरशय्येच्या एकूण अठ्ठावन रात्रींच्या कालातून भीष्मांच्या रणभूमीवरील पतनानंतर झालेले शेष युद्ध (त्यातील अवकाश दिनांसह), नंतर एक महिना शौचपालन, युधिष्ठिरास हस्तिनापुरात राज्याभिषेक, आदि घटनांचे दिवस वजा करिता त्या उपदेशाला पाच दिवस उरतात. पुढील विवेचनाने याची पुष्टी होऊन प्रकरण १५ मध्ये दिलेल्या तिथितालिकेवरूनही हे उघड होईल. या गणनेनुसार उपदेश आरंभाची तिथी माघ शुक्ल एकादशी येते.

उपदेश आरंभाच्या एक दिवस पूर्वी माघ शुक्ल दशमीला श्रीकृष्णांसह पांडव कुरुक्षेत्री जाऊन भीष्मांस भेटले. या दिवशी सकाळी युधिष्ठिर प्रथम श्रीकृष्णदर्शनार्थ अर्जुनाच्या महाली गेला. त्यांचा कुरुक्षेत्री भीष्मांकडे जाण्याचा बेत ठरला. युधिष्ठिराने काही सैनिकही बरोबर घेतले (शांतिपर्व ४७-१०८, ४८-२, ४९-८९). तेथे पोचल्यावर श्रीकृष्णांनी भीष्मास विनंती केली की, त्यांनी युधिष्ठिरास धर्मोपदेश द्यावा. भीष्मांशी अशाप्रकारे संभाषण चालू असतां (अध्याय ५०,५१,५२) सूर्यास्त समीप आला.

**ततो मुहूर्ताद् भगवान् सहस्त्रांशुर्दिवाकरः**
**दहन् वैनमिवैकान्ते प्रतीच्यां प्रत्यदृश्यत।।शांतिपर्व, ५२-२६**

"यानंतर थोड्याच वेळात (एक मुहूर्तभराने) भगवान सहस्त्ररश्मी सूर्य वनप्रदेशाला (लालभडक रंगाने भरून) जणू काय अतिशय दग्ध करीत पश्चिम दिशेकडे दिसू लागला." या भेटीच्या दुसऱ्या दिवशी उपदेश प्रारंभ झाला हे यानंतर लागलीच येणाऱ्या अध्यायांवरून स्पष्ट आहे. शिवाय याचा एक संकेत असाही मिळतो की, यावेळी भीष्माजवळ उपस्थित झालेले ऋषिमुनी आपापल्या

निवासस्थानी जाऊ लागले, तेव्हा त्यांनी 'श्वः समेष्याम' (शांतिपर्व ५२-२९) म्हणजे 'आम्ही उद्या परत येऊ' असे म्हटले. यावेळी श्रीकृष्ण व पांडवही भीष्मांना प्रदक्षिणा करून हस्तिनापुरी जाण्यासाठी रथांवर आरूढ झाले (५२-३०).

या ठिकाणी महाभारतकारांनी एक तिथीसूचक संकेतही ठेवला आहे. पांडव आपल्या सेनेसह हस्तिनापुरास परत जाण्यासाठी वळले, तेव्हा त्यांना समोर आकाशात चन्द्र दिसू लागला (हस्तिनापुर कुरुक्षेत्राच्या पूर्वेस होते.)

**ततः पुरस्ताद् भगवान् निशाकरः**

**समुत्थितस्तामभिहर्षयंश्चमूम्।। ५२-३३**

"त्यावेळी भगवान चन्द्रमा त्या सेनेला हर्षवीत, समोर स्पष्ट उंच दिसू लागला." सूर्यास्तानंतर पूर्व दिशेस झालेले हे 'समुत्थित' (आकाशांत उंचावर) प्रसन्न चंद्रदर्शन शुक्ल पक्षाच्या उत्तरार्धातच शक्य असून शुक्ल दशमीची पुष्टी करते.

**भीष्मांच्या शेष दिवसांविषयी एक कूट श्लोक**

येथे महाकवीने एक कालगणनात्मक श्लोक घातला आहे. या दिवशी भीष्मांशी बोलताना श्रीकृष्ण म्हणाले...

**पंचाशतं षट् च कुरुप्रवीर**

**शेषं दिनानां तव जीवितस्य**

**ततः शुभैः कर्मफलोदयैस्त्वं**

**समेष्यसे भीष्म विमुच्य देहम्।। शांतिपर्व, ५१-१४**

"कुरुश्रेष्ठ भीष्मा. तुमच्या जीवनाचे आता 'पंचाशतं षट्च' दिवस शेष आहेत; त्यानंतर तुम्ही देहत्याग करून आपल्या सत्कर्मांच्या शुभफलांच्या उदयाला (उत्तम गतीला) प्राप्त व्हाल." येथे 'पंचाशतं'चा अर्थ पन्नास, व 'षट्'चा सहा करून, एकूण छप्पन दिवस असा आशय सामान्यतः घेतला जातो. पण अनुशासन पर्व श्लोक १६७-२७ (प्रकरण ६ मध्ये उद्धृत) मध्ये म्हटल्याप्रमाणे, भीष्मपतनापासून त्यांच्या मृत्यूपावेतो एकूण अठ्ठावन रात्री गेल्या होत्या. यात काही दिवस भीष्मपतनानंतरच्या शेष युद्धाचे होते. नंतर पांडवांच्या शौचपालनाचा एक महिना व युधिष्ठिराच्या राज्याभिषेकाचे दिवस गेले; आणि या सगळ्यानंतर श्रीकृष्णांची भीष्मांशी ही भेट झाली होती. म्हणून या भेटीपासून भीष्मांचे उर्वरित जीवन छप्पन दिवस राहणे शक्य नव्हते. या संदर्भात केले गेलेले विविध तर्क पाहा.

'विमल बोध'नामक भाष्यात हे छप्पन दिवस रणभूमीवर भीष्मपतनापासून



मोजावे असे म्हटले आहे. यावर डॉ बेलवलकर ठीकच म्हणतात की,*१ भीष्माच्या पतनापासून निधनापावेतो (शरशय्येच्या) एकूण अठ्ठावन्न रात्री गेल्या असल्याने तो काळ छप्पन दिवसांपेक्षा अधिक होतो. शिवाय असे की, श्रीकृष्ण भीष्मांचे शेष जीवन त्या भेटीच्या दिवशी मोजत असता, त्याचा प्रारंभ मागे जाऊन भीष्मपतनापासून मानणे कसे सयुक्तिक होईल?

पण स्वतः बेलवलकर 'पंचाशतं षट्'चा अर्थ सहा वर पांच म्हणजे पासष्ट असा करतात; व 'अशतं' म्हणजे 'शंभरात कमी' असा अर्थ करून, ते 'पंचाशतं षट्च'चा एकूण अर्थ शंभर उणे पासष्ट बरोबर पस्तीस असा करतात. याशिवाय ते त्या शब्दांऐवजी 'पंचाथत्रिंशच्च' वाचावे असेही सुचवितात. तसेच, आचार्य नीलकंठ 'पंचाशतं षट् च', याचा अर्थ ५ x ६ असा करू पाहतात. पण पांडवांच्या या भेटीपासून भीष्मांचे शेष जीवन पसतीस अगर तीस दिवस उरणेही शक्य नव्हते. हे लेखक स्वतःच शौचपालनाचे दिवस कमी मोजून ते शेष दिवस तितके दाखविण्याचा प्रयत्न करतात. अन्य कोणी उपदेशसमाप्तीनंतर काही दिवस गेल्यावर भीष्मनिधन झाले असा तर्क करतात. पण हा भ्रम महाभारतकारांच्या दुसऱ्या एका (अनुशासन पर्व १६७-५) कूटश्लोकामुळे होत असून, त्याचाही सरळ उलगडा पुढे दिला आहे. वस्तुतः महाभारतानुसार उपदेश समाप्त झाला त्याच दिवशी भीष्मनिधन झाले.

प्रो. प्रबोधचंद्र सेनगुप्त तर्क करतात की*२ श्रीकृष्णांनी भीष्मजीवनाविषयी ते उद्गार युद्धाच्या समाप्तीदिवशी (किंवा त्याच्या दुसऱ्या दिवशी) भीष्मांशी बोलताना काढले असतील, पण नंतर कोणीतरी तो श्लोक तिथून हटवून शरशय्येवरील उपदेशाच्या प्रारंभाच्या संदर्भात आणून ठेवला असेल. परंतु स्वतः भीष्म रणभूमीवरील त्यांच्या पतनापासून सुरू झालेल्या (शरशय्येच्या) एकूण रात्री अठ्ठावन मोजत असतां, (आणि ते पतन व युद्धसमाप्ती या दरम्यान दोनपेक्षा अधिक दिवसांचे अंतर असतां), युद्धसमाप्तीपासून त्यांच्या निधनापावेतो छप्पन दिवस कसे होतील? शिवाय, वर म्हटल्याप्रमाणे, श्रीकृष्ण भीष्मांचे शेष जीवन त्या भेटीच्या दिवसापासून मोजत असतां तो काळ युद्धसमाप्तीपावेतो मागे जाऊन कसा मोजावा?

---

*१ भांडारकर शोध संस्थेद्वारा प्रकाशित Anushasana Parvan, Part 1, Introduction. P. Lxxxii, footnote 2; आणि 'सह्याद्रि' मासिक (पुणे, जानेवारी 1949) मधील 'शरपंजरस्थ भीष्माचार्यांचा युधिष्ठिरास उपदेश किती दिवस चालला असावा?' हा लेख.

*२ "Ancient Indian Chronology" pp.22,43-44

या साऱ्या संदर्भात या कूटाचा पुढील सुसंगत अर्थ आता उपलब्ध होत आहे. महाकवीने तेथे 'पंचाशतं' शब्द पन्नास या नेहमीच्या अर्थाने वापरला नाही हे काही जणांचे म्हणणे ठीक आहे; त्या शब्दांचा विग्रह पंच + अशतं असा आहे. पण यानंतर महत्त्वाची गोष्ट अशी की, 'अशतं'मधील 'शतं' शब्दही येथे 'शंभर' या सामान्य अर्थाचा नाही. त्याचा अर्थ स्थूल मानाने 'पुष्कळ' 'बहुत' असाही होतो. याप्रमाणे 'अशतं'चा अर्थ 'पुष्कळ नाही' म्हणजे 'थोडेसेच' असा होईल. श्रीकृष्ण येथे भीष्मांस म्हणत आहे की,"तव जीवितस्य दिनांना शेषं अशतं, पंच षट् च" म्हणजे 'तुमच्या जीवनाचे आता उरलेले दिवस फार नाहीत (थोडेसेच आहेत), किंबहुना केवळ पाच सहा आहेत.' आणि येथे प्रस्थापित तिथि गणनेनुसार माघ शुक्ल दशमीला सायंकाळी श्रीकृष्ण भीष्मांना हे सांगत होते, आणि बरोबर साडेपाच ('पाच-सहा') दिवसांनी माघ पौर्णिमेच्या समाप्तीसमयी भीष्मनिधन झाले !

**उपदेशाचे पाच दिवस**

उपदेशाचा प्रारंभ माघ शुक्ल एकादशीला झाला. प्रथम दिवसाचा वृत्तांत शांतिपर्वाच्या अध्याय ५३ ते ५८ मध्ये आला आहे. या दिवशी सूर्योदयाच्या काहीसे पूर्वी श्रीकृष्ण जागे झाले (५३-१). त्यांनी युधिष्ठिरास भीष्मांकडे तलण्यास प्रेरित केले. भीष्मांजवळ पोचल्यावर युधिष्ठिराने त्यांचा आशीर्वाद घेऊन प्रश्न करण्यास प्रारंभ केला (अध्याय ५६). सूर्यास्तसमयी पांडव हस्तिनापुरी परतले.

**ततो दीनमना भीष्ममुवाच कुरुसत्तमः ।। शांतिपर्व ५८-२७**
**नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यां पादौ तस्य शनैः स्पृशन्**
**श्व इदानीं स्वसन्देहं प्रक्ष्यामि त्वां पितामह**
**उपैति सविता ह्यस्तं रसमापीय पार्थिवम्।। २८**
**... दृषद्वतीं चाप्यवगाह्य सुव्रताः**
**कृतोदकार्थाः कृतजप्यमङ्गलाः**
**उपास्य संध्यां विधिवत् परंतपा**
**स्ततः पुरं ते विविशुर्गजाव्हयम्।।३०**

"त्यानंतर कुरुश्रेष्ठ युधिष्ठिराने भीष्मांच्या चरणांना हळुवार स्पर्श करून दीनचित्ताने साश्रुनयनांनी म्हटले, पितामह, सूर्य (दिवसभर) पृथ्वीतील रस शोषून आता अस्ताचलाजवळ जात आहे; म्हणून मी माझा (आणखी) प्रश्न आपल्याला उद्या विचारीन. २७,२८... आणि त्या शत्रुपीडक उत्तमव्रतधारी वीरांनी (पांडवांनी) दृष्टद्वती नदीत स्नान करून शास्त्रोक्त विधीने जलतर्पण,



जप आदि मंगल कार्य व संध्योपासना केली, आणि नंतर ते हस्तिनापुरी परत आले."

उपदेशाच्या दुसऱ्या दिवशी माघ शुक्ल द्वादशी होती. या दिवसाचा वृत्तांत शांतिपर्वाच्या अध्याय ५९ ते १६७ मध्ये आला असून त्याची सुरुवात अशी आहे-

**ततः कल्यं समुत्थाय कृतपूर्वाण्हिकक्रियाः**
**ययुस्ते नगराकारैः रथैः पाण्डवयादवाः।। शान्तिपर्व ५९-१**
**प्रतिपद्य कुरुक्षेत्रं भीश्ममासाद्य चानघ**
**सुखां च रजनीं पृष्ट्वा गाङ्गेयं रथिनां वरम्।। २**

"तदनंतर पहाटे उठून प्रातःकालीन कर्मे उरकून ते पांडव आणि (श्रीकृष्णादि) यादव नगराकार (विशाल) रथात (हस्तिनापुराहून) निघाले -१. निष्पाप जनमेजया, कुरुक्षेत्री पोचल्यावर महारथी गंगासुत भीष्मांच्या जवळ जाऊन आपली रात्र आरामात गेली ना? अशी त्यांनी कुशल पृच्छा केली." या दिवशी युधिष्ठिरानंतर नकुलानेही एक प्रश्न विचारला (१६६-१); त्याचे उत्तर देऊन भीष्म स्तब्ध झाले. त्यानंतर पांडव हस्तिनापुरी परतले व त्यांनी आपसांतच काही धर्मचर्चा केली.

**इत्युक्तवति भीष्मे तु तूर्ष्णीभूते युधिष्ठिरः**
**पप्रच्छावसथं गत्वा भ्रातृन् विदुरपंचमान्।। शांतिपर्व १६७-१**
**धर्मे चार्थे च कामे च लोकवृत्तिः समाहिता**
**तेषां गरीयान् कतमो मध्यमः को लघुश्च कः।।२**

"इतके बोलून भीष्म शांत झाले व युधिष्ठिर आपल्या निवासस्थानी परतला, आणि आपले चार भाऊ व विदुर अशा पाच जणांना त्याने हा प्रश्न केला-१. प्रायः लोकात धर्म, अर्थ व काम यासाठी प्रवृत्ति दिसून येते; या तिघात सर्वश्रेष्ठ, मध्यम व कनिष्ठ काय आहे?"

उपदेशाच्या तिसऱ्या दिवशीच्या वृत्तांत शांतिपर्व अध्याय १६८ ते ३३९ मध्ये आला आहे. रोज सकाळी कुरुक्षेत्रास जाणे व सायंकाळी परत हस्तिनापुरास येणे, ही प्रथम दोन दिवसांची महाभारतात स्पष्ट सांगितलेली प्रथा पुढेही चालू राहिली. महाकवीने रोज जाण्यायेण्याचा पुढे स्पष्ट उल्लेख केला नसला, तरी एका कूट श्लोकाद्वारे त्याचा संकेत दिला असून, त्याची चर्चा खाली केली आहे. तिसऱ्या दिवशीच्या उपदेशाचा प्रारंभ पुढील श्लोकाने सूचित होतो. वैशंपायन जनमेजयास सांगतात की, आपल्या निवासस्थानी (हस्तिनापुरात) आपसात झालेल्या धर्मचर्चेत शेवटी स्वतः युधिष्ठिरानेही आपले मत व्यक्त

केले. ते ऐकल्यावर-

**स चापि तान् धर्मसुतो महामना-**
**स्तदा प्रतीतान् प्रशशंस वीर्यवान्**
**पुनश्च पप्रच्छ सरिद्वरासुतं**
**ततः परं धर्ममहीनचेतसम्।।१६७-५१**

"त्यावेळी ते (तेथे उपस्थित सर्व) प्रसन्नचित्त झाले व पराक्रमी धर्मपुत्र महात्मा युधिष्ठिरानेही त्यांची प्रशंसा केली; आणि त्यानंतर त्याने उदारहृदयी गंगासुत भीष्मांना (धर्माधर्मविषयक तोच विषय घेऊन) धर्माविषयी पुनः प्रश्न केला." आपसातील चर्चा घरी झाली होती आणि भीष्म कुरुक्षेत्री होते. महाकवीने 'ततः'चा येथे संदिग्ध प्रयोग केला असून, तिसऱ्या दिवशी पांडव हस्तिनापुराहून पुनः भीष्मांजवळ गेले हे या श्लोकावरून सूचित होते. या दिवशीचा उपदेश अध्याय ३३९ पावेतो चालून, त्यानंतर अध्याय ३४० ते ३५१ मध्ये भीष्मोपदेशाशी संबंध नसलेला एक वैशंपायन-जनमेजय संवाद आला आहे. यावरून दिसते की, त्या दिवशीचा भीष्मोपदेश अध्याय ३३९ नंतर स्थगित झाला. त्या अध्यायाच्या शेवटी भीष्म, वैशंपायन व सौति यांचे एका विषयखंडाचा समारोप सुचविणारे काही उद्‌गारही आहेत.

चौथ्या दिवशीचा उपदेश शांतिपर्व अध्याय ३५२ ते ३६४ व अनुशासन पर्व अध्याय १ ते १०९, यात आला आहे. या दिवशीच्या उपवदेशसमाप्तीचा संकेत पुढील श्लोकात मिळतो.

**शरतल्पगतं भीष्मं वृद्धं कुरुपिताहम्**
**उपगम्य महाप्राज्ञः पर्यपृच्छद् युधिष्ठिरः।।अनुशासन पर्व ११०-१**

"शरशय्येवर पडलेल्या वृद्ध कुरुपितामह भीष्मांच्या जवळ जाऊन महाबुद्धिमान युधिष्ठिराने प्रश्न केला." येथे उपदेशाचा नवीन दिवस सुरू होत नसता, तर युधिष्ठिराने प्रश्न करण्यासाठी पुनः शरशय्यास्थित भीष्मांच्या 'समीप जाण्याचा' मुद्दाम उल्लेख करण्यात काय हंशील होता?

यानंतर शेवटच्या पाचव्या दिवशीचा वृत्तांत अनुशासन पर्व अध्याय ११० ते १६५ मध्ये आहे. या दिवशी माघ पौर्णिमा होती. या दिवशी उपदेश करीत असता भीष्मांना अतिशय ग्लानी येऊन, आपला मृत्यु आता दूर नाही असे त्यांना वाटू लागले (१५८-४). तदुपरांत थोडेसे आणखी भाषण करून भीष्मांनी आपला धर्मोपदेश पूर्णपणे समाप्त केला; आणि युधिष्ठिराला आशीर्वाद देऊन हस्तिनापुरास परत जाण्याचा आदेश देत म्हटले की, माझ्या प्राणत्यागार्थ निश्चित केलेल्या उत्तरायणप्रारंभ समयी मजकडे पुनः यावे (१६६-१४). यावर



होय म्हणून युधिष्ठिर हस्तिनापुरास परत गेला. (१६६-१५).

**महाकवीचे आणखी एक 'कालकूट'**

पाचव्या दिवशी उपदेश समाप्तीनंतर पांडव दररोजप्रमाणे हस्तिनापुरास परत गेले, आणि भीष्मनिधनार्थ नियुक्त समयी परत त्यांच्याजवळ आले. ते किती वेळाने परत आले? माझ्या गणनेप्रमाणे पांडव (माघ) पौर्णिमेला सायंकाळी भीष्मापासून हस्तिनापुरी गेले, आणि त्याचदिवशी काही तासानंतर उत्तररात्री भीष्माकडे परत आले. पण यासंबंधात महाभारतातील एका पंक्तीने अभ्यासकांना अतिशय घोटाळ्यात टाकले आहे.

**उषित्वा शर्वरीः श्रीमान् पंचाशन्नगरोत्तमे**
**समयं कौरवाग्रस्य सस्मार पुरुषर्षभः।। अनुशासन पर्व १६७-५**
**स निर्ययौ गजपुरात् याजकैः परिवारितः**
**दृष्ट्वा निवृत्तमादित्यं प्रवृत्तं चोत्तरायणं।।६**

यात शेवटच्या तीन ओळींचा अर्थ असा आहे,"पुरुषश्रेष्ठ युधिष्ठिर कुरुकुलप्रमुख भीष्मांच्या (निधनार्थ निर्धारित) समयाचे स्मरण करत राहिला; व सूर्य (दक्षिणायनातून) निवृत्त होऊन उत्तरायणात प्रविष्ट होत आहे असे पाहून, (अंत्यविधिसाठी) याजकांसह तो हस्तिनापुरातून (पुनः भीष्मांकडे येण्यास) निघाला." पण प्रथम ओळीचा बहुधा असा अर्थ केला जातो की, युधिष्ठिराने 'पंचाशत्' म्हणजे पन्नास रात्री त्या उत्तम नगरात (हस्तिनापुरांत) घालविल्यावर (त्याला भीष्मनिधन समय प्राप्त झाल्याचे स्मरण झाले). परंतु, उपदेशसमाप्ती व भीष्मनिधन या दरम्यान पन्नास रात्री कशा जाऊ शकत होत्या? शरशय्येवर भीष्मांच्या एकूण अठ्ठावन रात्री गेल्या; आणि त्यातून भीष्मपतनानंतरचे लढाईचे दिवस, शौचपालनाचा महिना, राज्याभिषेकाचे व नंतर उपदेशाचे दिवस, हे सारे वजा करत, उपदेशसमाप्तीनंतर भीष्मनिधनापावेतो पन्नास रात्री जाणे अशक्य होते.

श्री. कृ. बेलवलकर येथे 'शर्वरीः' (या अनेकवचनी रूपाच्या) ऐवजी 'शर्वरीम्' हे एकवचनी रूप, व 'पंचाशत्' ऐवजी 'पंचाहं' (म्हणजे पाच दिवस) वाचावे असे सुचवून ('सह्याद्रि' मासिकातील पूर्वोक्त लेखात) म्हणतात की, पोथीलेखकाच्या प्रमादाने 'ह' चा 'श' झाला असेल. त्यांच्या मते भीष्मोपदेश सुमारे एक महिना चालून, उपदेशमाप्तीनंतर युधिष्ठिराने हस्तिनापुरात पाच दिवस व एक रात्र घालविल्यावर भीष्मनिधनसमय प्राप्त झाला. पण वर दाखविल्याप्रमाणे, उपदेशाला एक महिना व शिवाय त्यानंतर भीष्मनिधनापूर्वी आणखी पाच दिवस मिळणे शक्य नव्हते. रा.ना. दांडेकर यांनी बेलवलकरांची

सूचना अमान्य करून म्हटले आहे की, या श्लोकात निर्दिष्ट पन्नास रात्रींचे सुसंगत स्पष्टीकरण संभव नाही.✻१ चिं.वि.वैद्यही असेच म्हणतात (पू.उ.पृ.१२७-१२८). प्रो. सेनगुप्त✻२ या श्लोकाचा असा अर्थ करतात की, युद्धसमाप्तीपासून युधिष्ठिराने हस्तिनापुरात पन्नास रात्री घालविल्यानंतर भीष्मनिधनाचा समय आला. पण युद्ध समाप्त झाल्यावर युधिष्ठिराने एक महिना शौचपालनात 'शहराच्या बाहेर' ("बहिःपुरात्", शांतिपर्व १-२) घालविल्यानंतर हस्तिनापुरात प्रवेश केला (शांतिपर्व, अध्याय ३७), या महाभारतातील वचनाशी त्या अर्थाचा विरोध येतो.

आता या कूटवचनाचे पुढील सुसंगत स्पष्टीकरण वाचकांसमोर ठेवतो. त्यात "पंचाशन्नगरोत्तमे" याचा विग्रह 'पंचाशत् + नगरोत्तमे' असा नसून पंच +अशं+नगरोत्तमे असा आहे! 'पंच' म्हणजे पांच. या संख्येची संगति 'शर्वरीः' या अनेकवचनी शब्दाशी बरोबर जुळते. यानंतर ध्यानात घ्यावयाचे ते हे की, ज्याप्रमाणे 'अशत्' (किंवा पंचाशत्) समोर 'न' आल्यास 'त'चा 'न्' होऊन 'न्न' होईल, तसेच 'अशम्' (अशं) समोरही 'न' आल्यास 'म्' चा 'न्' होऊन 'अशन्न' हे रूप होऊ शकेल! "शं नो देवी रभिष्टय आपो भवन्तु पीतये" या वैदिक वचनातील पहिली दोन अक्षरे 'शन्नो' अशीही लिहिली जातात. तोच प्रकार "शन्नो अस्तु (भव) द्विपदे शं चतुष्पदे" (ऋग्वेद १०-४५-४३,१०-८५-४४) या मंत्राचा आहे. याशिवाय असेच एक उदाहरण प्रत्यक्ष महाभारतातही आढळते. संजय धृतराष्ट्रास म्हणतो-

**इत्येवं द्रोणपुत्रस्य निशम्य करुणां गिरम्**
**प्रत्यूषकाले शोकार्तः प्राद्रवन्नगरं प्रति।। सौप्तिक पर्व, ९-६०**

"(दुर्योधनाच्या अंतिम क्षणी) अश्वत्थामाने काढलेले हे करुण उद्‌गार ऐकून मी शोकग्रस्त होऊन पहाटे हस्तिनापुरास तडक चालला आलो." येथे 'प्राद्रवन्नगरं' याचा विग्रह '(अहम्) प्राद्रवम् नगरं'असा असून 'म् + न' मिळून 'न्न' झाला आहे.

याचप्रमाणे 'पंचाशन्नगरोत्तमे'मध्ये 'नगरोत्तमे' पूर्वी (पंच + अशम् =) 'पंचाशम्' शब्द असून 'पंचाशत्' नाही. आता (शम्) 'शं'चा अर्थ कल्याणप्रद, सुखी, स्वस्थ असा होतो; म्हणून 'अशम्'चा अर्थ दुःखी, अस्वस्थ, उदास असा

✻१ भांडारकर शोध संस्थेद्वारा प्रकाशित Anushasana Parvan, Part 1, Introduction, P.LXXXII and also p1121.

✻२ पू. उ.PP 7,20.



होईल. याअनुसार वरील पंक्तीचा एकूण अर्थ होतो," युधिष्ठिराने त्या श्रेष्ठ नगरात (हस्तिनापुरात) पाच रात्री दुःखी उदास मनःस्थितीत घालविल्यानंतर" (भीष्मनिधनसमयाचे स्मरण ठेवून तो भीष्माकडे परत आला).

बरें, या पाच दुःखी रात्री कोणत्या? उपदेश पूर्ण समाप्त झाल्यावर भीष्मनिधनापूर्वी युधिष्ठिराने या पाच अतिरिक्त रात्री हस्तिनापुरात घालविल्या असे नाही. शुक्ल दशमीला श्रीकृष्णांसह पाण्डव भीष्मांकडे गेले तेव्हा श्रीकृष्णांनी भीष्मांना (वर स्पष्ट केल्याप्रमाणे) म्हटले की, आता तुमचे जीवन केवळ पाच सहा दिवसच उरले आहे, कारण तत्कालीन पंचांगावरून उत्तरायण प्रारंभाची तिथी माहीत असलीच पाहिजे. या परिस्थितीत पितामह भीष्मांच्या त्या अखेरच्या दिवसांत त्यांच्यापासून थोडाही वेळ दूर न राहण्याची युधिष्ठिरास साहजिकच इच्छा असली पाहिजे. पण दैनंदिन राज्यकार्यार्थ त्याला रोज राजधानीत परतणे आवश्यक होते. म्हणून उपदेश प्रारंभ झाल्यावरही युधिष्ठिर मोठ्या कष्टी अंतःकरणाने भीष्मांपासून परत दररोज हस्तिनापुरात जात असे. आणि रात्र तेथे काढून पुनः दुसरे दिवशी भीष्मांकडे येत असे. युधिष्ठिराच्या त्या वेळच्या या दुःखी मनःस्थितीचा महाभारतकारांनी शांतिपर्व ५८-२७, २८(वर उद्धृत) मध्ये स्पष्ट उल्लेख केला आहे.

युधिष्ठिराने मरणोन्मुख भीष्मांपासून दूर होऊन माघ शुक्ल दशमी, एकादशी, द्वादशी, त्रयोदशी व चतुर्दशीच्या (हस्तिनापुरांत घालविलेल्या) या पाच रात्रींचा मार्मिक उल्लेख महाकवीने कूटात्मकरीत्या वरील श्लोकांत केला आहे. पण याशिवाय उपदेशाच्या शेवटच्या दिवसाची (पौर्णिमेची) रात्रही युधिष्ठिराने अतिशय दुःखी मनाने घालविली नसेल काय? परंतु त्या दिवशी उपदेश समाप्तीनंतर युधिष्ठिर हस्तिनापुरी परत आल्यावर, त्याच रात्रिसमाप्ती प्रहरी भीष्मांच्या प्राणत्यागाचा समय असल्याने, युधिष्ठिर पुनः त्या रात्रीच अन्त्येष्टीची सर्व सामग्री घेऊन कुरुक्षेत्री भीष्मांकडे परत जाण्यास निघाला. आणि या कारणाने ही पौर्णिमेची रात्र त्याने हस्तिनापुरात घालविली नाही.✻

अशाप्रकारे या श्लोकाचा प्रचलित पाठ पूर्ण सुसंगत व सार्थक आहे. इतकेच की, महाकवीने 'पंचाशं नगरोत्तमे' ऐवजी 'पंचाशन्नगरोत्तमे' असे महाभारताच्या सर्वप्रथम पोथीत लिहून ठेवले (अथवा गणपतीकडून लिहविले), आणि अभ्यासकांसाठी एक कूट निर्माण करून ठेवले !

✻ या पुस्तकाच्या प्रथम आवृत्तींत मी त्या पांच रात्रीत दशमीची रात्र न मोजता पूर्णिमेची समाविष्ट केली होती; आता त्यात बदल केला आहे.

म्हणजे एकूण मौज अशी की, वरवर सारख्या भासणाऱ्या अक्षरसमूहांचे भिन्न भिन्न अर्थाने प्रयोग करून महाकवीने चमत्कारिक कालगणनात्मक कूटें करून ठेवली आहेत. भीष्मांच्या शरशय्येवरील एकूण रात्री मोजताना ते 'अष्टपंचाशतं' म्हणतात, व त्यात 'पंचाशतं'चा पन्नास (व म्हणून अष्टपंचाशतं चा अठ्ठावन) असा सरळ अर्थ आहे. उलट, उपदेश आरंभापूर्वी भीष्मांचे शेष दिवस मोजताना महाभारतकार 'पंचाशतं षट्च' म्हणतात; आणि त्यात 'पंच' म्हणजे पांच ही संख्या असून 'अशतं' हा वेगळा शब्द आहे. आणि शेवटी, युधिष्ठिराच्या हस्तिनापुरातील भीष्मनिधनपूर्व दुःखी रात्रींचा उल्लेख करताना महाकवि 'पंचाशन्नगरोत्तमे' असा शब्दप्रयोग वापरतात, त्यात उद्दिष्ट संख्या पुनः पाच हीच असली तरी बाकीचा शब्द 'अशम्' आहे!

युद्धकालासंबंधी भीष्मनिधनापावेतोची संपूर्ण तिथितालिका, सूर्यचंद्रांच्या नक्षत्रीय स्थानांसह, पुढे प्रकरण १५मध्ये दिली आहे. □



भाग ३

## ज्योतिषात्मक कूटे

प्रकरण ११

# शांतिवार्तेच्या दिवसाची ग्रहस्थिती

### विद्वानांची विविध मते

महाभारतात ज्योतिषविषयक कूटेही असून ती बव्हंशी युद्धकालवर्णनात आली आहेत. त्यांचे अर्थ लावण्याचे विविध प्रयास झाले आहेत.

काही विद्वानांच्या मताने महाभारतातील हे ग्रहस्थितीसंबंधी उल्लेख पूर्णपणे असंगत व असंभव आहेत, आणि त्यातून काहीही सयुक्तिक आशय काढणे अशक्य आहे. डॉ. पां. वा. काणे म्हणतात,"The astronomical passages in the Mahabharata... are hopelessly inconsistent and that no certain chronological conclusion can be drawn thereform... To me it appears probable that the final redactor of the Mahabharata had two or more sets of astronomical data about the war before him and without trying to examine and sift then he included them all in his work... I hold that either the Mahabharata passages on the position of the planets were interpolated at a very late stage or are hopelessly inconsistent."✻१ स्वामीकन्नु पिल्लई लिहितात,"Some of the Mahabharata references to astronomy afford an even better illustration of reckless astrological statements made without due regard to astronomical possibilities."✻२ चिं.वि.वैद्य देखील म्हणतात, "... the astronomical references in Mahabharata of which much has been made by some thinkers. We, on our part, believe that they do not belong to the original Mahabharata of Vyasa but to its latest edition. It will be admitted by all that some of them are fanciful and absurd."✻३

---

✻१ पू.उ. Vol III, p.923

✻२ Quoted by S. Raghavan, पू.उ.P 36

✻३ "Mahabharata - a Criticism", p. 64. आणखी अशाच मतांसाठी पाहा History and Culture of Indian People, Vol.1, P.272, व दफ्तरी (पूर्व उल्लेखित).

पण काही अन्य विद्वानांना महाभारतातील ज्योतिषात्मक वचने सुसंगत भासून ते त्या आधारे महाभारत युद्धाचे वर्ष निश्चित करू पाहतात. मात्र त्यांचे निष्कर्ष इ.स. पूर्व सुमारे बत्तिसाव्या शतकापासून इ.स. पूर्व सुमारे बाराव्या शतकापावेतो भिन्न भिन्न आहेत.

यापैकी प्रथम गटाची महाभारतातील ज्योतिषात्मक विधानांची टीका त्या वचनांचा वास्तविक गूढ आशय ध्यानात न येण्याचा परिणाम आहे. आता त्या कूट वचनांचाही सुसंगत उलगडा होत असून, तो पुढील प्रकरणांतून स्पष्ट केला आहे. पण मौज अशी की, दुसऱ्या गटातील लेखकांची अनुमानेही प्रायः भ्रामक आहेत. महाभारतातील ज्योतीषीय उल्लेख अर्थपूर्ण आहेत हे यांचे म्हणणे बरोबर असले, तरी ते ज्या तिथ्या, दिवस व नक्षत्रे गृहीत धरतात ती चूक आहेत हे आता सिद्ध होत आहे. त्यामुळे त्यावर आधारित यांची अनुमाने दिशाभूलकारक ठरतात. हेही पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल.

महाभारताची रचना कूटमय असल्याने काही वेळा त्यांतील एक वचनाचा आशय स्पष्ट करण्यासाठी नंतरच्या श्लोकांचे विवेचन आधी आवश्यक असते. उदाहरणार्थ, वनवास प्रारंभाची तिथी काढण्यापूर्वी आपल्यास अज्ञातवास समाप्ती तिथी निश्चित करावी लागली. ज्योतिषात्मक विवेचनातही काही स्थळानंतरची एखादी स्थिति निश्चित करून मग त्या आधारे तत्पूर्वीची स्पष्ट करणे संभव ठरू शकेल.

**ग्रहस्थिती वर्णनाचा प्रारंभ**

ग्रहस्थितीचा प्रथम तपशीलवार उल्लेख श्रीकृष्णांच्या हस्तिनापुरातील शांतिवार्तेच्या वृत्तांतात येतो. श्रीकृष्ण त्या प्रवासासाठी उपप्लव्याहून निघाले त्यावेळी चन्द्र रेवती नक्षत्रात होता; आणि ज्या दिवशी शांतिवार्ता झाली, त्या दिवशी चन्द्र पुष्य नक्षत्रात होता हे महाभारतात सांगितले आहे (प्रकरण ५ पाहा.) याशिवाय, शांतिवार्तेच्या दिवशींची काही ग्रहांचीही स्थिती महाभारतकारांनी दिली असून, ती हस्तिनापुरच्या सीमेवर श्रीकृष्णांशी बोलताना कर्णाच्या तोंडी अशी आली आहे-

**प्राजापत्यं हि नक्षत्रं ग्रहस्तीक्ष्णो महाद्युतिः**
**शनैश्चरः पीडयति पीयडन् प्राणिनोऽधिकम्।। उद्योगपर्व १४३-८**
**कृत्वा चाङ्गारको वक्रं ज्येष्ठायां मधुसूदन**
**अनुराधां प्रार्थयते मैत्रं संगमयन्निव।।९**
**नूनं महद्भयं कृष्ण कुरूणां समुपस्थितम्**
**विशेषेण हि बार्ष्णेय चित्रां पीडयते ग्रहः।।१०**



**सोमस्य लक्ष्म व्यावृत्तं राहुरर्कमुपैति च।...११**

या श्लोकांचा संबंध पुढील ग्रहांशी आहे.

**शनि** :- श्लोक ८ मध्ये म्हटले आहे की,'तेजस्वी दुष्ट ग्रह शनि प्राजापत्य नक्षत्राला पीडा देत असून प्राण्यांना अति पीडादायक आहे.' येथे शनीचे स्थान स्पष्ट सांगितलेले नाही. पण सहा दिवसानंतर शनि अनुराधेत सुचविला आहे. (पाहा प्रकरण १३). शनीची गती अति मंद असल्याने या दिवशीही तो तेथे मानता येईल. आता 'प्राजापत्य' (ज्याची देवता प्रजापति आहे असे) नक्षत्र म्हणजे (कृत्तिकेनंतरची) रोहिणी किंवा मूळ नक्षत्र होय. परंतु भीष्मपर्व २-३२ मध्ये स्पष्ट केले गेले आहे की, शनि त्या दिवसांत रोहिणीला पीडा देत होता; आणि रोहिणीचा एक अर्थ ज्येष्ठा नक्षत्र असला, तरी ज्येष्ठेची देवता प्रजापती नसल्याने ज्येष्ठा येथे विचारबाह्य ठरते. सारांश, शनि यावेळी (अनुराधेत असून) (कृत्तिकेनंतरच्या) रोहिणीला पीडा देत होता. तो अशा अंतरावरून असे करू शकतो.

**मंगळ**:- श्लोक ९ मध्ये म्हटले आहे," कृष्णा, मंगळ (अंगारक) ग्रह ज्येष्ठेत वक्र होऊन अनुराधेजवळ पोचला आहे; (ज्येष्ठकडे पाठ फिरवून) तो जणू मैत्र नक्षत्र म्हणजे अनुराधेची मीलनार्थ विनवणी करीत आहे !" अशा रीतीने मंगळ यावेळी वक्र गतीत ज्येष्ठेपासून उलटा येत अनुराधेच्या जवळ होता.

**राहु**:- श्लोक १० मध्ये म्हटले आहे की,'(कोणी) एक ग्रह विशेषेकरून चित्रेला पीडा देत आहे, व हे कुरुवंशाला वस्तुतः फार भयसूचक आहे.' हा ग्रह श्लोक ९ मध्ये निर्दिष्ट मंगळ किंवा श्लोक ११ मध्ये निर्दिष्ट राहु असू शकेल. राहु सहा दिवसानंतर विशाखेत होता (प्रकरण १३); व त्याची मंद गति पाहता तो या दिवशीही तेथेच मानता येईल. तेथून तो चित्रेला पीडा देऊ शकत होता. शिवाय, श्लोक ११ मध्ये म्हटल्याप्रमाणे 'राहु सूर्याच्या जवळ जात होता.' या दिवशी सूर्य स्वातीत होता हे पुढे दाखविले आहे. अशाप्रकारे राहू (जो नेहमी उलट दिशेने फिरतो) सूर्याच्या जवळ जात होता. □

प्रकरण १२

# मघानक्षत्राचा दिवस

**चन्द्र मघा नक्षत्रात**

संजयाने दिलेल्या पहिल्या युद्धवृत्तांतात प्रत्यक्ष लढाईच्या आरंभापासूनच नव्हे तर त्याच्याही पूर्वी उभय सेना कुरुक्षेत्री पोचून त्यांनी आपापल्या छावण्या उभारल्या आदि हकीकतही आली आहे. त्यात पुढील दोन श्लोक आहेत.

**यथा स भगवान् व्यासः कृष्णद्वैपायनोऽब्रवीत्**
**तथैव सहिताः सर्वे समाजग्मुर्महीक्षितः।।भीष्मपर्व, १७-१**
**मधाविषयगः सोमस्तद्दिनं प्रत्यपद्यत**
**दीप्यमानाश्च सम्पेतुर्दिवि सप्तमहाग्रहाः।।२**

"भगवान कृष्णद्वैपायन व्यासांनी म्हटल्याप्रमाणे सर्व राजे (कुरुक्षेत्रावर) एकत्र झाले-१. त्या दिवशी चंद्र मघा नक्षत्रात होता; व आकाशात सात महाग्रह तेजस्वी तळपत दिसले-२."

महाभारताचे संस्कृत भाष्यकार नीळकंठ वरील श्लोकांचा संबंध प्रत्यक्ष युद्धारंभाशी लावतात, पण युद्धारंभदिवशी चन्द्र मृग नक्षत्रात होता असेही त्यांचे मत असल्याने, ते त्या दिवशी चन्द्र मघेत मानू शकत नाही. म्हणून ते वरील श्लोकातील 'मघा' शब्दाचा अर्थ 'मघा नक्षत्राचे सहचर असलेल्या पितृदेवतांचा निवास' असा करून म्हणतात की, त्या युद्धात मरणाऱ्या योद्धांच्या उत्तम गतीसाठी या युद्धारंभदिवशी चन्द्र पितृलोकात स्थित होता. चि.वि.वैद्य देखील तो दिवस युद्धारंभाचा मानतात; पण युद्धारंभी चन्द्र मृगात होता हे त्यांचेही मत असल्याने ते शेवटी म्हणतात,"मागीलपुढील वाक्यावरून युद्धारंभी चन्द्र मृग नक्षत्री होता असे दिसते. मग वरील वाक्यात मघा कशा म्हटल्या? हे एक गूढ आहे."*

श्री दप्तरी हा दिवस युद्धारंभाचा मानीत नाहीत; मात्र 'मघाचा' अर्थ

* "महाभारताचा उपसंहार", पृ. 126



'मूळ' नक्षत्र असा करतात.*१ त्यावर टीका करीत काणे ठीकच म्हणतात की,*२ महाभारतकारांचा तसा आशय असता तर त्यांनी 'मघाविषयगः' ऐवजी सरळ 'मूळनक्षत्रगः' असे म्हटले नसते काय? मात्र स्वतः काणे हा दिवस युद्धारंभाचाच मानून असा अर्थ देतात की, त्या दिवशी चन्द्र मघा नक्षत्राच्या 'क्षेत्रात' म्हणजे मघाच्या जवळपास होता. पण युद्धारंभी चन्द्र जेष्ठेत होता हेही त्यांचे मत असल्याने ते म्हणतात की, महाभारतात युद्धारंभाची तिथी व नक्षत्र या बाबतीत विसंगती आहे. आणि शेवटी महाभारताच्या एका पोथीत तर 'मघाविषयगः सोमः' हा पाठच बदलून 'मेघावनद्धमाकाशं' (आकाश मेघांनी व्याप्त होते) असे लिहिले आहे!*३

**तो दिवस युद्धारंभाचा नव्हता**

वस्तुतः वरील श्लोकात 'मघाविषय' म्हणजे मघा नक्षत्रच आहे. पण हा युद्धारंभाचा दिवस नव्हता. ज्या दिवशी चन्द्र पुष्यांत होता त्या दिवशी श्रीकृष्णांनी कर्णाला सातव्या दिवसानंतर येणारी अमावस्या युद्धारंभार्थ घोषित केली होती. चन्द्र दररोज सरासरी एक नक्षत्र जातो, व पुष्यापासून मघा दोनच स्थाने पुढे आहे. हे पाहता मघा नक्षत्राचा दिवस युद्धारंभाचा असू शकत नाही. अमावास्या अद्याप पाच दिवस दूर होती; आणि युद्धारंभ अमावास्येलाच झाला हे मागील प्रकरणात सिद्ध केले आहे.

मघानक्षत्रदिवसाच्या वृत्तांतात (भीष्मपर्व अध्याय १७,१८, १९) म्हटल्याप्रमाणे त्या दिवशी पांडव सैन्याची व्यूहरचना अर्जुनाने केली होती; परंतु प्रत्यक्ष युद्धाच्या प्रथम दिवशी पांडव सैन्याची व्यूहरचना धृष्टद्युम्नाने केली होती (उद्योग पर्व १६४-१०, ११, १२ व गीता १-३). याशिवाय युद्धारंभदिवशी लढाई सुरू होण्यापूर्वी गीतोपदेश झाला, व त्यानंतर युधिष्ठिराने रणभूमीवरच भीष्मद्रोणांना वंदन केले; परंतु मघा नक्षत्र दिवसाच्या वर्णनात याचा काहीही उल्लेख वा संकेत नाही.

**महाकवीचे कूट**

पुष्य नक्षत्राच्या दिवशी उभय सैन्यांनी आपापल्या स्थानापासून कुरुक्षेत्राकडे प्रस्थान केल्यावर दुसरे दिवशी ती कुरुक्षेत्री पोचली. पण युद्धारंभार्थ घोषित अमावास्या अद्याप काही दिवस दूर होती. दरम्यानच्या दिवसात उभय पक्षांनी

*१ पू. उ. pages 26-27
*२ पू.उ.pages 907-917
*३ पाहा भांडारकर संस्थेद्वारा प्रकाशित "Bhishma Parvan" p 767 Note on verse 17-2.

कुरुक्षेत्राच्या आपापल्या विभागात शिबिरे उभारली आणि युद्धाचे 'पूर्वाभ्यास' (Rehearsals) केले. आणि महाकवीने दिलेले मघानक्षत्र दिवसाचे वर्णन या 'पूर्वाभ्यासांचे' आहे, प्रत्यक्ष लढाईचे नव्हे ! या वर्णनात महाभारतकार शंख, दुंदुभि आदींच्या ध्वनीचा, व तसेच हत्ती, अश्व, रथ यांच्या हालचालींनी होणाऱ्या कोलाहलाचा, वारंवार उल्लेख करतात; पण प्रत्यक्ष बाण वृष्टि, शस्त्रांचा एकमेकावर प्रहार, कोणी हताहत होणे, इत्यादींचे नांवही घेत नाहीत! उलट प्रत्यक्ष लढाईच्या वर्णनात अर्थातच तसे स्पष्ट उल्लेख येतात. उघडच मघानक्षत्र दिवशी उभय सैन्यांनी रणभूमीवर जे केले ते केवळ पूर्वाभ्यासस्वरूप होते. (याची अधिक चर्चा प्रकरण १७ मध्ये केली आहे.)

मघानक्षत्रदिवस युद्धारंभाचा होता असा भ्रम निर्माण करण्यास महाभारतकारांनी आणखी एक खुबी कारणीभूत झाली आहे. अमावास्येस प्रारंभ होणाऱ्या युद्धाच्या पूर्वरात्रीच्या ग्रहस्थितीचे महाभारतात विस्तृत विवरण वद्य चतुर्दशीला झालेल्या व्यास-धृतराष्ट्र संवादात आले आहे. (प्रकरण १३ पाहा). मघानक्षत्रदिवसाच्या चार दिवसांनंतर झालेला तो संवाद वैशंपायनाने जनमजेयाला स्वतःच्या शब्दात कथन केला आहे; उलट मघानक्षत्रदिवसाचे वर्णन संजयाने धृतराष्ट्रास दिलेल्या पहिल्या युद्धवृत्तांतात आले आहे. त्या वृत्तांतात संजयाने प्रत्यक्ष लढाई आरंभ होण्याच्या काही दिवस पूर्वी कुरुक्षेत्रावर झालेल्या घटनांचीही माहिती सांगितली आहे. आणि महाभारताच्या रचनेत संजयाचा तो संपूर्ण वृत्तांत (व म्हणून त्यांतील मघानक्षत्रदिवसाचे वर्णन) वैशंपायनाने (वद्य चतुर्दशीचा) व्यास-धृतराष्ट्र संवाद जनमेजयाला कथन केला त्याच्या नंतर येतो. यामुळे मघानक्षत्रदिवस त्या वद्य चतुर्दशीच्या नंतर आला व म्हणून युद्धारंभाचा दिवस असावा असा महाभारताच्या अभ्यासकांना भास होत राहिला.

### सप्त महाग्रह दीप्यमान होते म्हणजे काय?

आता त्या दिवशी आकाशात सात महाग्रह तेजाने तळपताना दिसले या वर्णनावर विचार करू. काहीच्या मते हे सात महाग्रह सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र व शनि हे असून, हे सर्व या समयी परस्परांच्या निकट आले होते. परंतु सात महाग्रह एकत्र आले होते, अगर एकमेकापासून अंतरावर का होईना पण एकाच समयी आकाशात दृश्यमान होते असेही वरील श्लोकात म्हटलेले नाही. शिवाय असे की, त्या सात ग्रहांत सूर्याचा समावेश करणे व्यर्थ आहे. हे खरे की, सूर्य एक तारा असताही (क्रांतिवृत्तातील त्याच्या भासणाऱ्या गतीमुळे) भारतीय ज्योतिषात त्याला ग्रह मानले गेले. पण वर्षाऋतूनंतर बरेच



दिवस लोटून गेल्यानंतर या दिवशी सूर्य तेजस्वी दृश्यमान होता हे सांगण्यात विशेष स्वारस्य नव्हते. आणि आकाशात सूर्य दृश्यमान असताना त्याचवेळी चंद्र व शुक्र सोडून अन्य ग्रह दृश्यमान होणे शक्य नसून, ते दोघेदेखील 'दीप्यमान' भासणार नाहीत. महाकवीचा आशय येथे हा आहे की, सूर्य सोडून अन्य सात महाग्रह त्या दिवशी रात्री वेगवेगळ्या समयी विशेष प्रकाशमान दिसले होते. ते सात ग्रह चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि व धुमकेतु हे होते. धूमकेतुला भीष्मपर्व श्लोक ३-१३ (प्रकरण १३ मध्ये उद्धृत) महाग्रह म्हटले आहे. आणि चंद्र हा पृथ्वीचा उपग्रह असला तरी भारतीय ज्योतिषांत त्याला अन्य ग्रहासमान मानले जाते.

आता हे सात ग्रह प्रकाशमान दिसण्यासाठी ते सूर्याच्या निकट नसणे (सारांश त्यांचा 'अस्त' नसणे) आवश्यक आहे. पुढे दाखविल्याप्रमाणे (प्रकरण १३ व १५), पाच दिवसांनंतर येणाऱ्या अमावास्येला सूर्य स्वातीत होता, आणि तेही काही दिवस पूर्वीपासून. म्हणून वरील सात ग्रह त्यादिवशी स्वातीत किंवा स्वातीच्या निकट नव्हते हे पाहू. महाभारतकारांच्या ज्योतिषविषयक वचनांची सूक्ष्मता अशी की, याच सात महाग्रहांना पुढे कर्णवधाच्या दिवशी त्यांनी सूर्याच्या निकट दाखविले आहे, आणि ते पूर्ण सुसंगतपणे (प्रकरण १४).

**(१) चन्द्र** - या दिवशी चंद्र स्वातीस्थित सूर्यापासून बराच दूर मघेत होता, आणि मध्यरात्रीनंतर तो आकाशात स्पष्ट उगवला. **(२) मंगळ** - दोन दिवसांपूर्वी (प्रकरण ११) हा अनुराधेजवळ होता. तो अंदाजे वीस दिवसांत नक्षत्र बदलतो; व या दिवशी तो तेथेच जवळपास किंवा प्रत्यक्ष अनुराधेत असावा. अशा प्रकारे स्वातीपासून पूर्व दिशेकडे थोड्या अंतरावर असल्याने, सूर्यास्तानंतर तो प्रश्चिम आकाशात काही वेळ स्पष्ट दिसू शकत होता. **(३) बुध-** चार दिवसानंतर याचे स्थान चित्रेत निश्चित केले आहे (प्रकरण १३). हा सुमारे आठ दिवसांनी नक्षत्र ओलांडतो. म्हणून या दिवशी हा चित्रेच्या आरंभाजवळ असावा आणि सूर्योदयापूर्वी पूर्वेस दिसला असेल. **(४) गुरु-** चार दिवसानंतर याचे स्थान विशाखेजवळ अनुराधेत ठरविले आहे (प्रकरण १३). हा अंदाजे १६० दिवसात नक्षत्र बदलतो. म्हणून या दिवशी तो तेथेच असून, सूर्यास्तानंतर पश्चिमेकडे दृश्यमान होऊ शकत होता. **(५) शुक्र-** चार दिवसानंतर याला मूळ नक्षत्रात मानले आहे. शुक्र अंदाजे अकरा दिवसात नक्षत्र बदलतो. म्हणून या दिवशी याला मूळ नक्षत्रात किंवा त्याच्या जवळ मानणे उचित असून रात्रीच्या पूर्व- प्रहरी तो पश्चिमेकडे दिसू शकत होता. **(६) शनि-** चार दिवसानंतर हा अनुराधेत मानला आहे. शनि सुमारे चारशे दिवसात नक्षत्र

बदलतो. म्हणून या दिवशीही याला तेथेच मानून तो सूर्यास्तानंतर पश्चिमेकडे दिसू शकत होता. **(७) धूमकेतु** - चार दिवस पश्चात हा पुष्यात होता. याही दिवशी हा तेथे किंवा त्याच्या आसपास मानून सूर्योदयापूर्वी पूर्व दिशेस दृश्यमान मानला जाऊ शकत होता. ▢



प्रकरण १३

# युद्धारंभीची ग्रहस्थिती

### युद्धारंभीच्या अमावास्येला चन्द्राचे स्थान

महाभारतकारांनी युद्धारंभदिवसाच्या चन्द्राच्या नक्षत्राचा विशेष संकेत दिला असून, ते युद्धकालीन साऱ्या ज्योतिषविषयक विवेचनासाठी फार महत्त्वाचे आहे. श्रीकृष्णांनी कर्णाला युद्धारंभार्थ आगामी अमवास्या घोषित करताना (उद्योगपर्व १४२-१८, वर उद्धृत), या अमावास्येला अनुलक्षून 'शक्रदेवताम्' म्हटले. त्याचा आशय हा की, या अमावास्येला चंद्र अशा नक्षत्रात होता, ज्याचा स्वामी इन्द्र (शक्र) आहे. प्राचीन भारतीय ग्रंथांत नक्षत्रांच्या देवता दिल्या आहेत. त्यात ज्येष्ठेची देवता इंद्र दाखविली आहे, म्हणून (जे या अमावास्येला युद्धारंभ मानतात, व जे मानीत नाहीत असेही) अनेक लेखक या अमावास्येला चंद्र ज्येष्ठेत होता असे प्रतिपादन करतात. पण श्रीकृष्णांनी ती घोषणा केली त्या दिवसापासून हीं अमावास्या आठव्या दिवशी होती; आणि त्या घोषणेच्या दिवशी चंद्र पुष्य नक्षत्रात होता हे महाभारतात सांगितले आहे. (प्रकरण ५ पाहा). पुष्यापासून ज्येष्ठा दहा स्थाने पुढे आहे; आणि चंद्र दररोज सरासरी एक नक्षत्र जातो. हे पाहता तो त्या सात दिवसात (तीन नक्षत्रलोप करून) दहा नक्षत्रे ओलांडणे अशक्य आहे. म्हणून चन्द्र या अमावास्येला ज्येष्ठेत पोचणे संभव नव्हते.

मग या अमावास्येला चंद्राचे नक्षत्र कोणते होते? - तें **चित्रा** होतें! चित्रेचीही देवता इंद्र सांगितली आहे. (पहा तैत्तिरीय संहिता, ४-४-१० व तैत्तिरीय ब्राह्मण १-५-१). पुष्यापासून चित्रा सहा स्थाने पुढे आहे. त्या सात दिवसात चंद्राची एक नक्षत्रवृद्धी मानून अमावास्येला चित्रा नक्षत्र येते; आणि या अमावास्येला (सूर्योदयी) चंद्र चित्रेत मानून अन्य सर्व ग्रहांची स्थितीही सुसंगत जमते हें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

या आधारे भीमदुर्योधनाच्या अंतिम गदायुद्धसमयी, शल्यपर्व ३४-६ (वर उद्धृत) मध्ये बलरामाने म्हटल्याप्रमाणे चंद्र बरोबर श्रवणात येतो (पुढे दिलेली

तिथी तालिका पहा). उलट या अमावास्येला चंद्र ज्येष्ठेत मानला तर तो त्या गदायुद्धाचेवेळी श्रवणात असणार नाही. ज्येष्ठेपासून श्रवण (मध्यंतरी एक पूर्ण नक्षत्रचक्र मोजून) बत्तीसाव्या स्थानावर आहे, आणि विश्रामदिवस समाविष्ट करून गदायुद्धाचा दिवस युद्धारंभापासून पस्तीसावा येतो. म्हणून या अमावास्येला चंद्र ज्येष्ठेत मानला तर गदायुद्धाचे दिवशी तो श्रवणात येण्यासाठी, मध्यंतरी लागोपाठ तीन नक्षत्रवृद्ध्या मानाव्या लागतील. या गणनेने या अमावास्येच्या पूर्वी सात दिवसात (या अमावास्येला चंद्र ज्येष्ठेत येण्यासाठी) तीन नक्षत्रलोप, आणि नंतर लागोपाठ तीन नक्षत्रवृद्ध्या, अशी चंद्राची गति मानावी लागेल; व हे संभव नाही.

बरे, या अमावास्येला युद्धारंभ, आणि लढाई दररोज, असे मानले तर अमावास्येपासून गदायुद्धदिवस अठरावा (वस्तुतः प्रकरण ७ मध्ये दाखविल्याप्रमाणे एकोणिसावा) येईल. यातही (अमावास्येला चंद्र ज्येष्ठेत दर्शविला तर) गदायुद्ध दिवशी चन्द्र श्रवणापासून फार दूर राहील. शेवटी युद्धारंभ मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला मानून लढाई दररोज मानली, तरी गदायुद्धाचा दिवस या अमावास्येपासून एकोणतिसावा (वस्तुतः तिसावा) येईल. आणि या अमावास्येला चंद्र ज्येष्ठेत मानून गदायुद्धाचे दिवशी तो श्रवणात पोचण्यासाठी मध्यंतरी लागोपाठ तीन (अथवा दोन) नक्षत्रलोप गृहीत धरावे लागतील. म्हणजे याप्रमाणेही या अमावास्येच्या पूर्वीच्या सात दिवसात तीन नक्षत्र लोप आणि अमावास्येनंतर पुनः तीन (किंवा दोन) नक्षत्रलोप असा प्रकार होईल, जे शक्य नाही, सारांश, गदायुद्धाचे दिवशी चंद्राचे स्थान महाभारतात स्पष्ट म्हटल्याप्रमाणे श्रवणात ठेवल्यास, कोणत्याही प्रकारे या अमावास्येला चंद्राचे नक्षत्र ज्येष्ठा असू शकत नाही. परंतु मग ज्येष्ठेविषयी आपला चुकीचा आग्रह सोडण्याऐवजी काणे यांच्यासारखे काही लेखक महाभारतातील ज्योतिषविषयक वचनांनाच अत्यंत विसंगत म्हणू लागतात; तर दप्तरी व अन्य काही शल्यपर्वातील त्या श्लोकांत हस्तक्षेप करून गदायुद्धदिवशी चन्द्राचें श्रवण नक्षत्र होते हा उल्लेखच हटवू चाहतात.

जे या अमावास्येला चंद्र ज्येष्ठेंत मानतात त्यापैकी काहींचा असा उद्देश असतो की, त्या आधारे सूर्यही त्या दिवशी तेथेच मानून पुढें भीष्मनिधनसमयी उत्तरायणप्रारंभी सूर्य धनिष्ठारंभी असू शकेल; आणि त्याने महाभारत युद्धाचे वर्ष इ. स. पूर्व पंधरावे शतक सिद्ध होऊ शकेल (प्रकरण १६ पाहा). पण हे लेखक भीष्मनिधनतिथी माघ शुक्ल अष्टमी मानतात, आणि आता ती माघ पौर्णिमा सिद्ध होत असल्याने इ. स. पूर्व पंधरावे शतकाच्या अनुमानास तो



आधार राहणार नाही. आणि जर माघ पौर्णिमेस सूर्य धनिष्ठारंभी मानला तर युद्धारंभीच्या अमावास्येस तो ज्येष्ठेंत न असता अनुराधेत असेल; आणि यामुळे अमावास्येस चन्द्र ज्येष्ठेत पण सूर्य मागे अनुराधेत असा असंभव प्रकार होईल. खरे म्हणजे पुढे प्रकरण १६ मध्यें दाखविल्याप्रमाणे महाभारत युद्धाचा काल इ. स. पूर्व पंधरावे शतक सिद्ध करण्यासाठी या अमावास्येस चंद्र ज्येष्ठेत मानणे आवश्यक नाही.

या अमावास्येला चंद्र ज्येष्ठेत होता या धारणेचे आणखीही एक खंडन पाहा. त्या अमावास्येला चंद्र ज्येष्ठेत व म्हणून सूर्यही तेथे मानला, तर (त्याच्या सात दिवस पूर्वी) श्रीकृष्णांच्या हस्तिनापुरला शांतिवार्तेच्या दिवशी सूर्य ज्येष्ठेत किंवा अनुराधेत असेल, पण त्या स्थितीत त्या दिवशी अनुराधेजवळ दाखविलेला मंगळ (प्रकरण १३ पाहा) सूर्यसान्निध्यामुळे दृश्यमान झाला नसता, आणि मंगळ ज्येष्ठेकडे पाठ फिरवून जणू अनुराधेशी मीलनार्थ विनवणी करीत आहे हे महाकवीचे मार्मिक वचन निरर्थक होईल. पण पुढे दाखविल्याप्रमाणे, सूर्य त्यावेळी मंगळापासून अंतरावर असल्याने मंगळ स्पष्ट दृश्यमान होता. तसेच वरील स्थितीत दोन दिवसांनंतर मघानक्षत्रदिवशी सूर्याला त्याच स्थानी (ज्येष्ठेत अगर अनुराधेत) मानाने लागेल, पण मागील प्रकरणात पाहिल्याप्रमाणे मंगळासह गुरु व शनि त्या दिवशी अनुराधेत होते म्हणून त्या दिवशी ते सूर्याच्या निकट असल्याने दृश्यमान नसते, आणि 'तेजस्वी' तर मुळीच दिसले नसते. पण महाभारतानुसार ते तसे दिसत होते. शेवटी या विवेचनात पुढे दाखविल्याप्रमाणे त्या अमावास्येला सूर्य ज्येष्ठेत मानणे या कालावधीतील काही अन्य ग्रहांच्या स्थितीशींही विसंगत ठरते.

**वद्य चतुर्दशीची ग्रहस्थिती**

आता आपण महाकवीने युद्धारंभाच्या आदल्या दिवशीच्या दिलेल्या विस्तृत वर्णनावर विचारू करू. व्यास धृतराष्ट्रास सांगतात -

**रोहिणीं पीडयन्नेष स्थितो राजन् शनैश्चरः**
**व्यावृत्तं लक्ष्म सोमस्य भविष्यति महद्भयम्।। भीष्मपर्व २-३२**
**विष्वग्वाताश्च वान्त्युग्रा रजो नाप्युपशाम्यति**
**अभीक्ष्णं कम्पते भूमिरर्कं राहुरुपैति च।।३-११**
**श्वेतो ग्रहस्तथा चित्रां समतिक्रम्य तिष्ठति**
**अभावं हि विशेषेण कुरूणां तत्र पश्यति।।१२**
**धूमकेतुर्महाघोरः पुष्यं चाक्रम्य तिष्ठति**
**सेनयोरशिवं घोरं करिष्यति महाग्रहः।।१३**

मधास्वङ्गारको वक्रः श्रवणे च बृहस्पतिः
भगं नक्षत्रमाक्रम्य सूर्यपुत्रेण पीड्यते।।१४
शुक्रः प्रोष्ठपदे पूर्वे समारुह्य विरोचते
उत्तरे तु परिक्रम्य सहितः समुदीक्षते।।१५
श्वेतो ग्रहः प्रज्वलितः सधूम इव पावकः
ऐन्द्रं तेजस्वि नक्षत्रं ज्येष्ठामाक्रम्य तिष्ठति।।१६
ध्रुवं प्रज्वलितो घोरमपसव्यं प्रवर्तते
रोहिणीं पीडयत्येवमुभौ च शशिभास्करौ
चित्रास्वात्यन्तरे चैव विष्ठितः परुषग्रहः।।१७
वक्रानुवक्रं कृत्वा च श्रवणं पावकप्रभः
ब्रह्मराशिं समावृत्य लोहिताङ्गो व्यवस्थितः।।१८
संवत्सरस्थायिनौ च ग्रहौ प्रज्वलितावुभौ
विशाखायाः समीपस्थौ बृहस्पतिशनैश्चरौ।।२७
चन्द्रादित्यावुभौ ग्रस्तावेकान्हाहि त्रयोदशीम्
अपर्वणि ग्रहं यातौ प्रजासंक्षयमिच्छतः।।२८
कृत्तिकां पीडयंस्तीक्ष्णैर्नक्षत्रं पृथिवीपते
अभीक्ष्णवाता वायन्ते धूमकेतुमवस्थिताः।।३०
चतुर्दशीं पंचदशीं भूतपूर्वां च षोडशीम्
इमां तु नाभिजानेऽहममावास्यां त्रयोदशीम्
चन्द्रसूर्यावुभौ ग्रस्तावेकमासीं त्रयोदशीम् ।।३२
अपर्वणि ग्रहणेतौ प्रजाः संक्षपयिष्यतः
मांसवर्षं पुनस्तीव्रमासीत् कृष्णचतुर्दशीम्।।३३
पन्तन्त्युल्का सनिर्घाता शक्राशनिसमप्रभाः
अद्य चैव निशां व्युष्टामनयं समवाप्स्यथ।। ३५

आपण यात दिग्दर्शित विभिन्न ग्रहांची स्थाने निश्चित करू; आणि मग या श्लोकांचा सुसंगत अर्थ करू.

सूर्य- याचें स्थान प्रत्यक्ष सांगितलेले नाही; पण लोक ११, १७,२८,३२ व ३३ मध्ये सूचित केले आहे. आपण प्रथम चन्द्राच्या आधारे सूर्याचें स्थान निश्चित करू. याच्या दुसऱ्या दिवशी अमावास्येला (सूर्योदयसमयी) चंद्र (वर दाखविल्याप्रमाणे) चित्रेत होता. अमावास्येला सकाळी सूर्य चन्द्राच्याच नक्षत्रात किंवा एक नक्षत्र पुढे असतो. तो तसा पुढे असेल तर अमावास्या संपण्यापूर्वी चन्द्र (आपल्या जलद गतीने) सूर्याच्या नक्षत्रांत जाऊन पोचतो. म्हणून या



अमावास्येला सूर्य चित्रेत अगर स्वातीत असला पाहिजे. परंतु या दिवसातील अन्य ग्रहांची स्थिती सूर्य या अमावास्येला स्वातीत मानल्याने सुसंगत लागते. हे हस्तिनापुरच्या शांतिवार्तेपासून सूर्यचन्द्राच्या दैनंदिन गतीचे कोष्टक पुढे दिले आहे त्यावरून स्पष्ट होईल.

या अमावास्येला सूर्यग्रहण होते काय? अनेकांना तसे वाटते. पण महाभारतात या युद्धरंभदिवसाचा विस्तृत वृत्तांत दिला असून त्यात कोठेही ग्रहणाचा उल्लेख वा संकेत नाही. या दिवशी प्रभातकाळ 'विमल' होता, (उद्योगपर्व १९५-१). याशिवाय, या दिवसाच्या 'पूर्वान्हाचा' (भीष्मपर्व ४५-१), 'गतपूर्वाण्हभूयिष्ठ' म्हणजे सकाळच्या उत्तरार्धसमयाचा (भीष्मपर्व ४७-१, ४९-२४) व शेवटी सूर्यास्तसमयाचाही उल्लेख आहे. या दरम्यान केव्हाही सूर्यग्रहण असते तर महाकवीने तसा उल्लेख केला असता. इतकेच नव्हे, तर ग्रहण काळात उभय पक्षांनी लढणे थांबवून धार्मिक स्तवनादि केल्याचेही म्हटले असते. नंतर एक प्रसंगी लढणे थांबवून उभय सैन्यांनी उदीयमान सूर्याची आराधना केल्याचा उल्लेख आहे (प्रकरण ७ पहा).

राहु आणि केतु हे काल्पनिक ग्रह असून, वस्तुतः ते चंद्राच्या कक्षेला जेथे क्रांतिवृत्ताची पातळी (plane of the ecliptic) तिरपी छेदते असे दोन बिंदू (Nodes of the moon's orbit) आहेत. अमावास्येला जर राहु (अथवा केतू) सूर्यापासून सुमारे दहा अंशात असेल तर सूर्यग्रहण अवश्य होईल; ते अंतर दहा ते बारा अंश असेल तर सूर्यग्रहण होऊ शकते; आणि न देखील होऊ शकते; आणि अंतर त्याहून अधिक असेल तर सूर्यग्रहण होणार नाही. राहु नक्षत्र मंडळात सदैव उलटा फिरतो. या सुमारास राहु सुर्याच्या समीप येत होता, 'अर्कं राहूरुपैति', ३-११ (पुढे उद्धृत). महाकवीने हेच पूर्वीही सांगितले आहे (प्रकरण ११ पाहा). असे दिसते की या अमावास्येला राहु स्वातीत असलेल्या सूर्यापासून दहा बारा अंशावर होता; तो विशाखेत असून उलटा मागे सूर्याकडे सरकत होता. अशा प्रकारे राहु सूर्यापासून इतक्या अंतरावर होता की, तेथे काही परिस्थितीत सूर्यग्रहण होऊ शकते. पण अमावास्येला प्रत्यक्ष ग्रहण झाले नाही. आणि ग्रहण नसताही (अपर्वणि) सूर्याशी ( व चन्द्राशीही) राहुची इतकी समीपता फार अशुभ मानली गेली.

श्लोक ३-१७ मध्ये म्हटले आहे, राहु 'चित्रास्वात्यन्तरे' म्हणजे चित्रा व स्वातीपासून थोड्याच अंतरावर असून, चित्रास्थित चन्द्र व स्वातीस्थित सूर्य या दोघांना पीडा देत आहे. येथे 'ग्रह'चा अर्थ ग्रहण करणे आवश्यक नाही. त्याचा अर्थ (राहु नामक) ग्रह असाही होऊ शकतो (पहा आदिपर्व २४-७).

**चन्द्र** - अमावास्येला (सूर्योदयी) चन्द्र चित्रेत होता,तरी तेथे चित्रेची 'वृद्धि' असल्याने वद्य चतुर्दशीलाही तो चित्रेत होता. (पुढे दिलेली तिथीतालिका पाहा). या अनुसार चन्द्र वद्य त्रयोदशीला हस्त नक्षत्रात होता. या संदर्भात एक स्पष्टीकरण आवश्यक आहे. युद्धप्रारंभ होण्यापूर्वी बलराम तीर्थयात्रा करण्यास निघून गेले असे सांगून, शल्यपर्वात पुढे म्हटले आहे-

**मैत्रनक्षत्रयोगे स्म सहितः सर्वयादवैः**
**आश्रयामास भोजस्तु दुर्योधनमरिंदमः ।। शल्यपर्व ३५-१४**

"शत्रूंचे दमन करणारा भोज (कृतवर्मा) सर्व यादव सैन्यासह मैत्रनक्षत्रयोगावर (चंद्र मैत्र नक्षत्री असता) दुर्योधनास येऊन मिळाला." स्वतः श्रीकृष्ण पांडवांकडे राहून केवळ अर्जुनाचे सारथ्य करतील, व सर्व यादव सैन्य दुर्योधनाकडून लढेल असें ठरले होते. हा श्लोक त्याला अनुसरून आहे. पण या श्लोकात एक श्लेषात्मक कूट आहे. अनुराधेची देवता 'मित्र' असून 'मैत्र' नक्षत्राचा अर्थ साधारणतः अनुराधा केला जातो. महाभारतात उद्योगपर्व १४३-९ मध्ये तसा अर्थ आला आहे (प्रकरण ११). पण अनुराधा चित्रेनंतर तीन स्थाने आहे; आणि वर दाखविल्याप्रमाणे चंद्र चित्रेंत असताना युद्धारंभ झाला, तर त्यानंतर काही दिवसांनी चंद्र अनुराधेत पोचला असता यादव सैन्यासह कृतवर्मा दुर्योधनाकडे आला असे कसे म्हणता येईल? वस्तुतः कृतवर्मा युद्धारंभाच्या दिवसापासूनच लढाईत होता (भीष्मपर्व ४८-४६).

मौज अशी की, 'मैत्र' शब्द 'मित्र' पासून झाला असून, 'मित्र' हे सूर्याचे एक नाव आहे. हस्त नक्षत्राची देवता 'सविता' आहे, आणि सविता म्हणजेही सूर्य. सारांश, येथे 'मैत्र' नक्षत्र शब्दाचा प्रयोग हस्त नक्षत्रासाठी केला असून, तें नक्षत्र चित्रेच्या एक स्थान पूर्वी आहे. या प्रमाणे चंद्र वद्य त्रयोदशीला हस्त नक्षत्रात असता कृतवर्मा आपला मैत्रीचा हात पुढे करून सर्व यादव सैन्यासह दुर्योधनाकडे आला.❋ व म्हणून त्यानंतर वद्य चतुर्दशीला दुर्योधनाशी बोलताना भीष्मांनी कौरव पक्षाकडील एक प्रमुख योद्धा म्हणून कृतवर्माचा उल्लेखही केला. (उद्योगपर्व १६५-२४,२५.२६)

**मंगळ** - याचा उल्लेख श्लोक ३-१८ मध्ये असून तोही कूट होऊन

❋ या श्लोकाच्या प्रथम ओळीचा (व म्हणून त्यात उल्लेखित मैत्र नक्षत्राचा) संबंध काही जण (उदाहरणार्थ दप्तरी पू.उ. व पृ.११८) यापूर्वीच्या (३५-१३) बलरामयात्राविषयक श्लोकाशी लावतात. पण बलराम 'सर्व' यादवांसह तीर्थयात्रेस गेले नव्हते; उलट कृतवर्मा (आधीच ठरल्याप्रमाणे) सर्व यादवसैन्यासह दुर्योधनास येऊन मिळाला. बलरामांची यात्रा यापूर्वी पुष्य नक्षत्रावर सुरू झाली होती. (प्रकरण ५ पाहा).



बसला आहे. येथे 'ब्रह्मराशी' चा संबंध श्रवणाशी लावून मंगळ यावेळी श्रवणात होता असा अर्थ बहुधा केला जातो. पण सहा दिवसांपूर्वीच त्याला वक्रगतीत अनुराधेजवळ दाखविले आहे (प्रकरण ११); म्हणून मध्यंतरी तो सरळ गतीत आला असला, तरी सहा दिवसात चार नक्षत्रे ओलांडून श्रवणात पोचणे असंभव होते. यासाठी वरील श्लोकाचा पुढील आशय उचित होईल. ब्रह्मा म्हणजे प्रजापति. महाभारतात मेषवृषभादि राशी नसल्या, तरी समीपवर्ती नक्षत्रांचा एक (विशिष्ट आकृतिदर्शक) समूह या अर्थाने 'राशी' शब्द वापरलेला दिसतो. यथे 'ब्रह्मराशी' चा अर्थ 'नक्षत्रीय प्रजापति' असा असावा. तैत्तिरीय उपनिषदात (१-५-२-२) म्हटल्याप्रमाणे हस्त, चित्रा, स्वाति, विशाखा व अनुराधा ही नक्षत्रे मिळून नक्षत्रीय प्रजापतीची आकृति होते. ' यौ वै नक्षत्रियं प्रजापतिं वेद। उभयोरेनं लोकयोर्विदुः। हस्त एवास्य हस्तः । चित्रा शिरः। निष्ठया हृदयम्। ऊरू विशाखे। प्रतिष्ठानुराधा। एष वै नक्षत्रियः प्रजापतिः।।' मंगळ या 'ब्रह्मराशीच्या' टोकाशी अर्थात अनुराधेत होता. सहा दिवसांपूर्वीही तो तेथेच होता.

या श्लोकात वक्रानुवक्रं चा आशय असा दिसतो की, सहा दिवसांपूर्वी मंगळ 'वक्र' गतीत ज्येष्ठेपासून उलटा अनुराधेकडे जात होता, पण लवकरच त्याने पुनः आपली सरळ ('अनुवक्र') गति प्राप्त केली; आणि आता तो ज्येष्ठेकडे सरकत होता. वराहमिहिरांच्या बृहत्संहितेवरील (१-१०) उत्पल भाष्यात म्हटले आहे, 'अनुवक्रं स्पष्टगतित्वम्। वक्रां गतिं त्यक्त्वा पुनः स्पष्टाम् गतिमाश्रितो अनुवक्रित इत्युच्यते।'

पण तरीही वरील श्लोकाच्या प्रथम पंक्तीत श्रवणाचा उल्लेख काय म्हणून? जरी नक्षत्रांच्या यादीत अनुराधेनंतर ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा व उत्तराषाढा असून नंतर श्रवण येते, तरी प्रत्यक्ष आकाशात पाहिले असता सर्व नक्षत्रे एका सरळ रेषेत नसून, ज्येष्ठा ते उत्तराषाढा ही नक्षत्रे दक्षिणेकडे काहीशी आत गेलेली दिसतील, आणि अनुराधेपासून श्रवण ठळकपणे समोर दिसेल. जेव्हा नक्षत्रे एका सरळ रेषेत नसतात तेव्हा ग्रह त्यातील प्रत्येकातून प्रत्यक्ष न जाता त्यांच्या जवळून पण आपल्या रेषेने जातात. म्हणून मंगळ अनुराधेत पुनः 'अनुवक्र' (सरळ) झाला तेव्हा तो पंचांगात ज्येष्ठेकडे जाताना म्हटला, तरी प्रत्यक्षात त्याची दिशा श्रवणाकडे दिसणे साहजिक आहे. प्रस्तुत श्लोकात 'श्रवणं अनुवक्रं कृत्वा' याचा आशय मंगळ श्रवणात पोचला असा नसून, तो वक्र दिशा त्यागून श्रवणाकडे वळलेला दिसला असा आहे.

मंगळाचा आणखीही एक उल्लेख श्लोक ३-१४ मध्ये असून त्याची

चर्चा पुढे वेगळी केली आहे.

**बुध**- श्लोक ३-१२ मध्ये उल्लेखित 'श्वेतग्रह' बुध असावा. तो चित्रेवर आक्रमण करीत आहे असे म्हटले आहे. तो चित्रेच्या टोकावर स्वातीच्या दिशेने असावा. (श्लोक ३- १६ मध्येही श्वेतग्रहाचा उल्लेख आहे; पण पुढे दाखविल्याप्रमाणे त्याचा संबंध शुक्राशी चांगला जुळतो). ग्रहस्थितीच्या इतक्या तपशीलवार वर्णनात महाकवीने बुधाला वगळले नसते; आणि तेथे अन्य कोणत्याही श्लोकाचा बुधाशी नीट संबंध लागत नाही, हे पाहता श्लोक १२ मध्ये बुधाचा उल्लेख पाहणे उचित दिसते. याने अन्य दिवसांच्या बुधाच्या स्थितीशीही संगती जुळते; अशा दोन स्थळी (प्रकरण १४) बुधाचा स्पष्ट उल्लेखच आहे.

**गुरु**- श्लोक २७ मध्ये म्हटले आहे. 'गुरु व शनि हे दोन तेजस्वी ग्रह एक वर्षापासून विशाखेच्या आसपास आहेत.' येथे 'विशाखायाः समीपस्थौ' याचा अर्थ अनुराधेत असा होऊ शकतो. जर ते ग्रह विशाखेतच किंवा (विशाखेच्या मागे) स्वातीत असते, तर यावेळी सूर्य स्वातीत असल्याने ते दृश्यमान नसते. गुरु एका नक्षत्रात पाच महिने दहा दिवस असतो. आणि तो यापूर्वीच्या बारा महिन्यात प्रथम स्वातीच्या उत्तरार्धात. नंतर विशाखेत, व शेवटी (यावेळी) अनुराधेच्या शेवटच्या चरणात असावा; अशा प्रकारे तो वर्षभर 'विशाखायाः समीपस्थः' होता. या गणनेने गुरु पाच दिवस पूर्वी सूर्यास्तानंतर दृश्यमान होऊ शकत होता (प्रकरण १२), व कर्णवधाच्या दिवसापावेतो ज्येष्ठेत पोचू शकत होता (प्रकरण १४). गुरुचा आणखी उल्लेख श्लोक १४ मध्येही असून त्याची वेगळी चर्चा पुढे केली आहे.

**शुक्र** - श्लोक १५ मध्ये म्हटले आहे की, शुक्र त्यावेळी पूर्वा प्रोष्ठपदा व उत्तरा (प्रोष्ठपदा) या दोघांना आपल्या तेजाने व्याप्त करीत होता. प्रोष्ठपदा म्हणजे भाद्रपदा. या श्लोकाचे स्पष्टीकरण करताना पुढील तथ्ये ध्यानात घेणे आवश्यक आहे.

शुक्र सुमारे अकरा दिवसात एक नक्षत्र पार करतो, तर सूर्य सुमारे साडे तेरा दिवसात. अशा प्रकारे शुक्र सूर्यापेक्षा थोडा शीघ्र जातो. पण तो सूर्यापासून ४७ अंश (सुमारे साडेतीन- चार नक्षत्रे) यापेक्षा अधिक दूर कधी जात नाही. ती सीमा प्राप्त झाली की तो उलट 'वक्र' गतीने सूर्याकडे मागे येऊ लागतो. या वक्र गतीतही (मध्यंतरी सूर्याला ओलांडून) तो पुनः सूर्याहून वरील सीमेइतका दूर (मागे) गेला की, वक्र गति सोडून परत सरळ गतीने येतो. शुक्राची वक्र गति त्याच्या सरळ गतीपेक्षा मंद असते.

शुक्र फार तेजस्वी ग्रह असून कधीकधी सूर्याच्या उपस्थितीतही दृश्यमान



असतो. तो सूर्यापासून आपल्या अधिकतम अंतरावर गेला म्हणजे त्याचा प्रकाश रात्री अधिकच तेजस्वी दिसतो. शुक्र आकाशाच्या मध्यभागी कधीही दृश्यमान नसतो. तो सूर्यास्तानंतर पश्चिमेस, किंवा सूर्योदयाच्या आसपास पूर्वेस दिसू शकतो. मात्र सूर्यापासून आठ अंशाच्या सीमेत तो अदृश्य होतो, अर्थात त्याचा 'अस्त' होतो.

हे सारे ध्यानात घेऊन श्लोक ३-१५ व १६ वर विचार करू. श्लोक १५ मध्ये शुक्राचा स्पष्ट नामोल्लेख असून श्लोक १६ मध्ये म्हटले आहे की, 'प्रज्वलित श्वेतग्रह' तेजस्वी ज्येष्ठा नक्षत्रावर आक्रमण करीत आहे. श्लोक १५ च्या संदर्भात हा श्वेतग्रह शुक्र असावा. महाभारतकारांनी भीष्मपर्व ८२-१२ मध्येही 'श्वेतग्रह' शब्द वापरला असून, तेथे त्याचा अर्थ शुक्र करण्यात आला आहे (पाहा ज. वि. ओक कृत 'गीर्वाणलघुकोश'). आता, यावेळी शुक्राने ज्येष्ठेवर आक्रमण केले होते म्हणजे तो ज्येष्ठेच्या टोकावर किंवा लगतच्या 'मूळ' नक्षत्रात असावा. सूर्य स्वातीत असून तेथून शुक्राचे ते स्थान सुमारे चार नक्षत्रे दूर होते. म्हणून तो यावेळी सूर्यापासून इतक्या अंतरावर असल्याने विशेष तेजस्वी (प्रज्वलित) दिसत होता. आणि त्याचा वृद्धिंगत प्रकाश लांबच्या पूर्वा प्रोष्ठप्रदेला, व उत्तरा प्रोष्ठपदेलाही आलोकित करीत होता; तो जणू उभय प्रोष्ठपदांवर (भाद्रपदांवर) गंभीर दृष्टिक्षेप टाकत होता ('समुदीक्षते'). शुक्र प्रत्यक्ष तेथे पोचला होता असे नाही.

जे यावेळी सूर्याला ज्येष्ठेत मानू चाहतात ते श्लोक १६ चा नीट अर्थ लावू शकणार नाही. कारण त्यातील 'श्वेतग्रह' कोणताही मानला तरी तो सूर्याच्या इतक्या निकट दृश्यमान असणार नाही. निदान 'प्रज्वलित' तर भासणारच नाही. खरे म्हणजे सूर्य ज्येष्ठेत असताना, ते नक्षत्र दृश्यमानही असणार नाही; श्लोकात म्हटल्याप्रमाणे 'तेजस्वी' दिसण्याची तर गोष्टच सोडा.

सूर्यापासून आपल्या अधिकतम अंतरावर पोचल्यावर शुक्राने वक्र गती घेतली, व मागे परत येऊन तो कर्णवधाचे दिवशी सूर्याच्या निकट सान्निध्यात अदृश्य झाला (प्रकरण १४).

**शनि** - याचा स्पष्ट उल्लेख २- ३२- व ३- २७ मध्ये आहे. यातील ३-२७ ची चर्चा गुरुच्या संबंधांत वर केली आहे; त्यात शनि गुरूसह एकवर्षापासून विशाखेच्या आसपास दाखविला आहे. शनि एक वर्षापासून मंद मंद सरकत यावेळी अनुराधेत असावा, तेथून तो श्लोक २-३२ मध्ये म्हटल्याप्रमाणे रोहिणीला पीडा देत होता. यापूर्वीही शनीद्वारा रोहिणीला पीडेचा (प्रकरण ११), व पूर्व

पौर्णिमेस चन्द्र फिकट दिसण्याचा (भीष्मपर्व २-२३), उल्लेख आला आहे.

याशिवाय श्लोक ३-१७ च्या प्रथम दोन पंक्तीतही 'प्रज्वलित' शब्द शनीसाठी असावा; कारण तिथेही रोहिणीला होणाऱ्या पीडेचा उल्लेख आहे ('प्रज्वलित' शब्द ३-२७ मध्ये स्पष्टपणे शनीसाठी आला आहे). श्लोक १७ ची तिसरी ओळ राहूविषयी आहे; पण तो एक काल्पनिक ग्रह असून त्याला 'प्रज्वलित' म्हणता येणार नाही. आता, प्रथम ओळीतील 'ध्रुवम्' म्हणजे ध्रुवतारा नसून, त्या शब्दाने रोहिणी व तीन उत्तरा नक्षत्रे यांचा बोध होतो. प्रज्वलित शनि यावेळी त्यातील एकाच्या डावीकडे होता असे दिसते. तें नक्षत्र उत्तरा फाल्गुनी किंवा उत्तराषाढा असेल; कारण उत्तराभाद्रपदा फार दूर होती व रोहिणीला शनि पीडा देत होता असा वेगळा उल्लेख आहे. याशिवाय शनीचा उल्लेख ३-१४ मधेही आहे; तेथे म्हटल्याप्रमाणे शनि (सूर्यपुत्र) यावेळी 'भग' (पूर्वा फाल्गुनी) नक्षत्राला पीडा देत होता.

**राहू** - श्लोक ११ मधे म्हटले आहे, 'राहू सूर्याच्या जवळ येत आहे.' श्लोक २८ मधे म्हटले आहे,'चन्द्र व सूर्य दोघे राहूकडून ग्रस्त आहेत, प्रत्यक्ष ग्रहण नसतांही त्यांचे राहूच्या निकट असणें त्यांची लोकक्षयसूचक प्रवृत्ती प्रदर्शित करीत आहे.' या श्लोकाचा बराच भाग श्लोक ३२ मधे व ३३ च्या प्रथम ओळीत पुनः आला आहे. या सर्वांचे स्पष्टीकरण वर सूर्यासंबंधी चर्चेत केले आहे.

**केतु** - श्लोक ३० चा संबंध केतूशी असू शकतो; त्याच्या प्रथम पंक्तीत कोणी दुष्ट (ग्रह) आपल्या कठोर दृष्टिपातांनी कृत्तिकेला पीडा देत आहे असे म्हटले आहे. राहु व केतु भारतीय परंपरेनुसार अति दुष्ट ग्रह मानले आहेत. ते नेहमी उलटे फिरत असून परस्परापासून निश्चित अंतरावर राहतात; ते अठरा वर्षात नक्षत्रमंडळाचा पूर्ण चक्कर करतात. यावेळी आपण राहु विशाखेत मानला आहे; म्हणून केतू (सुमारे अर्धनक्षत्रमंडळ अंतरावर) कृत्तिकेत किंवा तिच्या जवळपास असून तिला पीडा देत असावा.

**धूमकेतु** - हा पुष्यात होता. श्लोक १३ म्हटल्याप्रमाणे 'भयानक धूमकेतु पुष्यावर आक्रमण करून आहे. हा महाग्रह उभय सैन्यांची घोर क्षती करील.' श्लोक ३० च्या द्वितीय पंक्तीतही म्हटले आहे, 'धूमकेतूकडून येणारी घोर आंधी चालू आहे.' (यापूर्वीही धूमकेतूच्या उल्लेखाबद्दल प्रकरण १२ पाहा.)

शेवटी श्लोक ३-१४ वर विचार करू. याच्या पहिल्या ओळीचा कित्येक असा अर्थ करतात की मंगळ (अंगारक) वक्र गतीने मघा नक्षत्रात आहे; आणि गुरु श्रवणात आहे. पण त्यांची यापूर्वीची स्थाने पाहता हे संभव नव्हते. येथे



'वक्र' चा आशय 'वक्रगति' असा नसून, कांही जणांनी म्हटल्याप्रमाणे,* 'वक्रदृष्टिपूर्ण', 'पीडादायक' असा आहे. यावेळी मंगळाची मघेवर व गुरूची श्रवणावर वक्रदृष्टि होती. या श्लोकाच्या दुसऱ्या ओळीत म्हटलेही आहे की, 'शनि (सूर्यपुत्र) पूर्वाफाल्गुनी (भग) नक्षत्रावर आक्रमण करून पीडा देत आहे.' ग्रहांच्या द्वारा पीडेचे असे उल्लेख तत्कालीन फलज्योतिषविषयक धारणांवर आधारित असले पाहिजेत.

आता हे सारे स्पष्टीकरण ध्यानांत घेऊन वर उद्धृत श्लोकांचा अर्थ करू.

"महाराज (धृतराष्ट्र), हा शनिग्रह (श्लोक ३-२७ अनुसार अनुराधेत असून) रोहिणीला पीडा देत आहे; आणि चन्द्राचे विशिष्ट (सौदर्य दर्शक) चिन्ह लुप्त झालें आहे; हे सर्व एक महासंकट होणार आहे असें सूचित करीत आहे- २-३२. सर्वत्र भयानक आंधी चालू आहे; आणि त्यामुळे उडणारी धूळ खाली बसत नाही; भूमी (जणू) वारंवार कंपित होत आहे; आणि राहू सूर्याच्या जवळ जात आहे- ३-११. (श्वेतग्रह) बुध चित्रावर आक्रमण करत स्वातीच्या दिशेत स्थित आहे, हें विशेषतः कुरुकुलाचा विनाश सूचित करीत आहे- १२. भयानक धूमकेतु पुष्य नक्षत्राला व्याप्त करत असून, हा महाग्रह उभय सैन्यांच्या घोर हानीचे कारण होईल- १३. मंगळ (श्लोक १८ अनुसार अनुराधेत असून) मघा नक्षत्रावर, आणि गुरु (श्लोक २७ अनुसार अनुराधेत असून) श्रवण नक्षत्रावर दुरूनच वक्र (पीडादायक) दृष्टि टाकत आहेत, सूर्यपुत्र शनि देखील (श्लोक २७ अनुसार अनुराधेत असून) भग म्हणजे पूर्वा फाल्गुनी नक्षत्रावर आक्रमण करून (आपल्या वक्र दृष्टीने) त्याला पीडा देत आहे- १४. शुक्र आपल्या प्रकाशाने पूर्वाभाद्रपदा नक्षत्राला आवृत्त करून, व उत्तराभाद्रपदेलाही आलोकित करून, दोघांवर दृष्टिक्षेप करीत आहे- १५. ज्वलंत अग्नीसमान दीप्यमान तो श्वेतग्रह (शुक्र) जिची देवता इन्द्र आहे त्या ज्येष्ठेवर आक्रमण करून तेथे स्थित आहे- १६. प्रज्वलित (तीव्र दीप्यमान) क्रूर ग्रह शनि (श्लोक २७ अनुसार अनुराधेत असून) उत्तराफाल्गुनीच्या डाव्या बाजूस आहे, याने एक घोर संकट सूचित होत आहे; तो रोहिणी नक्षत्राला पीडा देत आहे; आणि चित्रा व स्वातीच्या मधोमध स्थित क्रूर राहू ग्रह (चित्रास्थित) चन्द्राला व (स्वातीस्थित) सूर्याला पीडा पोचवत आहे- १७. अग्नीसमान देदीप्यमान (लोहितांग) मंगळ ग्रह वक्र गति त्यागून पुनः सरळ गतीत श्रवणाच्या दिशेने जात असून, या

* उदाहरणार्थ, चिं.वि. वैद्य, पू .उ. पृ. १२१-१२५

समयी 'नक्षत्रीय प्रजापति' च्या आखरी अंशात (अनुराधेत) स्थित आहे- १८. एक एक वर्ष विशाखेच्या आसपास राहून गुरु व शनि (अनुराधेत) प्रज्वलित दृश्यमान आहेत- २७. एकाच तेराव्या तिथीला (येणाऱ्या या अमावास्येला) चन्द्र व सूर्य दोघेही (विशेष निकट आलेल्या) राहूने ग्रस्त आहेत, आणि प्रत्यक्ष ग्रहण नसतांही ते राहूच्या इतक्या जवळ असणें त्यांची लोकविनाशकारी प्रवृत्ती दर्शवीत आहे- २८. महाराज (धृतराष्ट्र), केतू ग्रह आपल्या तीक्ष्ण पीडादायक स्पर्शांनी कृत्तिका नक्षत्राला तीव्र पीडा देत आहे; व धूमकेतु पासून निघणारी आंधी चालू आहे-३०. यापूर्वी (वद्य पक्षाच्या) चौदाव्या, पंधराव्या व (एक तिथीवृद्धी होऊन) सोळाव्या दिवशी आलेली अमावास्या मी पाहिली आहे; परंतु तेराव्या दिवशीं येणारी ही अमावास्या मी यापूर्वी कधी पाहिली नव्हती. एकाच महिन्यात तेराव्या तिथीला (स्वातीस्थित) सूर्यचन्द्र दोघे, प्रत्यक्ष ग्रहण नसतांही, (विशेष निकट आलेल्या) राहूकडून ग्रस्त असण्याने ते लोकक्षयकारी होतील. या वद्य चतुर्दशीला पुनः तीव्र मांसवर्षा झाली. -३२,३३. आवाजासहित विद्युल्लते बरोबर इन्द्राच्या वज्रासमान चमकणाऱ्या उल्का पडत आहेत; महाराज (धृतराष्ट्र), आजची रात्र संपल्यावर आपल्याला आपण (पांडवांवर) केलेल्या अन्यायाचे फळ प्राप्त होऊ लागेल-३५". ❐



प्रकरण १४

# युद्धाचे शेवटचे दिवस

**कर्णवधदिवसाची सकाळ**

प्रत्यक्ष लढाईच्या सतराव्या दिवशी कर्णाचा वध झाला. त्या दिवशीच्या सकाळच्या वर्णनात महाकवी म्हणतात-

**निःसरन्तो व्यदृश्यन्त सूर्यात् सप्त महाग्रहाः।। कर्णपर्व,** ३७-४

यात सात महाग्रहांना 'सूर्यात् निःसरन्तः' म्हणजे सूर्यबिंबापासून (जणू) बाहेर पडणारे म्हटले आहे. येथे 'व्यदृश्यन्त' याचा अर्थ बहुधा 'विशेष दृश्यमान झाले (स्पष्ट दिसले)' असा केला जातो. पण सूर्यबिंबातून जणू बाहेर पडत आहेत इतके सूर्याजवळ असतां, कोणताही ग्रह दृश्यमान असू शकत नाही; आणि विशेष दृश्यमान तर अगदी अशक्य .

परंतु येथे 'व्यदृश्यन्त' शब्दात श्लेष आहे. 'अदृश्यन्त' म्हणजे 'दिसले' हा सरळ अर्थ आहे. पण 'वि' या उपसर्गाचा आशय एका अर्थाने 'विशेष' 'अधिक' असा असला, तरी दुसऱ्या अर्थाने त्याचा आशय 'विरोध' अथवा अभाव असाही होऊ शकतो. (उदाहरणार्थ 'विस्मरण'). म्हणून वि+अदृश्यन्त (= व्यदृश्यन्त) याचा अर्थ 'दृश्यमान नव्हते' असाही होऊ शकतो. आणि वरील पंक्तीत तो आशय आहे. हेच सात महाग्रह युद्धारंभाच्या पाच दिवस पूर्वी सूर्यापासून कांही अंतरावर असून तेजस्वी चमकत होते (प्रकरण १२). चंद्र, मंगळ, बुध, गुरू, शुक्र, शनि व धूमकेतु हे ते सात महाग्रह होत.

युद्धारंभी सूर्याचे स्थान आपण स्वातींत निश्चित केले आहे. मध्यंतरी (विश्राम दिवस मोजून) तीस दिवस गेले होते, म्हणून या दिवशी सूर्य ज्येष्ठेत असावा (पुढील प्रकरणात दिलेले कोष्टक पाहा). आता ते सात ग्रह सूर्याचा निकट होते, व म्हणून दृश्यमान नव्हते, हें पाहू.

१) **चंद्र** - आपल्या गणनेनुसार कर्णवधाच्या या दिवशी पौष शुक्ल प्रतिपदा होती; म्हणजे अमावास्येची रात्र नुकतीच संपली होती, आणि सूर्यबिंबापासून चन्द्र वेगळा होत असून ('बाहेर पडत असून') अर्थातच अदृश्य होता. हे पूर्वीच्या (अमावास्यान्त कार्तिक) अमावास्येला युद्धारंभ झाल्याची,

आणि नंतर लढाई एक दिवसाआड झाल्याची, पुष्टी करते. २) **मंगळ** - युद्धारंभाच्या पूर्वदिवशी मंगळ आपली वक्र गती सोडून अनुराधेत होता. तो सरासरी वीस दिवसात नक्षत्र बदलतो; पण वक्र गति त्यागून मार्गी झाल्यावर तो मंद चालतो आणि नंतर त्याचा वेग वाढतो. यासाठी मंगळ यावेळी ज्येष्ठेत सूर्याच्या निकट (व म्हणून अदृश्य) असू शकत होता. ३) **बुध** - युद्धारंभाच्या आदल्या दिवशी आपण बुधाचे स्थान चित्रेत ठरविले आहे. हा सरासरीने सुमारे आठ दिवसात नक्षत्र बदलतो; पण कधी तो यापेक्षा बराच हळू तर कधी वेगाने जातो. तो सूर्यापासून २७ अंशापेक्षा अधिक दूर कधी जात नाही. ती सीमा आली म्हणजे (आणि कधी कधी त्याच्याही काही पूर्वी) तो आपली दिशा उलट करतो. वक्र गतीत त्याचा वेग मंद असतो. सरळ दिशेत असता मध्य मार्गात तो वेग बराच वाढतो.हे सर्व पाहता, चित्रेपासून सरळ पुढे जात बुध (मध्यंतरी सूर्याला ओलांडून) यावेळी मूळ नक्षत्रात अगर त्याच्या आसपास असावा. अशा रीतीने तो सूर्याच्या जवळ (पूर्व दिशेस) होता; आणि म्हणून या दिवशी सकाळी अदृश्य असूनही सूर्यास्तानंतर (खाली दाखविल्याप्रमाणे) दिसू शकत होता. ४) **गुरु** - युद्धारंभाच्या पूर्वदिवशी गुरुचे स्थान आपण अनुराधेच्या शेवटच्या चरणात निश्चित केले आहे. आतापावेतो तें नक्षत्र पार करून त्याने ज्येष्ठेत प्रवेश केला असावा. ५) **शुक्र**- युद्धारंभाच्या पूर्वदिवशी आपण शुक्राचे स्थान मूळ नक्षत्रात ठरविले आहे. त्यानंतर त्याने आपली दिशा वक्र केली. अशा वेळी त्याची गति मंद असते. म्हणून मध्यंतरीच्या दिवसात तो ज्येष्ठेत उलटीकडून शिरून आता ज्येष्ठेतच क्रिंवा तिच्या पश्चिम सीमेवर असावा. ६) **शनि**- याचे स्थान आपण युद्धारंभाच्या आदल्या दिवशी अनुराधेत ठरविले आहे. याची अति मंद गति पाहता या दिवशी हा तेथेच जवळपास असावा. ७) **धूमकेतु**- युद्धारंभी हा पुष्यात होता. महाभारतकारांनी जे म्हटले आहे ते पाहता हा या दिवशी सूर्याचे जवळपास असावा.

अशा रीतीने हे सारे महाग्रह कर्णवधाचे दिवशी सूर्योदयसमयी सूर्याच्या जवळपास असू शकत होते. आणि याचे चित्र रेखाटले, तर जणू काय ते सूर्यबिंबातून काही या बाजूने तर काही त्या बाजूने बाहेर पडत आहेत अशी कल्पना होऊ शकेल.

याच दिवशी कर्णवधानंतर सायंकाळाचे वर्णन करताना महाभारतकार म्हणतात:

**ग्रहश्च तिर्यग् ज्वलनार्कवर्णः**
**सोमस्य पुत्रोऽभ्युदियाय तिर्यक् ।। कर्णपर्व ९४-४९**



**... बृहस्पतिः सम्परिवार्य रोहिणीम्**
**बभूव चन्द्रार्कसमो विशाम्पते।।५१**

श्लोक ४९ चा अर्थ आहे,'अग्नि व सूर्य यांसमान भासणारा ग्रह बुध (सोमपुत्र) एका कोपऱ्यात उलटा उदित झाला.'

या दिवशी बुध सूर्याच्या काहीसे पूर्वेकडे होता हे वर सांगितले आहे. म्हणून सूर्यास्तानंतर तो पश्चिम आकाशाच्या कोपऱ्यात दिसू शकला. गुरुचा उल्लेख श्लोक ५१ मध्ये असून तो गूढ झाला आहे. त्यांत म्हटले आहे, 'राजा, गुरुने रोहिणीस व्याप्त केल्याने तें दृश्य चंद्र-सूर्यासमान झाले.' येथे रोहिणीचा अर्थ ज्येष्ठा आहे; ' रोहिणी' चा तोही एक अर्थ होतो, आणि गुरुला यादिवशी ज्येष्ठेच्या प्रवेशद्वारात मानता येते हें वर पाहिले आहे. पण येथे सूर्य-चन्द्राच्या उल्लेखाचा काय आशय? यासंबंधी अनेक तर्क केले गेले आहेत. माझ्या मते, गुरु ज्येष्ठेत व सूर्यही तेथेच असल्याने त्यांची युती (अमावास्याकालीन) चंद्र-सूर्याच्या युतीसमान झाली असा येथे आशय असावा. आणि आपल्या गणनेप्रमाणे या दिवशी सकाळी अमावास्या संपतही होती. मात्र यासाठी सूर्य ज्येष्ठेत असला पाहिजे. आणि ते मी केलेल्या एकूण गणनेने जमते.

**शल्यवध दिवस**

या दिवसाच्या सूर्योदयसमयीच्या वर्णनात म्हटले आहे-

**पूर्वाण्हे चापि सम्प्राप्ते भास्करोदयनं प्रति।। शल्यपर्व ११-७**
**..... भृगुसूनुधरापुत्रौ शशिजेन समन्वितौ**
**चरमं पाण्डुपुत्राणां पुरस्तात् सर्वभूभुजाम्।।१७**

"पूर्वाण्हसमय प्राप्त होऊन सूर्योदयाची वेळ आली; शुक्र (भृगुसूनु) व मंगळ (धरापुत्र) हे बुध (शशिज, चंद्रपुत्र) ग्रहासह पांडवांच्या मागे सर्व (कौरव?) राजांच्या समोर (आकाशात) स्थित होते." यातील अंतिम चरण काहीसे संदिग्ध आहे.* शेष स्पष्ट आहे. पुढे प्रकरण १७ मध्ये दाखविल्याप्रमाणे लढाईत पांडवांचे तोंड पश्चिमेकडे व कौरवांचे पूर्वेकडे असे. पूर्वेकडे पांडवांची पाठ होती. आणि या श्लोकात म्हटले आहे की, ते तीन ग्रह त्यांच्या मागे होते यावरून निष्पन्न होते की, सूर्योदयसमयी वरील तीन ग्रह पूर्व दिशेस सूर्याच्या जवळपास होते. वर कर्णवधाचे दिवशी सूर्याचे स्थान ज्येष्ठेत, मंगळाचेही ज्येष्ठेत, बुधाचे (ज्येष्ठेजवळ) मूळ नक्षत्रात, व शुक्राचे ज्येष्ठेत (किंवा तिच्या जवळपास) निश्चित केले आहे. मधे केवळ एक विश्राम दिवस जाऊन शल्यवधाचा

* त्यांत 'सर्व' ऐवजी 'कुरु' असा पाठभेदही आहे.

हा दिवस आला होता; या दिवशी ते तीन ग्रह त्याच स्थानाजवळ मानणे उचित आहे. वरील श्लोकात ते सर्व प्रत्यक्ष दृश्यमान होते असे म्हटले नसून, फक्त पूर्वाकाशात त्यांचे स्थान दाखविले आहे. शुक्र या वेळेपावेतो सूर्यापासून आठ अंशापेक्षा अधिक दूर गेला असेल तर दृश्यमान असेल.

अंतिम गदायुद्धाचे दिवशी महाभारतात म्हटल्याप्रमाणे चन्द्र श्रवणात होता हे वर सिद्ध केले आहे. ❐



प्रकरण १५

# उत्तरायण प्रारंभ

**भीष्मनिधनाचा समय**

भीष्मनिधनाची तिथी मागील विवेचनात माघ पौर्णिमा निश्चित केली आहे. महाकवीने अनेक स्थळी भीष्मनिधनसमयाचा उत्तरायण प्रारंभाशी संबंध दाखविला आहे (भीष्मपर्व अध्याय ११९, १२०, शांतिपर्व अध्याय ४९,५१ इत्यादि). जेव्हा भीष्मांचा शरशय्येवरील धर्मोपदेश समाप्त होऊन युधिष्ठिर त्यांचे जवळून परत हस्तिनापुरी जाऊ लागला, तेव्हा भीष्म त्याला स्पष्ट शब्दांत म्हणाले-

**आगन्तव्यं च भवता समये मम पार्थिव**
**विनिवृत्ते दिनकरे प्रवृत्ते चोत्तरायणे।। अनुशासन पर्व, ११६-१४**

'राजा (युधिष्ठिर), सूर्य (दक्षिणायनातून) निवृत्त होऊन उत्तरायणाकडे वळला की माझी (प्राणत्यागाची) वेळ येईल, तेव्हा आपण मजकडे परत यावे.' याप्रमाणे युधिष्ठिर अंत्यविधीची सारी सामग्री घेऊन ठरलेल्या वेळी भीष्मांकडे परत आला.

**तिथी - नक्षत्र तालिका**

आता आपण वर प्रस्थापित युद्धकालीन दिवस व तिथ्या, आणि महाभारतातील ज्योतिषविषयक विधाने, यांच्या आधारे भीष्मनिधनसमयींच्या उत्तरायणप्रारंभी सूर्याचे स्थान निश्चित करू. त्यानंतर या सर्व प्रमाणांनी कोणता कालखंड दिग्दर्शित होतो याचे अनुमान करता येईल.

चन्द्र-सूर्याच्या गतीविषयी काही नियमांचा उल्लेख यापूर्वीच्या विवेचनात आला आहे. तो ध्यानात घेऊन या कालावधीतील सूर्यचन्द्राची दैनंदिन स्थाने पुढील तालिकेत तपशीलवार दिली आहेत. त्यात चन्द्राच्या नक्षत्रात मधूनमधून होणारे वृद्धिलोप स्थूल रीत्या दाखविले आहेत; प्रत्यक्षात ते थोडे मागेपुढेही असू शकतील; पण त्याने पुढे दिलेल्या प्रमुख निष्कर्षात काही अंतर येणार नाही. मी त्या वृद्धिलोपांची कारणेही दिली आहेत. चन्द्राची काही नक्षत्रे

महाभारताच्या स्पष्ट वचनांनुसार किंवा संकेतानुसार विशेषतः निश्चित असून त्यांची चर्चा पूर्व प्रकरणांत आली आहे. (या नक्षत्रांना पुढील कोष्टकांत ठळकपणें दर्शविले आहे).

| तिथी | चंद्र-नक्षत्र | सूर्य-नक्षत्र | विवरण |
|---|---|---|---|
| -शुक्ल पक्ष (कार्तिकाचा)- | | | |
| चतुर्दशी | रेवती | (चित्र) | श्रीकृष्णांचे उपप्लव्याहून प्रयाण, सूर्य (काही दिवस पूर्वीपासून) चित्रेत. |
| पौर्णिमा | अश्विनी | स्वाती | प्रवास चालू. |
| -वद्य पक्ष (तेरा दिवसांचा) - | | | |
| (प्रतिपदेचा लोप) | | | |
| द्वितीया | भरणी | ,, | ,, |
| तृतीया | कृत्तिका | ,, | ,, |
| चतुर्थी | रोहिणी | ,, | ,, |
| पंचमी | मृग | ,, | ,, सायंकाळी श्रीकृष्ण वृकस्थलास पोचतात, तेथे रात्री मुक्काम. |
| षष्ठी | आर्द्रा (पुनर्वसुचा लोप) | ,, | श्रीकृष्णांचे हस्तिनापुरांत आगमन; रात्री विदुराकडे. |
| सप्तमी | पुष्य | ,, | असफल शांतिवार्ता, श्रीकृष्ण हस्तिनापुर सोडतात; जाताजाता कर्णाजवळ सातव्या दिवसानंतर येणारी अमावास्या युद्धारंभार्थ घोषित करतात; कौरवसैन्याचे हस्तिनापुरहून प्रस्थान; सायंकाळी श्रीकृष्ण उपप्लव्यास पोचतात, बलरामतीर्थयात्रा प्रारंभ. पांडवसैन्याचे पहाटे उपप्लव्याहून प्रस्थान. |
| अष्टमी | आश्लेषा | ,, | उभय सेना कुरुक्षेत्री पोचतात. |
| नवमी | मघा | ,, | उभय सेनाचे 'युद्धपूर्वाभ्यास' |
| दशमी | पूर्वा | ,, | ,, |
| एकादशी | उत्तरा | ,, | ,, |
| (द्वादशीचा लोप) | | | |
| त्रयोदशी | हस्त | ,, | कृतवर्मा यादव सैन्यासह दुर्योधनाकडे येतो. |
| चतुर्दशी | चित्रा | ,, | व्यास - धृतराष्ट्र (युद्धपूर्व) संवाद. |



| तिथी | चंद्र-नक्षत्र | सूर्य-नक्षत्र | विवरण |
|---|---|---|---|
| अमावास्या | चित्रा (वृद्धि) | ,, | गीतोपदेश; युद्धारंभ. सूर्योदयी चंद्र चित्रेत;काही वेळानंतर स्वातीत प्रवेश. |
| शुक्लपक्ष (मार्गशीर्ष) | | | |
| (स्वातीचा लोप) | | | |
| प्रतिपदा | विशाखा | विशाखा | विश्राम दिवस |
| द्वितीया | अनुराधा | ,, | प्रत्यक्ष लढाईचा दुसरा दिवस |
| तृतीया | ज्येष्ठा | ,, | विश्राम दिवस |
| चतुर्थी | मूळ | ,, | लढाईचा तिसरा दिवस |
| पंचमी | पूर्वाषाढा | ,, | विश्राम दिवस |
| षष्ठी | उत्तराषाढा | ,, | लढाईचा चौथा दिवस |
| सप्तमी | श्रवण | ,, | विश्राम दिवस |
| अष्टमी | धनिष्ठा | ,, | लढाईचा पाचवा दिवस |
| नवमी | शततारका | ,, | विश्राम दिवस |
| दशमी | पूर्वाभाद्रपदा | ,, | लढाईचा सहावा दिवस |
| एकादशी | उत्तरा भाद्रपदा | ,, | विश्राम दिवस |
| द्वादशी | रेवती | ,, | लढाईचा सातवा दिवस |
| त्रयोदशी | अश्विनी | ,, | विश्राम दिवस |
| चतुर्दशी | भरणी | ,, | लढाईचा आठवा दिवस |
| पौर्णिमा | कृत्तिका | अनुराधा | विश्राम दिवस |
| वद्य पक्ष | | | |
| प्रतिपदा | रोहिणी | ,, | लढाईचा नववा दिवस |
| द्वितीया | मृग | ,, | विश्राम दिवस |
| तृतीया | आर्द्रा | ,, | लढाईचा दहावा दिवस; सायंकाळी भीष्म पतन, भीष्मांची शरशय्येवरील प्रथम रात्र |
| चतुर्थी | पुनर्वसु | ,, | विश्राम दिवस; संजयाचा धृतराष्ट्रास प्रथम युद्ध वृत्तांत (गीता प्रकाशनासह); द्रोणास सेनापतित्वाचा अभिषेक |
| पंचमी | पुष्य | ,, | लढाईचा अकरावा दिवस |
| षष्ठी | आश्लेषा | ,, | विश्राम दिवस |
| सप्तमी | मघा | ,, | लढाईचा बारावा दिवस |
| अष्टमी | पूर्वा | ,, | विश्राम दिवस |
| नवमी | उत्तरा | ,, | लढाईचा तेरावा दिवस, अभिमन्यु वध |

| | | | |
|---|---|---|---|
| दशमी | हस्त | ,, | विश्राम दिवस |
| एकादशी | चित्रा | ,, | लढाईचा चौदावा दिवस;जयद्रथवध; रात्रियुद्ध; उत्तररात्री चंद्रोदय व लढाई |
| रात्रभर | | | चालू. (त्याला लागून विश्राम दिवस नाही). |
| द्वादशी | स्वाती | ,, | लढाईचा पंधरावा दिवस; द्रोणवध. |
| त्रयोदशी | विशाखा | ,, | विश्राम दिवस; कर्णाला अभिषेक. |
| चतुर्दशी | अनुराधा | ज्येष्ठा | लढाईचा सोळावा दिवस |
| अमावास्या | ज्येष्ठा | ,, | विश्राम दिवस |
| शुक्ल पक्ष (पौष) | | | |
| प्रतिपदा | मूळ | ,, | लढाईचा सतरावा दिवस; कर्णवध. |
| द्वितीया | पूर्वाषाढा | ,, | विश्राम दिवस; शल्याला अभिषेक |
| तृतीया | उत्तराषाढा | ,, | लढाईचा १७ $\frac{१}{२}$ वा दिवस; मध्यान्ही शल्यवध व नंतर लढणे बंद. |
| चतुर्थी | श्रवण | ,, | बलरामयात्रेची ४२ व्या दिवशी समाप्ती; अर्धा दिवस भीम- दुर्योधन गदायुद्ध होऊन लढाईचा अठरावा दिवस पूर्ण; मध्यरात्री अश्वत्थामाकडून निद्रिस्त पांडव सेनेची कत्तल; दुर्योधन मृत्यु. |
| पंचमी | धनिष्ठा | ,, | सामुदायिक दाहक्रिया, शौचपालनमास प्रारंभ. |
| षष्टी | शततारका | ,, | |
| सप्तमी | पूर्वा भाद्रपदा | ,, | |
| अष्टमी | उत्तरा भाद्रपदा | ,, | |
| नवमी | रेवती | ,, | |
| दशमी | अश्विनी | ,, | |
| एकादशी | भरणी | ,, | |
| द्वादशी | कृत्तिका | मूळ | |
| त्रयोदशी | रोहिणी | ,, | |
| चतुर्दशी | मृग | ,, | |
| पौर्णिमा | आर्द्रा | ,, | |



वद्य पक्ष

| | | | |
|---|---|---|---|
| प्रतिपदा | पुनर्वसु | मूळ | |
| द्वितीया | पुष्य | ,, | |
| तृतीया | आश्लेषा | ,, | |
| चतुर्थी | मघा | ,, | |
| पंचमी | पूर्वा | ,, | |
| षष्टी | उत्तरा | ,, | |
| सप्तमी | हस्त | ,, | |
| अष्टमी | हस्त (वृद्धि) | ,, | |
| नवमी | चित्रा | ,, | |
| दशमी | स्वाती | पूर्वाषाढा | |
| एकादशी | विशाखा | ,, | |
| द्वादशी | अनुराधा | ,, | |
| त्रयोदशी | ज्येष्ठा | ,, | |
| चतुर्दशी | मूळ | ,, | |
| अमावास्या | पूर्वाषाढा | ,, | |
| शुक्ल पक्ष (माघ) | | | |
| प्रतिपदा | उत्तराषाढा | ,, | |
| द्वितीया | श्रवण | ,, | |
| तृतीया | धनिष्टा | ,, | |
| चतुर्थी | शततारका | ,, | शौचपालनमास समाप्त. |
| पंचमी | पूर्वा भाद्रपदा | ,, | पांडवांचा हस्तिनापुरप्रवेश. |
| षष्टी | उ. भाद्रपदा | ,, | युधिष्ठिरास राज्याभिषेक, आदि. |
| सप्तमी | रेवती | ,, | ,, |
| अष्टमी | अश्विनी | उत्तराषाढा | ,, |
| नवमी | भरणी | ,, | ,, |
| दशमी | कृत्तिका | ,, | श्रीकृष्ण - पांडवांची शरशय्येवर पडलेल्या भीष्मांस भेट |
| एकादशी | रोहिणी | ,, | भीष्मोपदेश प्रारंभ |
| द्वादशी | मृग ,, | ,, | दुसरा दिवस |
| त्रयोदशी | आर्द्रा ,, | ,, | तिसरा दिवस |
| चतुर्दशी | पुनर्वसु ,, | ,, | चौथा दिवस |

| | | |
|---|---|---|
| पौर्णिमा पुष्य ,, | ,, | उपदेशाचा पांचवा दिवस; भीष्मांची शरशय्येवर ५८ वी रात्र; तिच्या समाप्ती प्रहरी उत्तरायण प्रारंभावर भीष्मांचे निधन. |

यातील वृद्धिलोपांचे स्थूल स्पष्टीकरण देतो-

**प्रथम कृष्ण पक्ष** - हा तेरा दिवसांचा असल्याने यात दोन तिथीलोप होते (प्रकरण ५). महाभारतकारांनी तेरा दिवसांच्या या कृष्ण पक्षात सप्तमीला चंद्र पुष्यात आणि त्याच्या आठव्या दिवशी अमावास्येला 'इन्द्रस्वामित्वाच्या' (चित्रा) नक्षत्रात दाखविला आहे (प्रकरण १३). हे पाहता या पक्षाच्या उत्तरार्धात चन्द्राची एक नक्षत्रवृद्धि निश्चित आहे. चंद्राची दैनंदिन गती नित्य काही एका सीमेत जास्त होत राहते; व त्यामुळे तिथिनक्षत्रांची लोपवृद्धि होते. किंबहुना काही परिस्थितीत तिथिलोपास लागूनच नक्षत्रवृद्धि संभव आहे. मात्र तिथिनक्षत्रांच्या लोपवृद्धीसाठी चन्द्राचा नक्षत्रप्रवेश आणि तिथिप्रारंभ सूर्योदयाच्या निकट (आधी अगर नंतर) होणे आवश्यक असते. शेवटी, महाभारताचे अशा संदर्भात विवेचन करताना आपण प्राचीन काळी भारतवर्षात प्रचलित असलेल्या ज्योतिर्विद्येबद्दल बोलत असतो हेही लक्षात घेणे आवश्यक आहे.

**मार्गशीर्ष शुक्ल पक्ष** - यात एक नक्षत्रलोप आहे. अन्यथा पौर्णिमेस चंद्र भरणीत येईल, पण मार्गशीर्ष पौर्णिमेस चंद्र मृगाच्या तीन स्थाने मागे भरणीत असणार नाही; जास्तीत जास्त कृत्तिकेपावेतो मागे असू शकेल. मात्र प्रस्तुत संदर्भात तो कृत्तिकेच्या अलिकडेही मानता येणार नाही; कारण तिकडे गदायुद्धाचे दिवशी चन्द्राचे श्रवण नक्षत्र निश्चित आहे. या कालावधीत सूर्यचन्द्राची एकूण स्थिती सुसंगत जमावी यादृष्टीने मी तो नक्षत्रलोप स्वातीचा मानला आहे.

**अंतिम कृष्ण पक्ष** - यात चन्द्राची एक नक्षत्रवृद्धि येते; अन्यथा अमावास्येला सूर्याच्या स्थानाशी चन्द्राची स्थिती जमणार नाही.

अशा प्रकारे आपण एका महत्त्वाचा निष्कर्षावर आलो आहो.महाभारतातील ज्योतिषात्मक आणि कालगणनात्मक उल्लेख सुसंगत व शास्त्रशुद्ध असून दाखवितात की, त्यात उल्लेखित उत्तरायणप्रारंभाचे वेळी सूर्य उत्तराषाढेत होता. सूर्य एका नक्षत्रात तेरा- चौदा दिवस राहतो; आणि भीष्मनिधनसमयींच्या उत्तरायण प्रारंभापावेतो त्याने उत्तराषाढेत सुमारे आठ दिवस घालविले होते. याचा आशय असा की, त्यावेळी सूर्य उत्तराषाढेत मध्याच्या किंचित पुढे पोचला होता. या निष्कर्षाच्या आधारे आता आपणास त्या कालखंडाचे अनुमान करावयाचे आहे.



## महाभारतातील उत्तरायणप्रारंभ श्रवण नक्षत्राच्या आरंभी होता काय?

पण तत्पूर्वी काही लेखकांच्या या मतावर विचार करू की, महाभारतात उत्तरायण प्रारंभ श्रवणारंभी दाखविला आहे. यासाठी ते पुढील आधार देतात. आदिपर्वात अप्सरा मेनका इन्द्रास म्हणते -

**चकारान्यं च लोकं वै कृद्धो नक्षत्रसंपदा**
**प्रतिश्रवणपूर्वाणि नक्षत्राणि चकार यः ।। ७१-३४**

"(विश्वामित्रऋषि इतका शक्तिसंपन्न आहे की) त्याने वेगळी प्रतिसृष्टी रचली; आणि (ईश्वर निर्मित) नक्षत्रमंडलावर क्रुद्ध होऊन श्रवणापासून प्रारंभ होणारे दुसरे नक्षत्र मंडल निर्माण केले." याशिवाय, एका अन्य श्लोकात ब्रह्मदेव महर्षींना सांगतात,

**श्रवणदीनि ऋक्षणि ऋतवः शिशिरादयः (आश्वमेधिक पर्व ४४-२)**

"नक्षत्रे श्रवणापासून व ऋतू शिशिरापासून सुरू होतात."

या श्लोकांत नक्षत्रमंडलाचा आरंभ दाखविला असून उत्तरायणाचा उल्लेख नाही. पण तरीही उपरोक्त लेखक (उदाहरणार्थ, शं. बा. दीक्षित, पू. उ. पृ. ११०-१११) प्रतिपादन करतात की, महाभारतात नक्षत्रांचा आरंभ श्रवणापासून दाखविण्याचे कारण हेच असावे की, त्यावेळी उत्तरायणप्रारंभही सूर्य श्रवणारंभी असावा, या अनुमानासाठी हे लेखक असा आधार देतात की, (महाभारताच्या पूर्वी होऊन गेलेल्या) लगधांच्या वेदांगज्योतिषकाली नक्षत्रांची गणना धनिष्ठेपासून सुरू होत असे, आणि उत्तरायणप्रारंभ सूर्य धनिष्ठारंभी असताना होत असे; व म्हणून जेव्हा नक्षत्रगणनेत श्रवणाला प्रथम स्थान दिले गेले तेव्हा ते यासाठीच असावे की, उत्तरायणप्रारंभी सूर्याचे स्थान त्यावेळी श्रवणारंभापावेतो सरकले असावे.

पण हा वस्तुतः एक चमत्कारिक तर्क आहे. वेदांग ज्योतिषाचे पूर्वी वेदकाली नक्षत्रगणना कृत्तिकेपासून असे. तें त्यावेळी उत्तरायणप्रारंभी सूर्य कृत्तिकारंभी असे म्हणून होतें काय? तसेच श्रवणाऐवजी नंतर अश्विनीपासून नक्षत्रगणना आरंभ केली जाऊ लागली, याचा उत्तरायणप्रारंभाशी काय संबंध? दर वेळेस सुमारे ९५५ वर्षांनी उत्तरायण प्रारंभीचे सूर्याचे स्थान एक नक्षत्र मागे सरकते (पुढील प्रकरण पाहा); पण म्हणून अशा प्रत्येक वेळी नक्षत्रगणनेच्या आरंभात तदनुसार परिवर्तन केले जाते काय? पण तेही असो. मैत्री उपनिषदात उत्तरायण प्रारंभ धनिष्ठेत होण्याचा उल्लेख असला तरी त्यात नक्षत्रगणना कृत्तिकेपासून आहे (पाहा रघुनाथशास्त्री पटवर्धनकृत 'ज्योतिषशिक्षक', द्वितीयावृत्ती, पृ. ३४४). आणि खुद्द महाभारतातच धार्मिक विधीसाठी नक्षत्रांचा

आरंभ कृत्तिकेपासून केला आहे (अनुशासन पर्व, अध्याय ६४, ८९). असे दिसते की, पूर्वी नक्षत्रांच्या वेगवेगळ्या गणना प्रचलित असून त्यातील एक धनिष्ठेपासून तर दुसरी (कोणत्याही कारणाने असो) श्रवणापासून प्रारंभ होत असे.

पण याशिवाय नक्षत्रांची श्रवणापासून गणना प्रचारात आली त्यावेळी उत्तरायण प्रारंभी सूर्य श्रवणारंभी होता, असेही क्षणभर वादासाठी मानले तर काय घोटाळा होतो पाहा. महाभारतात ती विश्वामित्र- मेनका कथा पाण्डवांच्याही फार पूर्वीची एक प्राचीन घटना या रूपात आली आहे. पण श्रवणारंभी उत्तरायणप्रारंभ होण्याचा काळ सुमारे इ. स. पूर्व पाचवे शतक हा होय, हे पुढील प्रकरणातील कोष्टकावरून दिसून येईल.* मग विश्वामित्राचा तो काळ धरून त्याच्या कित्येक शतकानंतर (इ. सन प्रारंभ होऊन गेल्यावर) पाण्डवांचा, श्रीकृष्णांचा व महाभारतयुद्धाचा काळ धरावयाचा काय? आणि विश्वमित्रांच्या काळी सूर्य उत्तरायणप्रारंभी श्रवणाच्या सुरवातीस असेल, तर (पुढील प्रकरणात स्पष्ट केलेल्या नियमास अनुसरून) पांडवांच्या काळी उत्तरायणप्रारंभी सूर्याचें स्थान श्रवणाऐवजी मागे सरकत उत्तराषाढेत असेल.

तसेच आश्वमेधिक पर्वाच्या वरील श्लोकात ब्रह्माचा काही प्राचीन ऋषींशी संवाद असून, त्यात वशिष्ठाशिवाय विश्वामित्राचाही समावेश आहे; म्हणजे एकूण परिस्थिती तीच राहते.

वस्तुतः महाभारतकारांनी श्रवणापासून सूरू होणाऱ्या नक्षत्रगणनेचा उल्लेख एक तत्कालीन प्रचलित गणना म्हणून केलेला दिसतो; त्याचा उत्तरायणप्रारंभी सूर्याच्या स्थानाशी संबंध नाही. आणि याप्रमाणे महाभारताच्या कालगणनात्मक व ज्योतिषात्मक वचनांवर आधारित आपला निष्कर्ष हा राहतो की, भीष्मनिधनसमयींच्या उत्तरायणप्रारंभी सूर्य उत्तराषाढेत मध्याच्या किंचित पुढे होता. यावरून कोणता कालखण्ड सूचित होतो?

* या मुद्याची चर्चा करताना टिळकांनाही याची जाणीव होती ('गीतारहस्य' पृ. ५५७); शिवाय दीक्षित, पू.उ. पृ. १११ देखील पाहा.



प्रकरण १६

# त्या कालखंडाचे रहस्य

### काही खगोलशास्त्रीय माहिती

सूर्य व ग्रह आकाशात वर्तुळाकार पश्चिम - पूर्व मार्गाने फिरत असतात (म्हणजे पृथ्वीवरून आपल्यास तसे फिरताना दिसतात). भारतीय ज्योतिषशास्त्रात हा मार्ग सत्तावीस नक्षत्रात (बारा राशीत) विभागला असून याला नक्षत्र-मंडल (Zodiac) म्हणतात. ही नक्षत्रे एका सरळ रेषेत नसून थोडी दक्षिणोत्तर मागे पुढे आहेत. म्हणून नक्षत्रमंडल एक काहीसा रुंद पट्टा असून त्यात सूर्यचन्द्रादींचे आपापले मार्ग आहेत. ते समांतर नसून परस्परांना तिरकस कापतात. यातील सूर्याच्या मार्गाला क्रांतिवृत्त (Ecleptic) म्हणतात. विषुववृत्त म्हणजे आकाशाचे उत्तर दक्षिण असे दोन भाग करणारी पूर्व- पश्चिम काल्पनिक वर्तुळाकार मध्यरेखा. या आकाशीय विषुववृत्ताला खाली आणत त्याने पृथ्वीला स्पर्श केल्याची कल्पना केली म्हणजे ते पृथ्वीचे विषुववृत्त (भूमध्यरेखा) होऊन, पृथ्वीचे उत्तर गोलार्ध व दक्षिण गोलार्ध असे दोन भाग होतात.

क्रांतिवृत्त आकाशस्थ विषुववृत्ताला थोडे तिरपे कापत जाते आणि म्हणून त्यास दोन बिंदूत छेदते. एका बिंदूवर क्रांतिवृत्त विषुववृत्ताच्या उत्तरेकडून दक्षिणेकडे प्रवेश करते, तर दुसऱ्या बिंदूवर तें विषुववृत्ताच्या दक्षिणेकडून परत उत्तरेकडे शिरते. या छेदनबिंदूंना संपात (Equinox) म्हणतात. क्रांतिवृत्तांतून जात असता सूर्य या छेदन बिंदूवर आला म्हणजे तो ठीक विषुववृत्तावर असतो; व यावेळी तो उदयसमयी बरोबर पूर्व दिशेच्या मध्यस्थित केन्द्रावर व अस्ताचे वेळी पश्चिम दिशेच्या मध्यकेन्द्रावर असतो.

सूर्य क्रांतिवृत्तांतून फिरत असता दरवर्षी विषुववृत्ताच्या दक्षिणेस अधिकतम (सुमारे २३ $\frac{1}{2}$ अंश) जाऊन पुनः उत्तरेकडे वळतो. हा उत्तरायण प्रारंभ होय. हा दिवस पाश्चात्य गणनेप्रमाणे २१ (२२) डिसेंबर असतो.* यावेळी सूर्यप्रकाशयुक्त

* Winter Solstice

दिवसमान सर्वात लहान आणि रात्र सर्वात मोठी असते. तीन महिन्यांनी म्हणजे २१ मार्चला सूर्य विषुववृत्ताच्या छेदन स्थानी (संपातबिंदूवर) येतो; हा वसंतसंपात होय.✻१ या दिवशी दिवस व रात्र समान असतात. यानंतर सूर्य उत्तरेकडे असाच अधिकतम पोचून दक्षिणेकडे वळतो; तेव्हा २१ जून तारीख असते✻२ हा दक्षिणायन प्रारंभ होय. यावेळी दिवसमान सर्वाधिक व रात्र सर्वात लहान असते. नंतर २१ सप्टेंबरला सूर्य विषुववृत्ताच्या दुसऱ्या संपात बिंदुवर येतो.✻३ या दिवशीही पुन्हा दिवस रात्र समान असतात. येथून सूर्य आणखी दक्षिणेकडे जातो.

उत्तरायणाचा प्रचलित अर्थ म्हणजे सूर्य उत्तरेकडे जात असणारा कालखंड, मग या दरम्यान तो विषुववृत्ताच्या प्रत्यक्ष दक्षिणेस असो वा उत्तरेस. आणि याच्या उलट तें दक्षिणायन. पण याशिवाय उत्तरायणाचा दुसरा अर्थ म्हणजे सूर्य विषुववृत्ताच्या उत्तरेसच असण्याचा काल, मग या दरम्यान तो उत्तरेकडे सरकत असो वा दक्षिणेकडे. दीक्षितांनी प्रथम अर्थ ज्योतिषगणितानुसार तर दुसरा अर्थ वैदिक असा भेद केला आहे.✻४ महाभारतात उत्तरायण प्रारंभाचा प्रचलित अर्थ अभिप्रेत आहे.

**संपात चलन**

सूर्याचे संपातसमयीचे स्थान पूर्वेकडून पाश्चिमेकडे मागे (म्हणजे सूर्य आणि ग्रह वार्षिक गतीत नक्षत्रमंडळातून फिरतात त्याच्या उलट दिशेने) सरकत असते. अशा प्रकारे सरकत ते २५७८० वर्षांनी संपूर्ण नक्षत्रमंडलाचा (उलटा) चक्कर पूर्ण करते; अर्थात सरासरी ९५५ वर्षांनी एक नक्षत्र मागे जाते.✻५ संपातसमयीचे सूर्याचे स्थान असे सरकल्याने उत्तरायणआरंभीचेही त्याचे स्थान त्या दिशेने आणि तितकेच मागे सरकत राहते. कित्येक शतकांपूर्वी उत्तरायणप्रारंभी सूर्य मकर राशीत प्रवेश करीत असे. आता तसे होत नाही. पण तरीही काही जण आजही मकर संक्रमणालाच उत्तरायणप्रारंभ मानतात तें बरोबर नव्हे. पाश्चिमात्य (सौर) दिनगणनेनुसार २१ (२२) डिसेंबर हा

✻१ Vernal (Spring) Equinox

✻२ Summer Solstice

✻३ Autumn Equinox.

✻४ 'भारतीय ज्योतिषशास्त्र', पृ. ३३-३४; शिवाय पाहा गोरखप्रसाद कृत 'भारतीय ज्योतिष का इतिहास'.(हिन्दी), पृ. १६.

✻५ याला Precession of the Equinoxes चा नियम म्हणतात. संपूर्ण नक्षत्रमंडळाचे ३६० अंश केले तर सूर्याचे हे स्थान अशाप्रकारे ७२ वर्षांत एक अंश मागे जाते.



उत्तरायणप्रारंभाचा दिवस वर सांगितलाच आहे.

**ते शतक कोणते होते?**

वर्तमानसमयी पंचांगात उत्तराणप्रारंभी (२१-२२ डिसेंबरला) सूर्य मूळ नक्षत्रात व त्याचा त्यात प्रवेश तारीख १५ (१६) डिसेंबरला दाखविला असतो. याप्रमाणे उत्तरायणप्रारंभाच्या सुमारे सात दिवस अगोदर सूर्याचा मूळ नक्षत्रात प्रवेश होतो. अर्थात उत्तरायण प्रारंभी त्याने मूळ नक्षत्र सुमारे अर्धे ओलांडलेले असते. हे ध्यानात घेऊन महाभारतात दिग्दर्शित उत्तरायण प्रारंभीच्या कालखंडाचा स्थूल अंदाज करू. यात पुढील आकृती साह्यभूत होईल.




< -- < सूर्याच्या दैनिक (दिसणाऱ्या) भ्रमणाची दिशा

---> सूर्याच्या वार्षिक भ्रमणाची दिशा

<-- <-- सूर्याच्या उत्तरायणप्रारंभीच्या स्थानपरिवर्तनाची दिशा

महाभारतातील उत्तरायणप्रारंभी सूर्य उत्तराषाढेत 'घ' बिंदुच्या जवळपास होता; कारण तो त्यावेळी त्या नक्षत्रात आठ दिवस घालवून चुकला होता, आणि आणखी सुमारे साडेपाच दिवस त्याला तेथे काढावयाचे होते. उलट हल्ली उत्तरायणप्रारंभी तो मूळ नक्षत्रात 'क' स्थानात असतो. त्याचे ते स्थान 'घ' पासून 'क' पावेतो मागे सरकण्यास किती काळ लागला असावा? या अंतराचे तीन भाग आहेत - घग, गख आणि खक. यांतील 'घग' उत्तराषाढेचा ८/१३$\frac{1}{2}$ अंश आहे. उत्तरायण प्रारंभीचे सूर्याचे एक स्थान मागे सरकण्यास ९५५ वर्षे लागतात; या प्रमाणाने 'घग' विभागाची ५६६ वर्षे होतात. 'गख' एक संपूर्ण नक्षत्र असल्याने त्याची ९५५ वर्षे होतात. शेवटी 'खक' भाग मूळ नक्षत्राचा ६$\frac{1}{2}$ / १३$\frac{1}{2}$ अंश आहे; कारण 'क' बिंदुपाशी सूर्य असतो तेव्हा तो त्या नक्षत्रात सात दिवस राहिलेला असतो, आणि त्याला तेथें आणखी ६$\frac{1}{2}$ दिवस काढावयाचे असतात. म्हणून 'खक' साठी ४६० वर्षे होतात. एकूण

बेरीज १९८१ वर्षे होते. अशा रीतीने उत्तरायणप्रारंभी सूर्याचे स्थान 'घ' पासून 'क' पावेतो मागे सरकण्यास सुमारे १९८१ (१९८०) वर्षे लागली असावीत.

मी वर्तमान समयी सूर्याचा मूळ नक्षत्रात प्रवेश १५ डिसेंबरला मानून त्याचे उत्तरायणप्रारंभी स्थान 'क' पाशी धरले आहे. पण हें काही वर्षे पूर्वीपासून चालू असू शकते. कोणत्याही नक्षत्रात सूर्याच्या प्रवेशाची तारीख सुमारे ७१ वर्षांनी एक दिवस बदलत जाते (२५७८० भागिले ३६५). तूर्त काही जुनी पंचांगे पाहून मी सूर्याचा मूळ नक्षत्रात तारीख १५ डिसेंबरला प्रवेश इ. स. १९५० पावेतो स्थूल मानाने मागे नेतो. सारांश, सूर्य उत्तरायणप्रारंभी मूळ नक्षत्रात 'क' बिंदूपाशी सुमारे इ.स. १९५० मध्ये मानून, तें स्थान उत्तराषाढेत 'घ' पाशी १९८० वर्षे पूर्वी म्हणजे इ.स. पूर्वी तीसच्या सुमारास असावे. अर्थातच इतक्या भूतकालाच्या अशा अंदाजात काही वर्षांचा वा दशकांचाही फरक असू शकेल. स्थूल निष्कर्ष असा की, महाभारतात वर्णित उत्तरायण प्रारंभ इ. स. पूर्व पहिल्या शतकातला दिसतो ! महाभारताच्या दृष्टीने हा निष्कर्ष फार महत्वाचा असून याची आणखी पुष्टी पाहू.

इ.स. १९५० च्या सुमारास उत्तरायणप्रारंभी सूर्याने 'मूळ' नक्षत्राचा ७ / १३ $\frac{१}{२}$ भाग ओलांडला होता, या आधारावर आपण शेष भागाची ४६० वर्षे मोजली आहेत. याचा अर्थ असा की, इ.स. १४९० च्या सुमारास (१९५० उणे ४६०) सूर्य उत्तरायणप्रारंभी 'मूळ' नक्षत्राच्या शेवटी होता. त्यातून दर नक्षत्रास ९५५ वर्षे मागे जात आपण उत्तरायणप्रारंभीच्या सूर्याच्या स्थानांच्या पुढील कालखंडांवर येतो. धनिष्ठा - इ. स. पूर्व २३३० ते इ. स. पूर्व १३७५; श्रवण इ. स. पूर्व १३७५ ते इ. स. पूर्व ४२०; उत्तराषाढा - इ. स. पूर्व ४२० ते इ. स. ५३५; पूर्वाषाढा- इ. स. ५३५ ते इ. स. १४९०; आणि मूळ- इ. स. १४९० ते इ. स. २४४५.

पाश्चिमात्य विद्वान Kohl यांच्या अनुसार इ. स. पूर्व २२४१ च्या सुमारास उत्तरायणप्रारंभ (Winter Solstice) समयी सूर्य धनिष्ठा (Dolphin) नक्षत्रात असे;✱१ हें आपल्या वरील कोष्टकाशी जुळते. दीक्षितांनी✱२ अधिक तपशिलात जाऊन म्हटले आहे की, इ. स. पूर्व १४०० च्या सुमारास

✱१ पाहा 'The Chronology of the Reign of Ashoka Moriya' by P.H.L. Eggermont, pages 151-152.

✱२ 'भारतीय ज्योतिषशास्त्र' पृ. १११



उत्तरायणप्रारंभी सूर्य धनिष्ठेच्या प्रारंभी व इ. स. पूर्व ४५० च्या सुमारास श्रवणारंभी असे; आणि हेंही वरील गणनेशी बरोबर जळते. हे सांगणे नकोच की, उत्तरायणप्रारंभी सूर्याचे स्थान उलटे मागे सरकत असल्याने, वर प्रत्येक नक्षत्रासमोरील पहिली वर्षसंख्या नक्षत्राच्या समाप्तिस्थानाशी व दुसरी आरंभाशी संबद्ध आहे.

याची एक वेगळी स्वतंत्र पुष्टीही पाहा. प्राचीन ग्रीक ज्योतिषशास्त्रज्ञ हिप्पार्कस यांनी लिहून ठेवले आहे की, त्यांच्या समयी (इ. स. पूर्व १२५ च्या सुमारास) वसंत संपाताच्या वेळी सूर्य Aries (= मेष राशि) मध्ये असे.✱ मेष राशीचा प्रारंभ अश्विनी नक्षत्रापासून होतो, आणि वसंतसंपात उत्तरायण प्रारंभापासून तीन (सौर) महिन्यांनी येतो.

आपल्या गणनेनुसार इ. स. पूर्व १२५ च्या सुमारास उत्तरायण प्रारंभी सूर्य उत्तराषाढेत $\frac{२}{३}$ भाग पार करून होता. कारण इ. स. पूर्वी ४२० मध्ये तो (उत्तरायण प्रारंभी) उत्तराषाढेच्या समाप्तिस्थानी होता, व (४२० उणे १२५ =) २९५ वर्षांत त्याचे ते स्थान उत्तराषाढेच्या सुमारे $\frac{१}{३}$ भाग मागे सरकले होते.

तीन (इंग्रजी ) महिन्यांत सूर्य तीन राशी म्हणजे ६$\frac{३}{४}$ नक्षत्रे पुढे जातो. म्हणून त्या वर्षी उत्तरायणप्रारंभानंतर आणखी तीन महिन्यांनी तो उत्तराषाढेचा शेष $\frac{१}{३}$ भाग, व शिवाय श्रवण ते रेवती ही सहा नक्षत्रे पार करून वसंतसंपात समयीं अश्विनीत (म्हणजेच हिप्पार्कस यांनी म्हटल्याप्रमाणे मेष राशीत) असेल. अशा रीतीने आपली गणना विश्वाच्या दुसऱ्या भागांत एका श्रेष्ठ ज्योतिषज्ञाने केलेल्या निरीक्षणाशीही जुळते.

**वराहमिहिरांचे वचन**

येथे वराहमिहिरांच्या काही वचनांवरही विचार करू. 'बृहत्संहिता'

✱ पाहा "Planets, Stars and Galaxies" by A.E. Fanning, Page 61. Columbia Encyclopedia मध्येही हिप्पार्कसचा काल इ.स. पूर्व दुसरे शतक दाखविला आहे. Eggermont (पूर्व उल्लेखित) तो काळ खिस्तपूर्व चौथें शतक कसा दाखवितात हे स्पष्ट नाही.

ग्रन्थाच्या तिसऱ्या अध्यायात ते म्हणतात -

**आश्लेषार्द्धाद्दक्षिणमुत्तरमयनं रवेर्धनिष्ठाद्यम्**
**नूनं कदाचिदासीद्येनोक्तं पूर्वशास्त्रेषु।।३-१**
**साम्प्रतमयनं सवितुः कर्कटकाद्यं मृगादितश्चान्यत्।२**

'एकेकाळी सूर्याचे दक्षिण अयन (भ्रमण) आश्लेषाच्या उत्तरार्धापासून व उत्तर अयन धनिष्ठेच्या आरंभी सुरू होत असे; प्राचीन ग्रंथात असे सांगितले असल्याने ते खरे असले पाहिजे -१ (मात्र) हल्ली सूर्याचे एक (दक्षिण) अयन कर्कटकाच्या आरंभापासून व दुसरे (उत्तर) अयन मृग म्हणजे मकर राशीच्या आरंभी सुरू होते-२.'✱

प्राचीन समयी एक काळी उत्तरायण प्रारंभ धनिष्ठेत होत असे हें आपण वर पाहिले आहे. पण वराहमिहिरांच्या काळी तें मकर राशीच्या सुरूवातीस होई असे येथे म्हटले आहे. मकर राशीचा आरंभ उत्तराषाढेच्या द्वितीय चरणापासून होतो. बृहत्संहितेचा रचनाकाल इ. स. ५६० च्या सुमारास असावा असा विद्वानांचा अंदाज आहे. आपल्या गणनेप्रमाणे त्या सुमारास उत्तरायण प्रारंभी सूर्य पूर्वाषाढेच्या शेवटी अथवा उत्तराषाढेच्या प्रारंभी असेल. अशा रीतीने आपल्या गणनेत व वराहमिहिरांच्या वचनांत केवळ पाव नक्षत्राचा फरक येतो. पण वराहमिहिरांचा काळ देखील अंदाजाचा विषय आहे. शिवाय आपली गणना नक्षत्रीय आहे; पण वराहमिहिरांनी प्राचीन काळाच्या संबंधात नक्षत्रांचा उल्लेख केला असला, तरी त्यांनी स्वतःच्या वेळची स्थिती राशीत दर्शविली आहे. त्यांच्या स्वतःच्या काळाच्या संबंधात त्यांनी उल्लेखिलेल्या मकर राशीचा आरंभ उत्तराषाढेच्या द्वितीय चरणापासून होतो; आणि नक्षत्रांचे असे चरण काल्पनिक आहेत. तसेच आकाशात सर्व नक्षत्रांचा विस्तार अगदी समान नसतो; आणि आपण दर नक्षत्रास ९५५ वर्षे सरासरीने धरली आहेत.

एकूण आपला निष्कर्ष असा की, महाभारतात वर्णित उत्तरायण प्रारंभी सूर्य उत्तराषाढेच्या सुमारे मध्यात होता, व त्यावरून इ. स. पूर्व प्रथम शतक सूचित होते. पण हा काळ अलेक्झांडरच्या भारतावरील स्वारीच्या सुमारे तीन शतकानंतरचा असून, इतक्या अलीकडे पांडव व श्रीकृष्ण झाले असे कोणाचेही म्हणणे नाही. मग महाभारतातील ज्योतिषात्मक संकेत हा काळ दर्शवितात हे कसे?

✱ पाहा English Translation by V. Subramanya Sastri, Bangalore : 1947



## तो काळ महाभारताच्या रचनेचा !

यामागील राहस्य हें आहे की, महाभारतातील ज्योतिषविषयक वर्णन महाभारतकार महाकवीचा स्वतःचा काळ दर्शविते. स्पष्ट सांगावयाचे म्हणजे या महाभारताची रचना इ.स. पूर्व प्रथम शतकाच्या सुमारास झाली; आणि जरी त्याच्या कर्त्याने आपले नांवगाव व्यक्त केले नसले, तरी त्याचे ज्योतिषीय उल्लेख त्याचा स्वतःचा काळ दर्शवितात. आणि ती ग्रहस्थिती महाकवीच्या प्रत्यक्ष अनुभवाची होती, म्हणूनच ती पूर्ण सुसंगत आहे. मात्र त्यातही त्याने कूटरचना केली असल्याने, अनेकांना ती विसंगत व असंभव वाटते. पण त्याबरोबरच ज्यांनी ती ग्रहस्थिती सुसंगत मानून त्यात महाभारत युद्धाचे वर्ष धुंडण्याचे विविध प्रयास केले, त्यांचीही दिशाभूल झाली.

महाभारतात महाकवीने युद्धकालासंबंधी इतकेच म्हटले आहे की, युद्ध द्वापर व कलियुगाच्या संधिकालांत झाले. आणि जरी कलियुगाचा प्रारंभ इ.स. पूर्व ३१२० मध्ये मानण्याची एक परंपरा भारतवर्षात प्रचलित आहे, तरी तो काल प्रथम कोणी आणि कोणत्या आधारे प्रतिपादन केला, आणि महाभारताच्या कर्त्याला तो मान्य होता काय. याविषयी पर्याप्त प्रमाण नाही. महाभारतातील ज्योतिषीय वचनांवरून युद्धवर्ष काढण्याचा प्रयास सफल होणार नाही. जे असा प्रयास करतात ते महाभारतातील तिथ्या, दिनगणना, नक्षत्रे यांविषयी चुकीच्या धारणा गृहीत धरीत असतात.

याचे एक विशेष उदाहरण पाहा. तारकेश्वर भट्टाचार्य महाभारतातील ज्योतिषीय वचनांवरून इ.स. पूर्व पंधरावे शतक हा युद्धकाळ सिद्ध करू पाहतात.✱ या युद्धकालाशी मी सहमत आहे, मात्र त्यासाठी माझी प्रमाणे अन्य असून महाभारतातील ज्योतिषात्मक वचनांचा त्याच्याशी संबंध नाही. पण भट्टाचार्य (त्या युद्धकालाच्या अनुमानासाठी) युद्धारंभाच्या अमावास्येला सूर्य ज्येष्ठेत मानतात, व त्याचे समर्थन असे देतात की श्रीकृष्णांनी ज्या दिवशी कर्णाजवळ 'सप्तमात् दिवसात्' येणारी अमावास्या युद्धारंभार्थ घोषित केली होती त्या दिवशी चंद्र मघेत होता. पण महाभारतानुसार तो पुष्यात होता; व मघानक्षत्र दिवशी तर उभय सैन्ये कुरुक्षेत्रावर पोचूनही गेली होती. (प्रकरण १४). तिकडे युद्धारंभापासून भीष्मनिधनापावेतो (म्हणजेच उत्तरायण प्रारंभापावतो) ते (७६ ऐवजी) ६७ दिवस मोजतात; आणि लढाईच्या चौदाव्या

✱ 'The Date of the Bharata War (from astronomical Data only)', Journal of the G.Jha Research Institute, Allahabad, Vol VIII, Part 1.

दिवशीच्या उत्तररात्रीच्या चन्द्रोदयाचे ते स्पष्टीकरण देऊ शकत नाहीत, व बलरामांच्या तीर्थयात्रेच्या आरंभी चंद्र पुष्यात दाखविला असताना ते श्रवणात मानतात. जर महाभारतात दिग्दर्शित तिथ्या, दिवसगणना, नक्षत्रे आदि वास्तव आशयानुसार सुसंगत घेतली, तर त्यावरून सुमारे इ.स. पूर्व प्रथम शतकापेक्षा अन्य काल अनुमानित होऊ शकणार नाही.

**याने अनेक प्रश्नांचा उलगडा होतो**

महाभारताच्या रचनेत हा इ.स. पूर्व प्रथम शतकाचा काळ ध्यानात घेतला म्हणजे यात यवनांचा (ग्रीकांचा), शकांचा (Scythians) आणि पल्लवांचा (Parthenians) उल्लेख कसा येतो हे स्पष्ट होते. भारताच्या या विदेशी आक्रमकांना दुर्याधनाच्या बाजूने लढताना दाखविले असून युद्धात त्यांचा पराजय चित्रित केला आहे. चिं. वि. वैद्य लिहितात की, 'यवनांचा म्हणजे ग्रीकांचा' भारतीयांशी प्रथम संबंध अलेक्झांडरच्या वेळी येऊन इ.स. च्या प्रथम शतकापावेतो टिकला.✻१ एक आंग्ल विद्वानही महाभारतात ग्रीक व रोमन लोकांचा उल्लेख पाहतात.✻२ महाभारतात काही ग्रीकमूलक शब्दही आढळतात. लाक्षागृहांतून पांडवांच्या पलायनाच्या संबंधात 'सुरुंग' शब्द आला आहे (आदिपर्व ६१ व १४७); त्याचा संबंध ग्रीक शब्द Syrinx (भूमिगत गुप्त मार्ग ) याच्याशी लावला गेला आहे.✻३ 'त्रिकोण' शब्दाद्दलही असाच तर्क केला गेला असून, 'यवन' शब्द Ionians पासून झाल्याचे मत व्यक्त केले गेले आहे.✻४ 'बर्बरान्' शब्दही अशाच प्रकारचा आहे.✻५

मगध सम्राट चन्द्रगुप्त मौर्याच्या दरबारी येऊन राहिलेला ग्रीक राजदूत मेगॅस्थानीस याच्या भारतवर्ष विषयक वृत्तांतात येथील काही पौराणिक कथांचा उल्लेख असला, तरी महाभारतासारख्या अति लोकप्रिय ग्रंथाचा उल्लेख का नाही याचाही आता खुलासा होतो. महाभारताची रचनाच नंतर झाली असेल, तर मेगॅस्थनीसनें त्याचा उल्लेख न करणे स्वाभाविकच आहे.

---

✻१ 'MahaBHarata - a Criticism, Page 11. मात्र 'यवन' आदि शब्दांचा 'ग्रीकांशी' संबंध न लावता भारतवर्षातील कोणा एकाद्या जमातीशी जोडला, तरी महाभारतातील ज्योतिषीय वचनांवर आधारित माझ्या मुख्य कालगणनात्मक विवेचनाला बाधा येणार नाही.

✻२ H.W. Rawlinson,'Intercourse between India and the Western World', p.172

✻३ Hopkins,'The Great Epic of India,' p.372

✻४ Hopkins, उक्त p.393

✻५ H.W. Rawlinson, उक्त



महाभारताचा सर्वप्रथम उल्लेख इ. सनाच्या प्रथम शतकाच्या शेवटी ग्रीक प्रवासी विद्वान Dion Chrysostom च्या उद्गारात सापडतो असे म्हणतात (पाहा Columbia Encyclopedia). अलेक्झांड्रिया शहराच्या बाजारात त्याची काही भारतीय व्यापाऱ्यांशी भेट झाली होती (Rawlinson, उक्त, pages 140-141). पण त्याने इतकेच म्हटले आहे की, भारतीय लोक ग्रीक महाकवी होमरचे काव्य गात असतात. वेबर व अन्य लेखक यांत महाभारताचा उल्लेख पाहतात, तर जॅकोबीला तें होमरचेच भारतीय भाषांतर असले असे वाटते. (पाहा Wintenitz 'A History of Indian Literature' Eng Transtation part II, p. 408). पण ते काहीही असेल तरी तो उल्लेख फार संदिग्ध आहे. तो सोहळा तर महाभारताचा सर्वप्रथम स्पष्ट उल्लेख गुप्त सम्राटकालीन एका ताम्रपटात आढळतो. त्याचा काळ इ.स. ४४५ मानला गेला आहे. त्यांत 'शतसाहस्त्रम् संहितायां' (एक लक्ष श्लोकांच्या संहितेतील) असे शब्द आहेत.✻१

महाभारतात फक्त नक्षत्रांचा उल्लेख आहे. बारा राशींचा व सात वारांचा नाही. या दोन्ही गोष्टी भारतवर्षात नंतर प्रचारात आल्या. भारतीय राशींची नांवे युरोपीय नावांशी तंतोतंत जुळतात.

याशिवाय असे की, या महाकाव्यात श्रीकृष्णांचे वर्णन त्यातील घटनाक्रमात महत्त्वपूर्ण भाग घेणारे एक मानवी व्यक्तित्व इतक्याच स्वरूपात नसून, विश्वाचा निर्माता, रक्षक व संहारकर्ता या स्वरुपातही केले आहे. एखादे व्यक्तित्त्व सामाजिक धारणेत अशा विश्वेश्वरस्वरुप पातळीवर पोचण्यास दीर्घ कालावधी लोटणें आवश्यक आहे. योगी अरविंद म्हणतात, "महाभारतात श्रीकृष्णाला एक ऐतिहासिक व्यक्ती व अवतार या उभय स्वरूपात चित्रीत केले आहे म्हणून 'भारत' चे पुरातन कथानक, काव्य अथवा परंपरा यांना वर्तमान स्वरुप प्राप्त होण्याच्या कालापावेतो म्हणजे इ.स. पूर्व पाचव्या शतकापासून प्रथम शतकाच्या दरम्यान श्रीकृष्णाची भक्ती व अवतारित्व उत्तम रीतीने प्रस्थापित झाले असले पाहिजे"✻२ हे कोणा समकालीनाने केलेले वर्णन असू शकत नाही.

महाभारतात काही अभ्यासक बौद्ध व जैन धर्माचेही स्पष्ट वा अस्पष्ट

---

✻१ पाहा 'Inscriptionum Indicarum', Vol III p. 134; 'Indian Antiquary', XVII, p.215, XIX pages 227 ff; दीक्षित, पूर्व उल्लेखित, पृ. १०८

✻२ 'Essay on the Gita', First Series, Essay II. (मराठी भाषांतर माझे).

उल्लेख पाहतात*१ त्याचीही संगती महाभारताच्या वर सांगितलेल्या रचनाकालाने लागते. तसेच, या महाकाव्यात एका अति कर्मठ आत्मविभाजनकारी झालेल्या समाजपद्धतीच्या विरुद्ध उदार सामाजिक व्यवस्थेचा पुरस्कार का आढळतो, हेही या रचनाकालाच्या आधारे समजू शकते. महाभारतात व त्यात मध्यवर्ती स्थान असलेल्या गीतोपदेशात, आपल्यास चातुर्वर्ण्यविषयक उदार दृष्टिकोन, तथाकथित उच्चवर्णीयांच्या वृथाहंकाराचा निषेध, आणि सामाजिक व अध्यामिक क्षेत्रात व्यापक समानतेचा संदेश आढळून येतो.*२

या अशा अनेक बाबींचा विचार करून काही विद्वानांनी वर्तमान महाभारताचा रचनाकाल खिस्तपूर्व (किंवा खिस्तोत्तर) काही थोड्या शतकांचा अनुमानित केला होता. पण त्यांनी ज्योतिषीय प्रमाणांचा विचार केला नव्हता, आणि त्यांचे अनुमान मूळ महाभारताच्या विस्तारासाठी सीमित होते.

**वर्तमान महाभारत कोणी रचले?**

आता हे स्पष्ट होईल की वर्तमान उपलब्ध महाभारताची रचना कौरव - पांडवांचे आजोबा व समकालीन महर्षी कृष्णद्वैपायन व्यासांची नसावी. ते स्वतः यातील सर्व घटनाक्रमात एक महत्त्वपूर्ण पात्र असूनही त्यांचा उल्लेख सर्वत्र तृतीय पुरुषात आला आहे. काही स्थळी तर त्यांना 'भगवान व्यास' असेही म्हटले आहे. याशिवाय महाभारतात अनेक स्थळी सत्यवती, कुंती, द्रौपदी, सुभद्रा आदि स्त्रियांची ज्या प्रकारे वर्णने आली आहेत, तशी कोणी आजोबा, तो कितीही मोठा कवी असला तरी, आपल्याच कुलातील लहान-मोठ्या स्त्रियांची करणार नाही. आणि येथे हेही उल्लेखनीय आहे की, तैत्तिरीय आरण्यकात व्यास व वैशंपायन यांचा उल्लेख आहे, पण त्यात महाभारताचा निर्देश नाही.

या महाकाव्याच्या कर्त्याने यातील प्रमुख प्रसंग काही पुरातन रचना,

*१ C.V. Vaidya 'Mahabharata -a Criticism', Page II; Sengupta, उक्त Page 1 : टिळक 'गीतारहस्य', पृ. ५५६, ५७३

*२ महाभारत व गीता यांचा हा उदार दृष्टिकोण मी Ethics of the Gita पुस्तकात दाखविला आहे. द्वारकादास हर्ष लिहितात, महाभारत "उत्तरवैदिक कालीन प्रारंभिक ब्राह्मण कट्टरता के विरुद्ध मानव - धर्म का क्रान्तिकारी जयघोष है, परंपरा की वह कट्टरता जो बहुसंख्यक शुद्रों और स्त्रियों को वेदाध्ययन का अधिकार प्रदान नही करती। उन लाखों - करोडों नरनारियों के लिये, जो अनुदारवादी वेदपंथियों की अवज्ञा के शिकार थे, महाभारत नया वेद बनकर आया" ("महाभारत का अर्थ" पृ. १२).



दंतकथा आदीवरून घेतले असतील. छांदोग्य उपनिषदासारख्या काही प्राचीन ग्रंथात श्रीकृष्णांचा उल्लेख आढळतो. सुरवातीच्या बोद्ध साहित्यात महाभारताचा उल्लेख नसला, तरी कौरव-पांडव कथेचा संदिग्ध व कोठे कोठे विपर्यस्त उल्लेख आढळतो. पाणिनीच्या व्याकरणात 'महाभारत' शब्द आला आहे, पण तो महाभारत काव्यासाठीच आहे असे नाही, असे चिं. वि. वैद्य (वेबरचा आधार घेऊन) म्हणतात.* सांख्यायन श्रौत सूत्रात (४-१६) कुरुक्षेत्रावरील युद्धाचा उल्लेख असून कौरवांचा पराजय दाखवला आहे. उपलब्ध प्राचीन भारतीय साहित्यात हा त्या घटनेचा प्रथम उल्लेख मानला जातो. हेही संभव आहे की, कौरव- पांडव कथेची व्यासांच्या नावांवर एखादी लहानशी गद्य किंवा पद्य रचना विशेष रूपाने प्रचलित असेल. वर्तमान महाभारतात क्वचित अतिप्राचीन गद्यांश मधूनमधून आढळतो, तो व्यासांच्या मूळ रचनेतून उद्धृत केलेला असू शकेल. आणि त्या रचनेत वनवासारंभ तिथी, युद्धारंभ तिथी आदि काही मूलभूत तिथ्यांचा उल्लेख असू शकेल. पण एक लक्ष श्लोकांचे हे प्रचंड महाकाव्य (कोठे कोठे आढळणारे तुरळक प्रक्षिप्त श्लोक सोडून) एकंदरीत कुरुक्षेत्र युद्धानंतर कित्येक शतकांनी होऊन गेलेल्या कोणा महापंडिताने केलेले दिसते. आणि त्या पुरातन घटनेला एका तपशीलवार ऐतिहासिक कथानकाचे रूप देताना, या महाकवीला कित्येक शतकांपूर्वीची प्रत्यक्ष आकाशस्थ ग्रहस्थिती संपूर्ण ज्ञात होणे उघडच संभव नसल्याने, त्याने स्वतःच्या माहितीतली ग्रहस्थिती जोडली असली पाहिजे.

**निरयन कालगणना**

वर मी वर्तमानसमयी सूर्याचा मूळ नक्षत्रात प्रवेश १५ डिसेंबरला दाखविला आहे. पण निरयन पद्धतीच्या पंचांगात तो चार दिवस अगोदर दाखविला जातो. याने आपल्या निष्कर्षावर काय प्रभाव पडेल?

याचा अर्थ असा होईल की, उत्तरायणप्रारंभी सूर्याचे मूळ नक्षत्रात गेलेले दिवस चार अधिक मोजावे लागतील, व तो त्या नक्षत्रात तोपावेतो थोडाअधिक पुढे गेलेला असेल; म्हणजेच उत्तराधप्रारंभीचे त्याचे स्थान तितके कमी मागे सरकलेले असेल. म्हणून मूळ नक्षत्रात ते स्थान मागे सरकण्यासाठी आता ४६० ऐवजी १७७ (१७५) वर्षे धरावी लागतील; व एकूण वर्षसंख्या २५८ कमी (म्हणजे अलीकडे) येऊन, महाभारतातील उत्तरायणप्रारंभाचा काळ इ.स.

* 'Mahabharata -a Criticism', page 5; 'Cambridge History of India 'Vol I, pages 252-253 मध्येही असे मत व्यक्त केले आहे.

च्या तृतीय शतकाच्या मध्याच्या सुमारास येईल. या गणनेप्रमाणे उत्तरायण प्रारंभीच्या सूर्याच्या स्थानाचे कालखंड असे होतील. धनिष्ठा इ.स. पूर्व २०४५ ते इ.स. १०९०; श्रवण - इ.स. पूर्व १०९० ते इ.स. पूर्व १३५; उत्तराषाढा - इ.स. पूर्व १३५ ते इ.स.८२०; पूर्वाषाढा इ.स.८२० ते इ.स. १७७५; आणि मूळ इ.स.१७७५ ते इ.स.२७३०.

ही गणनाही हिप्पार्कसच्या विधानाशी जुळते. यात सुमारे इ.स. १२५ मध्ये उत्तरायणप्रारंभी सूर्य उत्तराषाढेच्या सीमेवर (श्रवणाच्या दिशेने) येतो, व नंतरच्या तीन महिन्यांत (वसंतसंपातापावेतो) तो (साडेतेरा दिवसात एक नक्षत्र याप्रमाणे) रेवती पार करून अश्विनीच्या उत्तरार्धात असेल.

ही गणना वराहमिहिरांच्या वचनाशी अधिक चांगली जुळते. यात उत्तरायणप्रारंभीचा सूर्य इ. स. पूर्व १३५ ते इ. स. १०५ पावेतो उत्तराषाढेच्या चतुर्थ चरणात, इ.स. ३४४ पावेतो तिसऱ्या चरणांत व नंतर इ.स.५८३ पावेतो द्वितीय चरणांत (म्हणजे वराहमिहिरांनी म्हटल्याप्रमाणें मकर राशीच्या प्रारंभी) असेल.

मात्र ही गणना Kohl व दीक्षित यांच्या विधानांशी जुळत नाही. आणि त्याशिवाय, स्वतः टिळकांनी इ.स. पूर्व पाचवे शतक हा उत्तरायणप्रारंभ श्रवणारंभी होण्याचा काळ मानला आहे ('गीतारहस्य', पृ. ५५७). हें Kohl आणि दीक्षित यांचेही म्हणणें असून तें वरील दुसऱ्या कोष्टकाशी जमत नाही. तसेच महाभारताची रचना इ. सनाच्या तिसऱ्या शतकाइतकी अलीकडची मानणे कितपत सयुक्तिक होईल याचाही विचार करावा लागेल.

**माघ पौर्णिमा आणि उत्तरायण प्रारंभ**

उत्तरायणप्रारंभी सूर्य उत्तराषाढेत होता यावरून जसा एक विशिष्ट कालखंड दिग्दर्शित होतो, त्याप्रमाणे महाभारतातील उत्तरायण (भीष्मनिधन समयी) माघ पौर्णिमेस प्रारंभ झाले, यावरूनही काही कालनिर्णय संभव आहे काय?

उत्तरायणप्रारंभाच्या तिथ्यांचा विशिष्ट ऐतिहासिक कालखंडाशी तसा निश्चित संबंध नाही. उत्तरायणप्रारंभाची तिथी यावर्षी एक तर पुढील वर्षी दुसरी असू शकेल. प्रदीर्घ कालानंतर उत्तरायणप्रारंभाच्या तिथ्याही मागे सरकतात, पण अगदी क्रमशः नव्हे; आणि एखाद्या तिथीपासून उत्तरायणप्रारंभ पूर्ण सरकून जाण्याचा कालावधी फार मोठा असतो. याअनुसार उत्तरायणप्रारंभी (वर्तमान समयी होते त्याप्रमाणे) सूर्य मूळनक्षत्रात असणे माघ पौर्णिमेस शक्य नाही. कारण पौर्णिमेस सूर्यचन्द्रात अर्ध नक्षत्रमंडलाचे अंतर असते; आणि सूर्य



मूळ नक्षत्रात असल्यास माघ पौर्णिमेस चन्द्र त्याच्यापासून अर्धनक्षत्रमंडळ अंतरावर असू शकणार नाही. त्या पौर्णिमेस चन्द्र मघात किंवा मागे आश्लेषा पुष्यात, अथवा पुढे पूर्वा-उत्तरा फाल्गुनीत असू शकेल. हे पाहता चन्द्रापासून अर्ध नक्षत्रमंडळ दूर असण्यासाठी सूर्य त्या पौर्णिमेस उत्तराषाढा, श्रवण, धनिष्ठा, शततारका (अथवा पुढे भाद्रपदा) नक्षत्रात असू शकतो. या प्रमाणे माघ पौर्णिमेस उत्तरायण प्रारंभ होण्याचा संभव स्थूल मानाने इ.स. पूर्व ३२८५ (२३३०+ ९५५) पासून थेट इ.स. ५३५ पावेतो असू शकतो. आणि चन्द्र फाल्गुनी नक्षत्रात आणि सूर्य भाद्रपदा नक्षत्रात मानल्यास तो काळ आणखी प्राचीन होऊ शकतो. सारांश, माघ पौर्णिमेवर उत्तरायण प्रारंभ महाभारताच्या रचनाकाली व तत्पूर्वी महाभारत युद्धकालीही संभव होता.

**एका विशेष प्रश्नाचे उत्तर**

येथे आणखी एक खुलासा इष्ट होईल. महाभारतकाराने कौरव- पांडवांचे युद्ध वर्णन करताना त्यात स्वतःच्या वेळची ग्रहस्थिती घालणे कितपत उचित होते? सूर्य, चन्द्र, मंगळ, गुरू आदींची स्थाने काही वर्षानंतर पुनः तीच येतात, आणि म्हणून महाकवीने स्वतःच्या वेळची ती ग्रहस्थिती युद्धवर्णनात जोडण्यात असंभवता नव्हती. आणि माघ पौर्णिमेस उत्तरायणप्रारंभ देखील प्रत्यक्ष युद्धकालातही संभव होता हे वर पाहिले आहे. पण उत्तरायणप्रारंभी सूर्याचे उत्तराषाढेच्या मध्यातील स्थान (अयनचलनाच्या नियमानुसार) २६५०० वर्षांनी पुनः येते आणि म्हणून ते महाभारत युद्धसमयी संभव नव्हते, त्याचे काय? याचे उत्तर असे की, अयनचलनाचा तो नियम भारतवर्षात वरहमिहिरांच्या काळापावेतोही माहीत नव्हता (पाहा चिं. वि. वैद्य, मराठी, पू. उ. पृ. १२१, व गोरखप्रसाद, पू. उ., पृ.११० ); मग महाभारताच्या रचनाकाळी तो माहीत नव्हता हे सांगणेच नको, म्हणून सूर्याच्या उत्तराषाढेतील त्या स्थानाभोवती आपले कालगणनात्मक व ज्योतिषात्मक कूटजाल विणण्यास महाभारतकारांना हरकत वाटली नाही. उलट, त्यामुळे आज आपल्यास या महापंडिताचा, आणि त्याने केलेल्या या अद्वितीय महाकाव्याच्या रचनेचा, काळ सापडू शकतो हा मोठाच लाभ होय! नाही तरी, दीक्षित, टिळक आदि जे महाभारतातील उत्तरायणप्रारंभ श्रवणारंभी मानू चाहतात, त्यांनाही ही स्थिती महाभारत युद्धकाली संभव नव्हती हे मान्य करणे भाग आहे; कारण उत्तरायण प्रारंभी सूर्य श्रवणारंभी असण्याचा कालखंड खिस्तपूर्व चौथे- पांचवे शतक असून, इतक्या अलीकडे महाभारत युद्ध मानणे अशक्य आहे.

**एक लक्ष श्लोक एकाच महाकवीचे**

एक लक्ष श्लोकांच्या प्रचंड महाभारताचा मूळ कर्ता कोणीही असो; पण हे संपूर्ण महाकाव्य एकाच कर्त्याने रचले आहे, हे त्यातील श्लोकांवरून स्पष्ट आहे. पण त्यातील कूटस्थलांमुळे भ्रमित होऊन अनेकांना वाटते की, हे महाकाव्य भिन्न कर्त्यांच्या वेगवेगळ्या रचनांनी एक खिचडी आहे.

यासंबंधात प्रचलित धारणा अशी आहे की, हे काव्य महर्षि कृष्णद्वैपायन व्यासांनी प्रथम सुमारे आठ हजार श्लोकांत 'जय' नांवाने रचले; नंतर त्यांचा शिष्य वैशंपायन याने त्यात भर टाकून चोवीस हजार श्लोकांचे 'भारत' तयार केले, व ते पांडवांचा पणतू राजा जनमेजय याला कथन केले; आणि शेवटी लोमहर्षपणपुत्र सौति उग्रश्रवा या पुराणिकाने त्यात पुनः आपली हजारो श्लोकांची भर टाकून एक लक्ष श्लोकांचे वर्तमान 'महाभारत' रचले, व शौनकास नैमिषारण्यात कथन केले. ही धारणा श्री. चिं. वि. वैद्य यांनी 'महाभारताचा उपसंहार' पुस्तकात (पृ.५) अशी व्यक्त केली आहे. "जरी ही सर्व रचना व्यासांचीच आहे हा समज सर्वत्र प्रचलित आहे, तरी तो लक्षणेनेच घेतला पाहिजे, म्हणजे उपपत्ती बसते. वैशंपायन किंवा सौति यांनी जे वर्णन केले किंवा भाग वाढविले, ते व्यासांच्याच प्रेरणेने व त्यांच्याच मतास धरून असे मानून एक लक्ष श्लोकांचे कर्तृत्व व्यास महर्षीकडे दिले असता चालेल. वस्तुतः महाभारताचे कर्ते व्यास, वैशंपायन व सौति असे तिघे होते, असेच कबूल करावे लागते." ही धारणा 'हिंदी विश्वकोश' (खंड ९) मधे अशी व्यक्त केली आहे, "महाभारत ......की मूल रचना कृष्ण द्वैपायन व्यास ने जय नाम से चौबीस सहस्त्र लोकों में की थी ..... कुछ श्लोक अपनी ओर से मिलाकर व्यासशिष्य वैशंपायन ने जनमेजय के सर्पसत्र में 'भारत' नाम से जय काव्य को लोकविश्रुत किया और अनेक उपाख्यान जोडकर सौतिउग्रश्रवा ने भारत को महाभारत का वर्तमान तथा अंतिम स्वरूप दिया। ... वस्तुतः व्यास, वैशंपायन और सौति इसके तीन रचियाता होनेपर भी व्यास के मूल प्रयोजन, सिद्धान्त और वर्णन शैली में स्वारस्य बने रहने के कारण व्यास को ही महाभारतकार माननेकी परंपरा अयथार्थ नही है।"

या तिघांपैकी व्यास पांडवांचे सुरुपासून अखेरपावतो समकालीन होते. वैशंपायनही पांडवांचे निदान काही काळ समकालीन असावे असे महाभारतातील काही उल्लेखांवरून दिसते. सौतीच्या कालाविषयी घोटाळा आहे. महाभारताच्या आदिपर्वात सुरवातीस सौतीचे म्हणून एक वचन आहे (अध्याय १ श्लोक ९,१०,११), त्याचा आशय श्री वैद्य असा देतात की, सौतीने ही महाभारत कथा



'सर्पसत्राच्या वेळी वैशंपायनाच्या तोंडून ऐकली' होती. याअनुसार, सौती वैशंपायनाचा समकालीन ठरतो. परंतु उपलब्ध महाभारतात ग्रीक, यवन आदींचे काही असे उल्लेख आहेत की जे अलेक्झांडरच्या भारतावरील स्वारीनंतरचे असले पाहिजेत. म्हणून वैद्य म्हणतात, "निष्कर्ष असा की, हल्लीचे महाभारत इ.स. पूर्व ३२० पासून २०० पर्यंत अस्तित्वात आले ..... हाच निर्णय इतर कित्येक ग्रंथकारांना मान्य आहे" (उक्त वृ.४८). आणि याबरोबरच सौतीने वाढविलेले महाभारत हेच उपलब्ध महाभारत होय अशी वैद्यांची धारणा असल्याने, ते म्हणतात,"हा सौति वैशंपायनाचा समकालीन नव्हता, असे या ग्रंथाच्या कालनिर्णयावरून ठरते," व म्हणून आदिपर्वाच्या सुरुवातीस आलेले सौतीचे ते वचन "लाक्षणिक किंवा अतिशयोक्तीचे" असून "सौति व वैशंपायन यामध्ये हजारो, निदान शेकडो वर्षाचे अंतर असले पाहिजे" (उक्त पृष्ठ ९-१०) आता या धारणेचे परीक्षण करू.

महाभारतात सर्वत्र कथाकथनाची, प्रसंगवर्णनाची, संवादोपसंवादांची, व्यक्तिचित्रणांची जी सुसंगत शैली आहे ती पाहता, या संपूर्ण महाकाव्याची रचना एकाच कर्त्याची असली पाहिजे. अन्यथा त्यात इतकी एकरूपता आली नसती. आणि एकवेळ व्यास व वैशंपायन यांच्या शैलीत असे साम्य संभव मानले, तरी 'हजारो, निदान शेकडो' वर्षानंतर लिहिणाऱ्या सौतीच्या व व्यास - वैशंपायनाच्या शैलीत अशी एकरूपता कशी संभव होती?

आणि वेदविस्तारकर्ते म्हणून भारतवर्षात प्रसिद्ध आणि परम आदरणीय अशा महर्षि व्यासांच्या रचनेत वैशंपायनाने भर टाकावी, इतकेच नव्हे तर पुनः सौती नावाच्या कोणा पुराणिकाने त्यात आणखी विस्तृत भर घालावी, आणि या सुसंस्कृत, विशाल देशातील सर्व विद्वान, ग्रंथालये, विद्यालये, आश्रम, मंदिरे आदींनी त्याला मान्यता देऊन आपल्या संग्रहातील महाभारताच्या पोथ्यांचे पुनर्लेखन करून घेत जावे, ही सारी कल्पना विलक्षण व असंभव आहे. याउलट महाभारतातच म्हटले आहे की, व्यासांच्या आदेशाने व त्यांच्या समक्ष वैशंपायनाने व्यासांचीच रचना जनमेजयास कथन केली (आदिपर्व अध्याय ६० व ६२, शांतिपर्व अध्याय ३४३). आणि जे वैशंपायनाने जनमेजयास ऐकविले होते, तेच सौतीने शौनकास कथन केले (आदिपर्व अध्याय १). खरे म्हणजे, महाभारतातील गहन कूटांचा उलगडा होता नव्हता म्हणून अभ्यासकांना या ग्रंथात परस्पर विसंगती भासून, यात तीन भिन्न रचनांचे मिश्रण असण्याचा भ्रम होत होता. आता या कूटस्थळांचा सुसंगत उलगडा झाला असल्याने महाभारताचे तीन कर्ते गृहीत धरण्याची आवश्यकता उरली नाही. आणि याचे

असे भिन्नकालीन कर्ते असते, तर ही कूटे अशा प्रकारे त्यात घातली गेली नसती, व घातली असती तर इतक्या दीर्घकाळ गुप्त राहिली नसती.

पण उपलब्ध महाभारत एकाच महाकवीची रचना मानली, तरी तो कर्ता सौति उग्रश्रवा का म्हणू नये? याचे एक उत्तर असे की, तो सौति शोनकांकडे गेला व त्याने शौनकास हे सर्व महाभारत कथन केले हें स्वतः सौतिने यात सांगितले नसून आणखी कोणी सांगत आहे! म्हणजे हें लिहिणारा व त्या संदर्भात संपूर्ण सौति-शौनक संवाद श्लोकबद्ध करणारा हा कोणी आणखी वेगळाच लेखक असला पाहिजे. एका श्लोकांत (आदिपर्व १-७) सौतीला 'कमलपत्राक्ष' म्हटले आहे. स्वतः सौतीने ते लिहिले असेल काय?

अशा प्रकारे वर्तमान महाभारत महर्षि कृष्णद्वैपायन व्यास, वैशंपायन व सौति यांपैकी कोणाचे नसून, त्याची रचना इ.स. पूर्व प्रथम शतकाचे सुमारास (विक्रम संवत सुरू होण्याच्या कालखंडात) कोणा महापंडिताने केली असली पाहिजे. त्याने अतीव बुद्धिपूर्वक यात कौरव- पांडव कथेच्या पुरातन संदर्भात अनेकानेक विषयांवर उपकथांचे जाळे विणून, एकूण रचनेला प्रथम वैशंपायन-जनमेजय संवादाचे, व शेवटी त्यालाही सौति-शौनक संवादाचे वेष्टण दिले, आणि तत्कालीन भारतीय संस्कृतीचा हा महाकोश निर्माण केला! आणि याबरोबर त्याने यात गहन कूटेही करून ठेवली, जी मूलतः संपूर्ण सुसंगत अशा या महाकाव्यांत विसंगतीचे आभास निर्माण करून विद्वानांना भ्रमांत टाकत आलीं आहेत! आणि या महाकाव्यात सर्वोच्च कळस म्हणून गीतासंवादही समाविष्ट केल्यावर, त्या महाभारतकाराने आपली ही कृती पूर्ण निष्काम व निरहंकार वृत्तीने कौरवपांडव इतिहासाचे आद्य कथाकार मानले गेलेले महर्षि कृष्णद्वैपायन व्यास यांचे चरणी वाहून दिली ! मात्र केवळ महाभारताचेच नव्हे, तर प्राचीन भारतीय अन्यही अशा काही ग्रंथांचे कर्तृत्व त्या महर्षि व्यासांकडे दिले जाते हे प्रसिद्धच आहे.

आतां या साऱ्या संदर्भात महाभारताच्या कूटांनी भ्रमित Winternitz नामक पाश्चिमात्य विद्वानानें महाभारतकाराविषयीं काढलेले हे विपर्यस्त उद्‌गार पाहा-

'In truth he who would believe with the orthodox Hindus and the above mentioned Western scholars, that our Mahabharata, in its present form, is the work of one single man, would be forced to the conclusion that this man was, at one and the same time, a great poet and a wretched



scribbler, a sage and an idiot, a talented artist and ridiculous pedant.' (पूर्व उल्लेखित, vol I part II pages 404-405). यांनी असेही म्हटले आहे की, 'Oldenberg (Das Mahabharata p.३२) calls it a 'scientific monstrocity' to suppose that the Mahabharata was a unified composition.'

वर्तमान महाभारत अनेक कवींच्या रचनांची विसंगत खिचडी आहे अशा प्रतिपादनाचा आणखी एक प्रयास, त्यांतील श्लोकपंक्तींची अक्षर संख्या व अक्षरांचे लघु-दीर्घ रूप यांच्या आधारे "The Mahabharata- Its Genesis and Growth (A Statistical Study)" by M.Y. Yardi या पुस्तकांत केला गेला आहे. मूळ महाभारताचा प्रथम कर्ता वैशंपायन असून, नंतर त्यांत सूत, त्याचा पुत्र सौति, हरिवंशकार व पर्वसंग्रहकार हे चार जण आपापली भर टाकत गेले असे अनुमान यांत केले आहे. या तर्काला माझ्या आतापावेतोच्या विवंचनात पर्याप्त उत्तर आढळून येईल. आणि, कोणा एका महाकवीला वेगवेगळ्या संदर्भात काहीशीं निरनिराळी श्लोकरचना करणें असंभव आहे काय? हे असंभव नसल्याचे हे लेखकच आपल्या Introduction मध्यें मान्य करतात. आणि या पुस्तकाला Foreword लिहिणारे डॉ. दांडेकर म्हणतात, 'Shri M. R. Yardi seeks to trace the whole history of the emergence of the Great Epic by means of statistical analysis of the' 'anustubh' style. I do not wish to preempt any judgement regarding his methodology and results.'*

**महाभारतातील श्लोकांचे प्रमाण**

हे महाकाव्य याच्या कर्त्याने प्रथमपासूनच एक लक्ष श्लोकांचे रचले असून याला भारत व महाभारत ही दोन्ही नांवे होती, यासंबंधात महाभारतातील श्लोकांचे प्रमाण पाहा. नंतर यातील उपकथा गाळून विद्यार्थ्यांच्या सोयीसाठी याची एक लहान आवृत्ती तयार करण्यात आली. प्रथम लहान रचना करून मागाहून कोणी तिचा एक लक्ष श्लोकांत विस्तार केला असे नव्हे. या काव्यात वर्णिलेले प्रमुख विषय निर्दिष्ट करून आदिपर्वाच्या प्रारंभी सौतीच्या तोंडी

* श्री यार्दींच्या अनुसार वैशंपायनाच्या मूळ महाभारतात द्यूतसमयी दुःशासन द्वारा द्रौपदी वस्त्रहरण, व वनवासांत जयद्रथ द्वारा द्रौपदीच्या अपहरणाचा प्रयास हे प्रसंग नव्हते; परंतु भीमाने दुःशासन वधात व दुर्योधनवधांत केलेल्या 'रानटी' अत्याचारांचे, आणि अर्जुनाने सूर्यास्तानंतर अन्यायपूर्वक केलेल्या जयद्रथवधाचे, समर्थन दाखविण्यासाठी नंतरच्या लेखकाने कौरवांविरुद्ध ते दोन प्रसंग महाभारताच्या पोथीत घुसडून दिले.

पुढील वचन आले आहे.

**इदं शतसहस्रं तु श्लोकानां पुण्यकर्मणाम्।। आदिपर्व १-१०१**
**उपाख्यानैः सह ज्ञेयमाद्यं भारतमुत्तमम्**
**चतुर्विंशतिसाहस्त्री चक्रे भारतसंहिताम्।।१०२**
**उपाख्यानैर्विना तावत् भारतं प्राच्यते बुधैः**
**ततोप्यर्धशतं भूयः संक्षेपं कृतवानृषिः।।१०३**
**अनुक्रमिणकाध्यायं वृत्तान्तं सर्वपर्वणाम्**
**इदं द्वैपायनः पूर्वं पुत्रध्यापयच्छुकम्।।१०४**
**ततोऽन्येभ्यो ऽ नुरूपेभ्यः शिष्येभ्यः प्रददौ विभुः।।१०५**
**... अस्मिन्स्तु मानुषे लोके वैशंपायन उक्तवान्।।१०८**
**शिष्यो व्यासस्य धर्मात्मा सर्ववेदविदां वरः**
**एकं शतसहस्रं तु मयोक्तं वै निबोधत।।१०९**

"पुण्यकर्मा व्यक्तींच्या (चारित्रांना वर्णन करणाऱ्या) या लक्ष श्लोकांना (त्यातील) उपाख्यानांसह, श्रेष्ठ 'आद्य भारत' म्हणतात. त्यानंतर उपाख्याने वगळून (त्याच्या कर्त्याने) चोवीस हजार भारत संहिता तयार केली, विद्वान तिला (आद्यभारतापासून वेगळे दाखविण्यासाठी) 'भारत' म्हणतात; आणि त्यानंतर (त्याच्या रचयित्या) ऋषीने पुनः (आणखी) संक्षेप करून सर्व पर्वांचा सारांश स्वरूप दीडशे श्लोकांचा एक अनुक्रमणिकाध्याय तयार केला. (महर्षि) द्वैपायनांनी हे (महाकाव्य) प्रथम आपला पुत्र शुकास शिकविले; आणि नंतर भगवान व्यासांनी अन्य सुयोग्य शिष्यांना शिकविले ....या मनुष्यलोकी व्यासशिष्य, संपूर्ण वेदज्ञांत श्रेष्ठ, धर्मात्मा वैशंपायनाने याचा (जनमेजयास कथन करून) प्रचार केला. ते लक्ष श्लोकांचे काव्य मी तुम्हांला सांगतो, श्रवण करा."

भांडारकर शोध संस्थेने यात जेथे जेथे 'शतसहस्त्र' चा उल्लेख आला आहे त्या ओळी गाळून टाकल्या. पहिल्या दोन ओळी गाळल्याने असा भ्रम होतो की, या काव्याची प्रथम रचना 'उपाख्यानैर्विना' चोवीस हजार श्लोकांची होती, व नंतर ती वाढवून एक लक्ष श्लोकांची केली गेली. पण वस्तुतः एक लक्षांचे 'आद्य भारत' होते आणि त्याचा संक्षेप करून चोवीस हजारांची संक्षिप्त आवृत्ती अध्ययनाच्या सोयीसाठी केली गेली. आदिपर्वात 'व्यास' रचित एक तक्ष श्लोकांच्या रचनेचा पुढे आणखीही उल्लेख असून ते श्लोक भांडारकर संस्थेने स्वीकारले आहेत. वैशंपायनांनी कौरव - पांडव कथेचा प्रथम अतिसंक्षिप्त सारांश सांगितल्यावर जनमेजयांनी म्हटले की. मी 'महाभारत आख्यान' संपूर्ण ऐकू चाहतो (६२-१,२). आणि यावर वैशंपायनांनी म्हटले,



**महर्षेः सर्व लोकेषु पूजितस्य महात्मनः**
**प्रवक्ष्यामि मतं कृत्स्नं व्यासस्यामिततेजसः।।आदिपर्व ६२-१३**
**इदं शतसहस्रं हि श्लोकानां पुण्यकर्मणाम्**
**सत्यवत्यात्मजेनेह व्याख्यातममितौजसा।।१४**
**...जयो नामेतिहासोऽयं श्रोतव्यो विजिगीषुणा।।२०**

"सर्व लोकांत पूजनीय, महात्मा, असीम तेजस्वी, महर्षि व्यासांचे संपूर्ण प्रतिपादन मी आता सांगतो-१३. अत्यंत प्रभावसंपन्न सत्यवतीपुत्र व्यासांनी पुण्यकर्मा व्यक्तींची ही कथा एक लक्ष श्लोकांत सांगितली आहे-१४... हा 'जय' नामक इतिहास विजयेच्छु व्यक्तींनी अवश्य ऐकावा २०". यात एक लक्ष श्लोकांचे कर्तृत्व 'व्यास' महर्षीकडे दिले असून यालाच वैशंपायन 'जय' व जनमेजय 'महाभारत' म्हणत आहेत. असे नव्हे की, वैशंपायनानंतर या रचनेला वर्तमान 'महाभारत' स्वरूप प्राप्त झाले.

या अध्यायात वैशंपायन आणखी म्हणतात-

**त्रिभिर्वर्षैः सदोत्थायी कृष्णद्वैपायनो मुनिः**
**महाभारतमाख्यानं कृतवानिदमद्भुतम्।।६२- ५२**

"कृष्णद्वैपायन मुनींनी रोज (प्रातः काळी) उठून हे अद्भुत महाभारतआख्यान तीन वर्षांत रचले.' तीन वर्षे म्हणजे १०९५ दिवस; आणि त्यांत कमी करून एक हजार कार्य दिवस मोजले तरी, रोज सरासरी शंभर श्लोक सरळ अनुष्टुप छंदात (आणि त्यातही अनेक उपकथा पुराणादि अन्य ग्रंथातून उद्धृत करून) रचणे एका प्रतिभासंपन्न महाकवीला काय कठीण होते? आणि जर त्या महाकवीची मूळ रचना केवळ आठ हजार श्लोकांचीच असती तर ती तीन वर्षात केली हे सांगण्यात काय विशेषता होती?

आदिपर्वात शौनक सौतीला म्हणतात.

**महाभारतमाख्यानं पाण्डवानां यशस्करम्**
**जनमेजयेन पृष्ठः सन् कृष्णद्वैपायनस्तदा।। आदिपर्व ५९-६**
**श्रावयामास विधिवत् तदा कर्मान्तरे तु सः**
**तामहं विधिवत् पुण्याम् श्रोतुमिच्छामि वै कथाम्।।७**

"पांडवांचे यश वर्णन करणारे महाभारत आख्यान जनमेजयाने विचारल्यावरून कृष्णद्वैपायनांनी (सर्पयज्ञात) धार्मिक कर्मांमधील विश्रामसमयी (वैशंपायनाच्या द्वारे) त्याला क्रमवार ऐकविले, ती पुण्यमयी कथा मी क्रमवार ऐकू इच्छितो.' यावर सौतीने उत्तर दिले -

**हन्त ते कथयिष्यामि महदाख्यानमुत्तमम्**

**कृष्णद्वैपायनमतं महाभारतमादितः।।५९-९**

"ठीक आहे, कृष्णद्वैपायन रचित महाभारत नामक श्रेष्ठ महान आख्यान मी आता तुम्हाला आरंभापासून सांगतो." येथे शौनक व सौती दोघेही व्यासोक्त रचनेला महाभारत म्हणत आहेत. तसेच आपल्याकडून ऐकलेली कौरव-पांडव कथा जनमेजयास सांगण्याचा आदेश व्यासांनी वैशंपायनाला दिला (आदिपर्व ६०-२२), तेव्हा वैशंपायनाने आपले कथन सुरू करताना म्हटले-

**महर्षेर्विश्रुतस्येह सर्वलोकेषु धीमतः**
**प्रवक्ष्यामि मतं कृत्स्नं व्यासस्यास्य महात्मनः।।६१-२**

"सर्व लोकांत विख्यात या परम बुद्धिवान महात्मा महर्षि व्यासांची रचना मी आता संपूर्ण कथन करतो." येथे 'अस्य महात्मनः व्यासस्य' शब्द दर्शवितात की, स्वतः व्यास तेथे उपस्थित होते. असे असता प्रत्यक्ष त्यांच्या समक्ष वैशंपायनाने त्यांच्या मूळ रचनेत स्वतःचे हजारो श्लोक जोडण्याची अनधिकार चेष्टा केली असती काय?

या मूळ रचनेला कधी भारत तर कधी महाभारत म्हणत. वरील श्लोकानंतर वैशंपायनाने म्हटले-

**श्रोतुं पात्रं चं राजंस्त्वं प्राप्येमां भारतीं कथाम्**
**गुरोर्वक्त्रपरिस्पन्दो मनः प्रोत्साहतीव मे।।६४-३**

"राजा (जनमेजय), ही भारती कथा ऐकण्यास आपण सर्वथा पात्र आहात, आणि मलाही ती ज्ञात आहे; गुरुमुखकमलातून निघालेल्या आदेशाने प्रेरित होऊन ही कथा सांगण्यास मला उत्साह वाटत आहे." वैशंपायन अध्याय ६२ श्लोक ३१, ३२, मध्ये या महाकाव्याला 'भारत' असे संबोधून श्लोक ३८-३९ मध्ये याला 'महाभारत' म्हणतात-

**...ज्ञानादज्ञानतो वापि प्रकरोति नरश्च यत्।। आदिपर्व ६२-३८**
**तन्महाभारताख्यानं श्रुत्वैव प्रविलीयते**
**भारतानां महज्जन्म महाभारतमुच्यते।।३९**

"मनुष्य जाणून किंवा न जाणून जे (दुष्कर्म) करील ते (सारे) महाभारत कथेच्या श्रवणाने पूर्णपणे विलीन होऊन जाते. यात भरतकुलवंशजांचे महान चरित्र वर्णन केले असल्याने याला महाभारत म्हणतात- ३८,३९." सारांश, या प्रचंड महाकाव्याला प्रथम पासूनच भारत व महाभारत अशी दोन्ही नांवे होती.

पुढे शांतिपर्वातही अध्याय ३४० मध्ये वैशंपायन आपले गुरु 'कृष्णद्वैपायनो व्यासो वेदव्यासो महानृषिः' यांचा सादर उल्लेख करून त्यांच्या पाच शिष्यांचा



उल्लेख करतात. त्या शिष्यांत स्वतःचा व व्यास पुत्र शुकाचाही समावेश करून वैशंपायन म्हणतात की, व्यासांनी त्या आपल्या शिष्यांना -

**वेदानध्यापयामास महाभारतपञ्चमान्।।शांतिपर्व ३४०-२१**

"चार वेद आणि पांचवे (वेदांसमान मानले गेलेले) महाभारत शिकविले.' येथे व्यासांनी 'महाभारत' शिकविण्याचे म्हटले आहे. पण हेच पुनः सांगताना वैशंपायन 'भारत' शब्द वापरतात (३४९-१०ते १३). याशिवाय, वैशंपायनाने 'नारायण कथा' सांगितल्यावर जनमेजयाने म्हटले-

**...इदं शतसहस्राद्धि भारताख्यानविस्तरात्।। शांतिपर्व ३४३-११**
**आमन्थ्य मतिमन्थेन ज्ञानोदधिमनुत्तमम्...१२**

'एक लक्ष श्लोक विस्ताराच्या भारताख्यानांतून (सांगितलेली) ही (नारायणकथा) श्रेष्ठ ज्ञानसागराचे बुद्धिरूपी रवीने मंथन करून काढलेल्या अमृतासमान आहे.'

या सर्वावरून हे उघड आहे की, या प्रचंड महाकाव्याची मूळ रचनाच एक लक्ष श्लोकांची असून, जें भारत तेंच महाभारत; मग याचा कर्ता पांडवांचे आजोबा व समकालीन महर्षि व्यास माना, अथवा (महाभारतातील ज्योतिषात्मक विधानांच्या सूक्ष्म अध्ययनावर आधारित) वर प्रतिपादन केल्याप्रमाणे स्वतःची ही अनुपम कृति त्या व्यासांना संपूर्ण अर्पण करणारा इ.स. पूर्व प्रथम शतकाचे सुमारास होऊन गेलेला कोणी अद्वितीय प्रतिभासंपन्न महापंडित माना. ❐

भाग ४

*अन्य कूटे*

*प्रकरण १७*

# कुरुक्षेत्र युद्धात कोणाचे तोंड कोणत्या दिशेला होते?

**प्रादेशिक माहिती**

कुरुक्षेत्रावरील युद्धात कोणत्या पक्षाचे तोंड कोणत्या दिशेस असे याबद्दलही महाकवीने कूट केले आहे. लढताना पांडव सैन्याचे तोंड पूर्वेकडे व कौरवांचे पश्चिमेकडे असे असा अनेक जणांचा ग्रह आहे.✱१ पण वस्तुस्थिती उलट होती.

कुरुक्षेत्राचे विशाल मैदान हस्तिनापुरच्या पश्चिमेला यमुनेच्या पलीकडे होते. वनवास प्रारंभी पांडवांनी हस्तिनापुरच्या पश्चिमेस जाऊन कुरुक्षेत्रात प्रवेश केला होता (वनपर्व अध्याय ५). कुरुक्षेत्राची चतुःसीमा अशी होती-

**तरन्तुकारन्तुकयोर्यदन्तरं**<br>
**रामन्हदानां च मचक्रुकस्य च**<br>
**एतत् कुरुक्षेत्रसमन्तपञ्चकं**<br>
**प्रजापत्तेरुत्तरवेदिरुच्यते।। शल्यपर्व ५३-२४**

'तरन्तुक, अरन्तुक, रामन्हद (परशुरामाची पाच कुंडे), व मचक्रुक यांमधील प्रदेश कुरुक्षेत्र अथवा समंतपंचक आहे; यालाच प्रजापतीचा उत्तरवेद्वि म्हणतात.' हा श्लोक वनपर्वातही (८३-२०८) आला असून, तेथे अरन्तुक सरस्वतीच्या किनाऱ्यावर दाखविले आहे (८३-५२). याचा अर्थ असा की, पश्चिमेस कुरुक्षेत्र सरस्वती नदी पावेतो पसरले होते. मचक्रुकचाही वेगळा उल्लेख वनपर्व ८३-९ मध्ये आहे.

समंतपंचक हा कुरुक्षेत्राचा एक भाग नसून त्याचेच दुसरे नांव होते. कुरुक्षेत्र एक विशिष्ट तीर्थस्थान नसून, अनेक पावन तीर्थस्थलांनी भरलेला प्रदेश होता. याच्या एका कोपऱ्यात परशुरामाची पांच कुंडे होती. 'पंचक' शब्दामुळे या पाच कुण्डांनाच काहीजण समंतपंचक समजतात.✱२ पण तें

---

✱१ उदाहरणार्थ, दप्तरी, पू. उ. page 29.

✱२ पाहा चिं.वि. वैद्य,'महाभारताचा उपसंहार', पृ. ३८६



चूक आहे. या कुण्डांच्या जवळ 'यक्षिणी' तीर्थ असून त्याला कुरुक्षेत्राचे प्रवेशद्वार म्हणत असत (वनपर्व ८३-२४ व शल्यपर्व ५२-२८).

कुरुक्षेत्राच्या पश्चिमेस (व काही ठिकाणी उत्तरेस) सरस्वती नदी होती. सरस्वतीच्या पूर्वेस दृषद्वती वाहत होती; व तिच्याही पूर्वेस यमुना (आणि यमुनेच्या पूर्वेस गंगा). कुरुक्षेत्र पश्चिमेकडे सरस्वतीला लागून, पूर्वेकडे दृषद्वतीच्या पलीकडे कित्येक कोस पसरले होते. पण त्याची पूर्वेकडील सीमा थेट यमुनेपासून काहीशी अलीकडे समाप्त होत होती असे दिसते.

उत्तरेस हिमालयात सरस्वतीच्या उमस्थानापासून ('प्लक्षप्रवण' तीर्थापासून) यमुनाही बरीच जवळ होती, असे शल्यपर्वातील बलराम यात्रेच्या वर्णनावरून दिसते. मात्र सरस्वती हिमालयावरून खाली उतरल्यावर पश्चिमवाहिनी होऊन प्रभास तीर्थी समुद्रास मिळाली; तर यमुना पूर्ववाहिनी होऊन प्रयाग क्षेत्री गंगेस मिळते. अशा प्रकारे हिमालयावरून खाली उतरल्यावर सरस्वती व यमुना यांतील अंतर वाढत जाऊन, त्या अंतरातील मैदानी प्रदेशात कुरुक्षेत्र होते.

**कौरवांचे तोंड पूर्वेकडे व पाण्डवांचे पश्चिमेकडे असे**

आता कुरुक्षेत्रांत लढाईच्या वेळेस कोणत्या पक्षाचे तोंड कोणत्या दिशेस असे हे पाहू. युद्धारंभाच्या दिवशी प्रातःकाळी कौरव सैन्य आपल्या शिबिरांतून लढाईच्या तयारीने बाहेर पडले, आणि-

**ते समेत्य यथान्यायं धार्तराष्ट्रा महाबलाः**<br>
**कुरुक्षेत्रस्य पश्चार्धे व्यवातिष्ठन्त वंशिताः ।। उद्योगपर्व १९५-११**

'शस्त्रादींनी सुसज्ज महाप्रतापी कौरव एकत्र होऊन (सैन्यासह) कुरुक्षेत्राच्या पश्चिम भागात यथोचित प्रकारे उभे राहिले.' यावरून हे स्पष्ट आहे की, रणभूमीवर त्यांचे तोंड पूर्वेकडे (व पांडवांचे पश्चिमेकडे) असे.

याची पुष्टी करणारे संकेतही आहेत. प्रत्यक्ष लढाईच्या चौदाव्या दिवसाच्या वर्णनात संजय म्हणतो-

**अपराण्हे महाराज संग्रामः समुहानभूत्**<br>
**पर्जन्यसमनिर्घोषः पुनर्द्रोणस्य सोमकैः।। द्रोणपर्व, १२५-१**

'महाराज (धृतराष्ट्र), अपराण्ह प्रहरी सोमकांबरोबर सेनापती द्रोणांचा पुनः घोर संग्राम होऊन त्याचा पर्जन्यवृष्टीसमान गंभीर कोलाहल होऊ लागला'. आणि या प्रसंगी-

**प्रताप्यमानः सूर्येणहन्यमानाश्च सायकैः**<br>
**अन्वपद्यन्त पञ्चालास्तदा संत्रस्तचेतसः।।१२५-५१**

'पांचाल सेना (द्रोणांच्या) बाणांनी व्यथित, आणि त्याबरोबरच सूर्यकिरणांनी तप्त, होऊन त्रस्तचित व व्याकुळ होऊ लागली.' 'अपराण्ह प्रहरी' पांडव सेनेला सूर्याच्या उन्हाचा फार त्रास होत होता, हें दर्शविते की, लढताना त्यांचे तोंड पश्चिमेकडे असे. येथे सूर्यकिरणांचा उल्लेख समोरून येणाऱ्या शत्रूच्या बाणांबरोबर केला आहे. कौरवांचे बाण पांडव सैन्यावर नेमके पडत होते; पण पांडवांच्या योध्द्यांना (त्या बाणांबरोबर) समोरून डोळ्यावर येणाऱ्या तीव्र उन्हामुळे आपला नेम बरोबर साधणे कठीण जात होते.

याउलट, कर्णवधाच्या दिवसाच्या वर्णनात संजय जवळजवळ तसाच शब्दप्रयोग करून म्हणतो-

**प्रताप्यमानं सूर्येण भीमेन च महात्मना**
**तव सैन्यं संचुकोच वर्मांग्नावाहितं तथा।। कर्णपर्व ५१-५१**

'शूर भीमाच्या प्रहारांनी, आणि त्याबरोबरच सूर्यकिरणांनी तप्त (त्रस्त), होऊन तुमची (कौरव) सेना आगीवर ठेवलेल्या चामड्यासमान सुकडली जाउ लागली.' येथे महत्त्वाची गोष्ट ही की, हे वर्णन मध्यान्हपूर्वीचे (सकाळच्या प्रहराचे) आहे. कारण यानंतर भीमाने केलेला पाचशे रथांचा व तीन हजार घोडेस्वारांचा नाश, व तत्पश्चात् त्याचा कर्णाशी भीषण संघर्ष, इत्यादि घटना झाल्या आणि त्यानंतर मध्यान्हाचा पुढील उल्लेख येतो, "मध्यान्हे तपतो राजन् भास्करस्य महाप्रभाः" (श्लोक ६७); आणि पुनः "ततः प्रववृत्ते युद्धं मध्यं प्राप्ते दिवाकरे" (श्लोक ७१) असे म्हटले आहे. अर्थात श्लोक ५१ मधील वर्णन मध्यान्हापूर्वीचे आहे. आणि ज्या अर्थी त्यावेळी कौरव सैन्याला सूर्य किरणांचा विशेष त्रास होत होता, त्याअर्थी त्याचे तोंड पूर्व दिशेकडे होते.

नंतर याच दिवशी कर्णवधानंतर सायंकाळी कौरव सेना घाबरून आपल्या शिबिरांकडे पळू लागली. ते सांगताना संजय पूर्ण सुसंगतरीत्या म्हणतो-

**वधेन कर्णस्य तु दुःखितास्ते**
**हा कर्ण हा कर्ण इति ब्रुवाणाः**
**द्रुतं प्रयाताः शिबिराणि राजन्**
**दिवाकरं रक्तमवेक्षमाणाः।। कर्णपर्व, ९४-२८**

"राजा (धृतराष्ट्र), कर्णवधाने दुःखी झालेले ते (कौरव सैनिक) 'हा कर्ण, हा कर्ण' असा आक्रोश करीत, व लाल सूर्यबिंबाकडे पहात शिबिरांकडे पळू लागले." रणभूमीवरून सायंकाळचे वेळी आपल्या शिबिरांकडे पळत जात असता कौरव सैनिकांना अस्तास जाणारा लाल सूर्य समोर दिसत होता. याचा अर्थ असा की, यावेळी त्यांचे तोंड पश्चिमेकडे होते (आणि लढताना



उलट पूर्वेकडे असे).

या दिवशी पूर्वरात्रिसमयी प्रमुख कौरव वीर विशेष विचारविनिमयासाठी रणक्षेत्रापासून कांही दूर उत्तरेकडे हिमालयाच्या पठारावर गेले व सरस्वती नदीवर पोचले (शल्यपर्व ५-५०, ५१, प्रकरण ९ मध्ये उद्धृत). कौरवांनी कुरुक्षेत्राचा पूर्वार्ध व्यापला असता, तर ते यावेळी शत्रूच्या दिशेने (कुरुक्षेत्राच्या पश्चिमेस असलेल्या) सरस्वती कडे न जाता, (कुरुक्षेत्राच्या पूर्वेकडे असलेल्या) यमुनेवर जाते. पण ते कुरुक्षेत्राच्या पश्चिमार्धात असल्याने सरस्वतीच्या हिमालयीन प्रवाहावर सहज पोचू शकले. अशा प्रकारें स्पष्ट होंते की, लढताना त्यांचे तोंड पूर्वेकडे असे.

याशिवाय, अर्जुनाने केलेल्या जयद्रथवधाचे सूक्ष्म वर्णनही हेंच दिग्दर्शित करतें; त्याची चर्चा पुढील प्रकरणात केली आहे.

**महाकवीचे मार्मिक कूट**

मग याविषयी उलट भ्रम कसा पसरला? याच्या मुळाशी बहुधा भीष्मपर्वातील पुढील दोन श्लोक असतात-

**पश्चान्मुखाः कुरवो धार्तराष्ट्राः**
**स्थिताः पार्थाः प्राङ्मुखा योत्स्यमानाः ।। भीष्मपर्व, २०-५**
**महारथौघविपुलः समुद्र इव घोषवान्**
**भीष्मेण धार्तराष्ट्राणां व्यूहः प्रत्यङ्मुखो युधि।। २०-१९**

'(त्यावेळी कुरुक्षेत्राच्या रणभूमीवर) युद्धाच्या तयारीसहित धार्तराष्ट्र कौरव पश्चिमेकडे तोंड करून व पांडव पूर्वाभिमुख स्थित होते-५. भीष्मांनी रणभूमीवर रचलेला कौरव सैन्याचा पश्चिमाभिमुख व्यूह महारथ्यांच्या अनेक पंक्तींनीं संपन्न असून समुद्रासमान कोलाहल करीत होता- १९.' पण हें वर्णन मघा नक्षत्र दिवसाच्या दिवसाचें आहे; आणि प्रकरण १२ मध्ये स्पष्ट केल्याप्रमाणे ते प्रत्यक्ष लढाईचे नसून, युद्धारंभपूर्व उभय पक्षांनी रणभूमीवर केलेल्या पूर्वाभ्यासांचे आहे. याच अध्यायात महाकवी म्हणतात -

**दुर्योधनो हस्तिनं पद्मवर्णं**
**सुवर्णकक्षं जालवन्तं प्रभिन्नम्**
**समास्थितो मध्यगतः कुरूणां**
**संस्तूयमानो बन्दिभिर्मागधैश्च।।२०-७**

'पाठीवर सोन्याची अंबारी व जाळी कसलेल्या कमलवर्णी मदस्त्रावी गजराजावर आरूढ दुर्योधन सैन्याच्या मध्यीगीं विराजमान होता; आणि भाट व जन्दीजन त्याचे स्तुतिगान करीत होते.' प्रत्यक्ष लढाईच्या प्राणघातक खणखणाटात भाटांची अशी स्तुतिगीते कशी शक्य होती? पण हे युद्धाच्या

पूर्वाभ्यासाचे वर्णन आहे.

अशाच प्रकारे लढाईच्या आठव्या विश्राम दिवशीं रात्री दुर्याधन एक मोठ्या मिरवणुकीसह भीष्मांच्या शिबिराकडे गेला होता (प्रकरण ९). ते वर्णन करताना महाभारतकारांनी पुनः 'संस्तूयमानः सूतैश्च मागधैश्च महायशाः' (भाष्मपर्व ९७-३० उपरोक्त प्रकरणांत उद्धृत) म्हटले आहे. असे स्तुतिगान प्रत्यक्ष लढाईच्या धामधुमीत संभव नव्हते.

याप्रमाणे भीष्मपर्व अध्याय २० मधील तें वर्णन प्रत्येक पक्षाने कुरुक्षेत्राच्या आपापल्या भागात केलेल्या पूर्वाभ्यासांचे आहे हें लक्षात घेतलें, म्हणजे महाकवीची येथे एक विशेष सूक्ष्मता ध्यानात येईल. प्रत्यक्ष युद्धारंभाच्या पूर्वी (युद्धाभ्यास करताना) शस्त्रास्त्रांनी सज्ज उभय सैन्यें परस्परांसमोर तोंड करून उभे राहण्याऐवजी, सुरक्षिततेच्या दृष्टीने ते पूर्वाभ्यास परस्परांना पाठमोरे होऊन कुरुक्षेत्राच्या आपापल्या भागांत करणे उचित (व सुरक्षित) होते! या दृष्टीने विसाव्या अध्यायात वर्णित कौरवव्यूहाचे तोंड आपल्याच शिबिरांकडे म्हणजे पश्चिमेकडे, व उलट पांडवांचे पूर्वेकडे होते असे महाभारतकारांनी म्हटले ते यथार्थच आहे.❋

### एका संदिग्ध श्लोकाचे स्पष्टीकरण

तरीही आणखी काही श्लोकांवर विचार करू. भीष्मपर्वाच्या प्रथम अध्यायात प्रत्यक्ष युद्धारंभादिवसाच्या पूर्वीची स्थिती वर्णन करीत वैशंपायन म्हणतात-

**तेऽवत्तीर्य कुरुक्षेत्रं पाण्डवाः सहसोमकाः**
**कौरवाः समवर्तन्त जिगीषन्तो महाबलाः।।भीष्मपर्व १-३**
**वेदाध्ययनसंपन्नाः सर्वे युद्धाभिनन्दिनः**
**आशंसन्तो जयं युद्धे बलेनाभिमुखा रणे।।४।**
**अभियाय च दुर्धर्षां धार्तराष्ट्रस्य वाहिनीम्**
**प्राङ्मुखाः पश्चिमे भागे न्यवशन्त ससैनिकाः ।।५**
**समन्तपञ्चकाद् बाह्यं शिबिराणि सहस्त्रशः**
**कारयामास विधिवत् कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः।।६**

---

❋ म्हणून श्लोक २०-१९ मध्ये 'युधि'चा अर्थ प्रत्यक्ष युद्धांत असा नसून 'युद्धभूमीवर' इतकाच आहे. याच अध्यायात श्लोक १५ मध्ये संशप्तक वीर अर्जुनाशी युद्ध करण्यास निघण्याचा उल्लेख आहे; तोही पूर्वाभ्यास समजणे उचित होईल. त्यावेळी अर्जुनाने त्यांचा कसा प्रतिकार केला याबद्दल तेथे अवाक्षरही नाही ! संशप्तकांचा अर्जुनाशी खरोखर संग्राम प्रत्यक्ष लढाईच्या बाराव्या व तेराव्या दिवशी झाला होता. त्यांचे अर्जुनाशी खास वैर होते. (द्रोणपर्व १७ -११ ते १६)



"सोमकांसहित पाण्डव, आणि तसेच कौरव, महाशक्तिसंपन्न व विजयाभिलाषी होते; आणि त्यांनी कुरुक्षेत्रावर पोचल्यावर (आपापल्या विभागांत) उचित रीतीने मुक्काम स्थापन केला-३. ते सर्व वेदांचे ज्ञाते व युद्धोत्सक होते. आपल्या सर्वसामर्थ्यासह रणभूमीवर शत्रूला तोंड देऊन लढाईत विजयाची ते इच्छा करीत होते-४. दुर्योधनाच्या शक्तिशाली सैन्याच्या जवळ ते (?) (कुरुक्षेत्राच्या) पश्चिम भागात पूर्वाभिमुख (आपल्या) सैनिकांसह राहू लागले-५. कुन्तीपुत्र युधिष्ठिराने संमतपंचकाच्या बाहेर हजारो शिबिरे रीतसर उभी केली-६."

यात पाचवा श्लोक विवाद्य झाला आहे. काही जण त्याचा संबंध पाण्डवांशी लावून म्हणतात की, कुरुक्षेत्रावर पाण्डव सेना पश्चिम भागात पूर्वेकडे तोंड करून स्थित होती. परंतु त्या श्लोकात पांडव शब्द नाही.

सहाव्या श्लोकात युधिष्ठिराचा उल्लेख असून म्हटले आहे की, त्याने समंतपंचकाच्या (कुरुक्षेत्राच्या) बाहेर आपली शिबिरें उभारली. हें दाखवितें की, पांडवांचा तळ कुरुक्षेत्राच्या पूर्वार्धात होता. कारण कुरुक्षेत्राची पश्चिम सीमा थेट सरस्वती नदी पावेतो होती. म्हणून त्या बाजूला कुरुक्षेत्राच्या बाहेर शिबिरें उभारणे म्हणजे मध्ये विशाल सरस्वती नदी ओलांडून तिच्या पश्चिम तीरावर शिबिरे उभारणे झाले असते. पण रणक्षेत्राचा आपला विभाग व आपली शिबीरे या दरम्यान अशी नदी ठेवणे सम्भव नव्हते. म्हणून त्या बाजूची शिबिरे सरस्वतीच्या पूर्वेस, कुरूक्षेत्राच्या आत, असली पाहिजेत. याउलट, कुरूक्षेत्राची पूर्व सीमा थेट यमुनेपावेतो नसून काही अलीकडे संपत होती असे दिसते. म्हणून कुरुक्षेत्राचा पूर्वार्ध व्यापणारा पक्ष आपल्या पिछाडीस पण कुरुक्षेत्राच्या सीमेबाहेर (यमुनेच्या पश्चिमेस) आपली शिबिरे उभारू शकत होता; आणि हें युधिष्ठिराने केले.

या संदर्भात श्लोक पाच चा संबंध कौरवांशी असून आशय असा दिसतो की, त्या पक्षाच्या सहाय्यक राजांनी दुर्योधनाच्या सैन्याजवळच आपापल्या सैनिकांसह मुक्काम केला.

श्लोक ३ व ४ मध्ये उभय सैन्यांचा एकत्र उल्लेख करून, श्लोक ५ व ६ मध्ये त्यांच्या शिबिरांचा वेगवेगळा उल्लेख दिसतो. लढताना प्रत्येक पक्षाचे तोंड कोणीकडे असे याविषयी वर जे स्पष्ट संदर्भ आणि संकेत दिले आहेत, त्यांच्याशी सुसंगत असा श्लोक ५ चा अर्थ करणे आवश्यक आहे.❋

---

❋ श्लोक ५ च्या प्रथम पंक्तीसाठी "आहवाय दुराधर्षा धार्तराष्ट्रस्य पार्थिवाः" असा एक अन्य पाठही आहे (पाहा भांडारकर संस्था द्वारा प्रकाशित भीष्म पर्व).

प्रकरण १८

# जयद्रथवधात श्रीकृष्णमायेचे रहस्य

### श्रीकृष्णार्जुनांवर व्यर्थ आरोप

जयद्रथवधाचा प्रसंग महाभारत युद्धातील एक सूक्ष्म घटना आहे. प्रत्यक्ष लढाईच्या चौदाव्या दिवशी अर्जुन (लढाईच्या आधल्या दिवशी अभिमन्यूच्या अन्यायपूर्वक झालेल्या वधाच्या बदल्यात केलेल्या) आपल्या प्रतिज्ञापूर्तीसाठी सूर्यास्तापूर्वी जयद्रथवधाचा आटोकाट प्रयत्न करीत असता, शेवटच्या क्षणांत श्रीकृष्णांनी आपल्या मायासामर्थ्याने सूर्यास्ताचे कृत्रिम दृश्य निर्माण केले. यासंबंधांत अशी कल्पना प्रचलित आहे की, त्या मायावी अंधकाराने स्वतः जयद्रथ भ्रमित होऊन रणभूमीवर सहर्ष निःशंक मनाने फिरू लागला असता, अर्जुनाने (श्रीकृष्णाच्या प्रेरणेने) एकदम त्याचा शिरच्छेद केला.

हिन्दी राष्ट्रकवी मैथिलीशरण गुप्त यांनी 'जयद्रथवध' नामक काव्यात म्हटले आहे की, श्रीकृष्णांनी मायावी सूर्यास्त करताच स्वतः जयद्रथासह सर्व कौरव योद्धे आनंदाने नाचू लागले, व 'आत्मदाहाच्या शुभकार्यासाठी आता विलंब कशाला?' असे म्हणून जयद्रथ अर्जुनास हिणवू लागला; पण तितक्यात श्रीकृष्णांनी माया आवरली व आकाशात सूर्य पुनः दिसू लागला; त्याबरोबर विस्मयचकित होऊन कौरवांनी पुनः लढाईचा प्रयास सुरू केला, तेवढ्यांत अर्जुनाने जयद्रथाचा वध केला. श्री. गो. नी. दांडेकरांनी आपल्या महाभारतावरील पुस्तकात अशीच कल्पना व्यक्त केली आहे. आणि चक्रवर्ती राजगोपालाचार्य यांनीही म्हटले आहे की, ('Mahabharata,' Bharatiya Vidya Bhavan, pages 278-79), मायावी सूर्यास्त होताच जयद्रथास सूर्य दिसेनासा होऊन तो निर्भय झाला असता, श्रीकृष्णांनी अर्जुनास हळूच सांगितले की, ही केवळ माझी माया असून आकाशात अद्याप सूर्य आहे, आणि जयद्रथ त्याविषयी भ्रमात आहे, तेवढ्यातच तू त्याचा वध कर, व अर्जुनाने तसें केले.

पण अर्जुनाकडून जयद्रथवध खरोखर अशा फसवणुकीच्या रीतीने झाला काय? महाभारतकारांनी मार्मिक शब्दात वर्णिलेली ही घटना वस्तुतः



त्या स्वरूपाची आहे काय?

**स्वतः कौरवांनी तसा आरोप केला नाही**

येथे प्रारंभीच एका गोष्टीकडे लक्ष देणे उचित होईल. महाभारतात जयद्रथवधासंबंधी कौरवपक्षाने केलेले अनेक उल्लेख आहेत; पण त्यात जयद्रथाला फसवण्याचा आरोप नाही.

जयद्रथवध होताच दुर्योधनाच्या मनात पुढील दुःखी विचार आले. संजय धृतराष्ट्रात सांगतो-

**अमन्यतार्जुनोसमो न योद्धा भुवि विद्यते।।द्रोणपर्व १५०-४**
**न द्रोणो न च राधेयो नाश्वत्थामा कृपो न च**
**क्रुद्धाय समरे स्थातुं पर्याप्ता इति मारिष।।५**
**निर्जित्य हि रणे पार्थः सर्वान् मम महारथान्**
**अवधीत् सैन्धवं सख्ये न च कश्चिदवारयत्।।६**

'माननीय राजा, त्याला (दुर्योधनास) वाटले की, जगात अर्जुनासमान अन्य कोणी योद्धा नसून क्रुद्ध अर्जुनासमोर रणांगणांत द्रोण, कर्ण, अश्वत्थामा, कृप यांपैकी कोणीही उभे राहण्यास समर्थ नाही; माझ्या सर्व महारथ्यांना युद्धात पराभूत करून अर्जुनाने रणभूमीवर जयद्रथाचा वध केला, कोणीही त्याचा प्रतिकार करू शकला नाही- ४,५,६.' यात श्रीकृष्णअर्जुनांनी जयद्रथाची फसवणूक केल्याचा काहीही आरोप नसून, उलट दुर्योधन जयद्रथवधाबद्दल अर्जुनाच्या शौर्यापुढे आपली हार मानीत आहे. याच खिन्न मनोवृत्तीत दुर्योधनाने (सेनापती) द्रोणास कटु शब्दात म्हटले-

**अपरश्चापि दुर्धर्षः शिष्यस्ते सव्यसाचिना**
**अक्षौहिणीः सप्त हत्वा हतो राजा जयद्रथः।। १५०-१४**

'सव्यसाची अर्जुनाने माझ्या सात अक्षौहिणी सैन्याचा पाडाव करून तुमचा दुसरा पराक्रमी शिष्य राजा जयद्रथ याचा वध केला.' यावेळी दुर्योधनाने द्रोणांच्या इमानदारीवरही संशय व्यक्त केला. त्यावर द्रोणांनी उत्तर दिले-

**यत्ताः सर्वे पराभूताः पर्यावारवताऽर्जुनम्**
**सिंधुराजानमाश्रित्य स वो मध्ये कथं हताः।।१५१-२१**
**तन्मां किमभितप्यन्तं वाक्शरैरेव कृन्तसि**
**अशक्तः सिन्धुराजस्य भूत्वा त्राणाय भारत।।२७**

'सिन्धुराज जयद्रथाला मुख्य आश्रयबिन्दु करून पूर्ण तयारी सह अर्जुनास विरोध करीत वेढून टाकणारे तुम्ही सारे पराभूत झाला; तुम्हां सर्वांच्या मध्ये असता तो कसा मारला गेला? -२१. भरतकुलजा, जयद्रथाच्या रक्षणाला तू

स्वतः असमर्थ ठरलास आणि अधीच शोकाकुल झालेल्या मला कटु शब्दांनी का ताडन करतोस?-२७.' येथे द्रोणाचार्यही जयद्रथवधात श्रीकृष्णार्जुनांनी कपट केल्याचे म्हणत नाही. याच वेळेस दुर्योधन याविषयी कर्णासही बोलला, तेव्हा कर्णाने उत्तर दिले-

**यतो नो युद्धमानानां परं शक्त्या सुयोधन।।१५२-२३**
**सैन्धवो निहतो युद्धे दैवमत्र परं स्मृतम्।२४**

'दुर्योधना, सारी शक्ति वापरून आम्ही युद्ध करीत असताही जयद्रथ लढाईत मारला गेला; अशा बाबतीत दैव सर्वश्रेष्ठ मानले जाते.' स्वतः संजयानेही धृतराष्ट्रास सांगितले -

**अक्षौहिणीर्दशैका च विनिर्जित्य शितैः शरैः**
**अर्जुनेन हतो राजन् महावीर्यो जयद्रथः।। कर्णपर्व ५-१२**

'राजा, अकरा अक्षौहिणींना तीक्ष्ण शरांनी नामोहरम करून अर्जुनाने महाशूर जयद्रथाचा वध केला.'

याशिवाय भीमाशी अंतिम गदायुद्ध (प्रकरण ७ पाहा) संपल्यावर मरणासन्न दुर्योधनाने श्रीकृष्णांस दिलेल्या शिव्यांतही जयद्रथाला कपटाने मारण्याचा आरोप नाही-

**कंसदासस्य दायाद न ते लज्यास्त्यनेन वै।। शल्यपर्व, ६१-२७**
**अधर्मेण गदायुद्धे यदहः विनिपातितः**
**ऊरूभिन्धाति भीमस्य स्मृतिं मिथ्या प्रयच्छता।।२८**
**किं न विज्ञातमेतन्मे यदर्जुनमवोचयाः**
**घातयित्वा महीपालानृजुयुद्धान् सहस्त्रशः।।२९**
**जिह्मैरुपायैर्बहुभिर्न ते लज्जा न ते घृणा। ३०**

"अरे कंसदासाच्या लेका, मी गदायुद्धात अधर्माने मारला गेलो याची तुला लाज कशी वाटत नाही? कपटाने माझी मांडी तोडण्याचे भीमाला स्मरण देत तू अर्जुनाशी बोललास तें काय मला माहीत नाही? सरळपणे युद्ध करणाऱ्या (माझ्या पक्षाच्या) हजारों राजांना अनेक कपटी उपायांनी मारूनही तुला लाज व घृणा कशी वाटत नाही?" आणि यानंतर याचे एक एक प्रमुख उदाहरण देत दुर्योधन श्रीकृष्णांस म्हणतो, "शिखण्डीला पुढे करून भीष्माला पाडण्यात, अश्वत्थामा नावाचा हत्ती मारून द्रोणाचा वध करविण्यात, अर्जुनवधासाठी राखून ठेवलेली शक्ती घटोत्कचावर टाकविण्यात, भूरिश्रवाचा वध करविण्यात, कर्णाने बाणावर बसविलेल्या अश्वसेन नागापासून अर्जुनाला वाचविण्यात, व तसेच कर्णाचे रथचक्र भूमीत रुतले असता त्याचा वध



करविण्यात तुझीच दुष्ट प्रेरणा कारणीभूत झाली आहे." (श्लोक ३० ते ३७). आणि या आरोपांचा संक्षेपाने पुनः उच्चार करीत दुर्योधन म्हणाला-

**यदि मां चापि कर्णं च भीष्मद्रोणौच संयुतौ।।३७**
**ऋजुता प्रतिद्वध्येथा न ते स्याद् विजयो ध्रुवम्**
**त्वया पुनरनार्येण जिह्ममार्गेण पार्थिवाः।।३८**
**स्वधर्ममनुतिष्ठन्तो वयं चान्ये च घातिताः।।३९**

'जर मजबरोबर, कर्णाबरोबर आणि भीष्म- द्रोणांबरोबर तुम्ही सरळपणे युद्ध केले असते तर तुमचा कधीही विजय झाला नसता, पण नीच (अनार्य) अशा तू स्वधर्मपूर्वक लढणाऱ्या आमचा व माझ्या पक्षाच्या अन्यही राजांचा कपटपूर्वक घात करविला.' स्वतः दुर्योधन मरतामरताही खास जयद्रथवधात कपट केल्याचा आरोप श्रीकृष्णावर करीत नाही.

मात्र महाभारताच्या काही पोथ्यात वरील श्लोकानंतर दुर्योधनाच्या तोंडी पुढील आणखी एक श्लोक येतो-

**त्वया मायाविना कृष्ण मायामर्कप्रमोषिणीम्**
**कृत्वा हतः सिन्धुपतिः किं तत्र विदितं मम।।**

'कृष्णा, कपटी अशा तू सूर्याला झाकणारी माया करून जयद्रथाला मारविले हे काय मला माहीत नाही?' पण हा श्लोक मूळ महाभारताचा असता तर वर उल्लेखित श्लोक ३० ते ३७ यात तो कर्णवधाच्या उल्लेखापूर्वी यथाक्रम आला असता. आणि दुर्योधनाच्या मनात खरोखर हे शल्य असते तर सदतिसाव्या श्लोकाच्या द्वितीय पंक्तीत आपले आरोप पुनः संक्षेपाने द्विरुक्त करताना कर्ण, भीष्म, द्रोण व तो स्वतः याबरोबर त्याने जयद्रथाचाही उल्लेख अवश्य केला असता. पण तेही असो. निदान जयद्रथवधानंतर तत्काल आपला क्षोभ व्यक्त करताना त्याने त्या कपटाचा आवर्जून उल्लेख केला असता; उलट वर दाखविल्याप्रमाणे त्याने जयद्रथवधाचे सारे श्रेय अर्जुनाच्या शौर्याला दिले.❋

गदायुद्धात मरणोन्मुख झालेल्या दुर्योधनास पाहून अश्वत्थाम्याने शेष पांडव पक्षाची रात्री कत्तल करण्याचे ठरवून, आपल्या हेतूच्या समर्थनार्थ

❋ पण इतक्यावरही हा श्लोक स्वीकारावयाचा असला तरी, यात श्रीकृष्णांच्या मायेने स्वतः जयद्रथ फसून मारला गेला असे म्हटले नसून, त्या मायेमुळे जयद्रथाचे संरक्षक भ्रमित होऊन त्याचे पूर्ण संरक्षण न झाल्याने तो अर्जुनाकडून मारला गेला असा आशय पाहता येतो, आणि तो पुढे दाखवल्याप्रमाणे महाभारतातील या प्रसंगाच्या एकूण वर्णनाशी सुसंगत आहे.

कृपाचार्याजवळ पांडवांची घोर नालस्ती केली (सौप्तिक पर्व, ५-१८ ते २६). त्यातही श्रीकृष्णार्जुनांनी जयद्रथास बेसावध अवस्थेत कपटाने मारण्याचा आरोप नाही. शेवटी, युद्धसमाप्तीनंतर गांधारीने जयद्रथाच्या प्रेतासमोर प्रत्यक्ष श्रीकृष्णांसमक्ष दारुण शोक व्यक्त केला, त्यातही आपला जावई जयद्रथ कपटाने मारला गेल्याचा आरोप नसून उलट ती म्हणते-

**पुत्रशोकाभितप्तेन प्रतिज्ञां चाभिरक्षिता**
**पाकशासनिना संख्ये वार्धक्षत्रिर्निपातितः।।स्त्रीपर्व, २२-७**
**एकादशचमूर्भित्वा रक्ष्यमाणं महात्मना**
**सत्यं चिकिर्षता पश्य हतमेनं जयद्रथम्।।८**

'पुत्रशोकाने संतप्त व आपली प्रतिज्ञा पूर्ण करू पाहणाऱ्या अर्जुनाकडून जयद्रथ युद्धात मारला गेला- ७. (त्याच्या) रक्षणार्थ सिद्ध अकरा सैन्यपथके पराभूत करून (प्रतिज्ञेची) आपली सत्यता प्रस्थापित करू पाहणाऱ्या महात्मा अर्जुनाने मारलेला हा जयद्रथ पाहा-८.'

जर जयद्रथाना कपटाने मारण्याचा आरोप कौरवही करीत नाही, तर वस्तुतः श्रीकृष्णांनी मायावी सूर्यास्ताचे दृश्य निर्माण केलेच नाही आणि तत्संबंधी सारे श्लोक प्रक्षिप्त आहेत, असे म्हणावे काय? भांडारकर संस्था तसे सूचविते. पण पुढे स्पष्ट कल्याप्रमाणे श्रीकृष्णांनी त्या प्रसंगी मायावी सूर्यास्त निर्माण केल्याची घटना एकंदर कथाप्रवाहाशी सुसंगत असून, ते श्लोक प्रक्षिप्त नाहीत. इतकेच की, त्या घटनेचे स्वरूप पुढे स्पष्ट केल्याप्रमाणे फार सूक्ष्म होते, आणि म्हणून कौरवपक्षही त्या संबंधात जयद्रथाला कपट केले गेल्याचा आरोप करू शकला नाही."

**महाभारतातील वर्णन**

अर्जुनाच्या आत्मदाहयुक्त घोर प्रतिज्ञेमुळे लढाईचा तो दिवस उभय पक्षांसाठी अतिशय महत्वाचा झाला होता. विशाल शकट व्यूहाच्या द्वारावर स्वतः सेनापति द्रोणाचार्य सज्ज उभे राहून कोणालाही आत प्रवेश करू देत नव्हते. पण तरीही श्रीकृष्ण सारथ्य करीत असलेल्या अर्जुनाच्या रथाने व्यूहात प्रवेश करून घेतला. (यासाठीच नंतर दुर्योधनाने द्रोणांस दोष दिला). व्यूहाच्या थेट सहा कोस आत अनेक महारथ्यांनी वेढलेला जयद्रथ सुरक्षित होता. जबरदस्त प्रतिकार मोडून काढीत अर्जुनाचा रथ हळूहळू पुढे सरकत होता. अशा स्थितीत मध्यान्ह जाऊन (द्रोणपर्व, ९५-४) अपराण्ह प्रहर प्राप्त झाला (१२५-१); आणि तरीही अर्जुन जयद्रथापासून दूर होता. पण आणखी सर्व विरोध नष्ट करून अर्जुन इतका पुढे सरकला की, जयद्रथ त्याच्या दृष्टिपथात



आला (१४६-४७,४८). पण तरीही दुर्योधनासहित सहा प्रमुख महारथी आपल्या सैनिकांसह जयद्रथाला घेरून त्याच्या रक्षणार्थ उभे होते. यानंतरचे त्या सायंकाळसमयाचे महाकवीने दिलेले वर्णन फार चित्तथरारक आहे.

**एतास्मिनेव काले तु द्रुतं गच्छति भास्करे**
**अब्रवीत् पांडवं राजन् त्वरमाणो जनार्दनः।। द्रोणपर्व १४६-६१**
**एव मध्ये कृतः षडभिः पार्थ वीरैर्महारथैः**
**जीवितेप्सुर्महाबाहो भीतस्तिष्ठति सैन्धवः।।६२**
**एताननिर्जित्य रणे षड्रथान् पुरूषर्षभ**
**न शक्यः सैन्धवो हन्तुं यतो निर्व्याजमर्जुन।।६३**
**योगमत्र विधास्यामि सूर्यस्यावरणं प्रति**
**अस्तंगत इति व्यक्तं द्रक्षत्येकः स सिन्धुराट्।।६४**
**हर्षेण जीविताकांक्षी विनाशार्थं तव प्रभो**
**न गोप्स्यति दुराचारः स आत्यानं कथंचन ।।६५**
**तत्र छिद्रे प्रहर्तव्यं त्वयास्व कुरुसत्तम**
**व्यपेक्षा नैव कर्तव्या गतोऽस्तमिति भास्करः।।६६**
**एवमस्त्विति बीभत्सुः केशवं प्रत्यभाषत**
**ततोऽ सृजत् तमः कृष्णः सूर्यस्यावरणं प्रति।।६७**
**योगी योगेन संयुक्तो योगिनामीश्वरो हरिः**
**सृष्टे तमसि कृष्णेन गतोऽस्तमिति भास्करः।।६८**
**त्वदीया जहृषुर्योधाः पार्थनाशान्नराधिप**
**ते प्रहृष्टा रणे राजन् नापश्यन् सैनिका रविम्।।६९**
**उन्नाम्य वक्त्राणि तदा स च राजा जयद्रथः**
**वीक्षमाणे ततस्तस्मिन् सिन्धुराजे दिवाकरम्।।७०**
**पुनरेब्रवीत् कृष्णो धनंजयमिदं वचः**
**पश्य सिन्धुपतिं वीरं प्रेक्षमाणं दिवाकरम्।।७१**
**भयं ही विप्रमुच्यैतत् त्वत्तो भरतसत्तम**
**अयं कालो महाबाहो वधायास्य दुरात्मनः।।७२**
**छिन्धि मूर्धानमस्याशु कुरु साफल्यमात्मनः**
**इत्येवं केशवेनोक्तः पाण्डुपुत्रः प्रतापवान्।।७३**
**न्यवधीत् तावकं सैन्यं शरैरर्काग्निसंनिभैः।।७४**
**तथैव च महाबाहुस्त्वदीयान् पाण्डुनन्दनः**
**गाढं विद्ध्वा शरैः राजन् जयद्रथमुपाद्रवत्।।७६**

तं समीपस्थितं दृष्ट्वा लेलिहानमिवानलम्
जयद्रथस्य गोप्तारः संशयं परमं गताः।।७७
ततः सर्वे महाराज तव योधा जयैषिणः
शिषिचुः शरधाराभिः पाकशासनिमाहवे।।७८
ततः शरमयं जालं तुमुलं पाकशासनिः
व्यसृजत् पुरुषव्याघ्रस्तव सैन्यजिघांसया।।८०
एवं तव बलं राजन् द्रावयित्वा धनंजयः
न्यवधीत् सायकैर्घोरैः सिन्धुराजस्य रक्षिणः।।९४
द्रौणिं कृपं कर्णशल्यौ वृषसेनं सुयोधनम्
छादयायास तीव्रेण शरजालेन पाण्डवः।।९५
एवं तान् व्याकुलीकृत्य त्वदीयानां महारथान्
उज्जहार शरं घोरं पाण्डवोऽनलसंनिभम्।।१००
अब्रवीच्च पुनस्तत्र त्वरमाणो जनार्दनः
धनंजय शिरश्छिन्धि सैन्धवस्य दुरात्मनः।।१०४

"राजा (धृतराष्ट्र), याच समयी सूर्य शीघ्रतेने (पश्चिम क्षितिजाकडे) सरकत असता श्रीकृष्ण अर्जुनास त्वरेने म्हणाले- ६१, 'महाबाहो सहा महारथी वीरांनी आपल्या मध्ये करून ठेवलेला हा भेकड जयद्रथ प्राण वाचविण्याच्या इच्छेने उभा आहे- ६२, पुरुषश्रेष्ठा (अर्जुना), युद्धांत या सहा रथ्यांना जिंकल्याशिवाय व (त्यासाठी) काही युक्ति केल्याशिवाय, जयद्रथाला मारणे संभव नाही-६३, म्हणून मी आता सूर्याला झाकून टाकण्यासाठी योग करतो; त्याने सूर्य अस्तास गेलेला दिसेल, मात्र त्या एकट्या जयद्रथाला (सूर्य) दिसत राहील- ६४. वीर अर्जुना,(त्याचा परिणाम असा होईल की, इतर सर्वांपेक्षा जयद्रथ वेगळा दिसून) स्वतःचे जीवित वाचवू इच्छिणारा आणि (अग्निप्रवेशद्वारा) तुझ्या जीवितनाशाच्या कल्पनेने हर्षोत्फुल्ल तो दुराचारी स्वतःला कोणत्याही प्रकारे (अन्य योद्ध्यांच्या भीडेमध्ये) लपवू शकणार नाही - ६५.कुरूश्रेष्ठा, या स्थितीत त्याच्या नेमक्या मर्मस्थानावर तू प्रहार कर; सूर्य (खरोखरच) अस्तास गेला आहे असे समजून उदासीन होऊ नको" - ६६, यावर अर्जुनानें 'ठीक आहे असेच होईल (करीन)' असे श्रीकृष्णांस उत्तर दिले. तदनंतर योगी. योगयुक्त, योगीश्वर श्रीहरि कृष्णाने सूर्याला झाकून टाकण्यासाठी (मायावी) अंधार निर्माण केला. राजा (धृतराष्ट्र), श्रीकृष्णाने अंधार निर्माण करताच सूर्य अस्तास गेला असे मानूनं अर्जुनाच्या (अग्निप्रवेशद्वारा) आत्मनाशाच्या कल्पनेने तुमचे (कौरवपक्षाचे) योद्धे हर्षित झाले; त्यांना सूर्य दिसला नाही, व रणभूमीवर



ते फार हर्षित झाले- ६७,६८,६९. त्यावेळी तो सिन्धुपति राजा जयद्रथ तोंड (मान) वारंवार मागे वर वळवून सूर्याकडे दृष्टिपेक्ष करीत असता, श्रीकृष्ण पुन्हा अर्जुनाला म्हणाले, 'भरतश्रेष्ठा, (आपल्या संरक्षकांवर विसंबून) तुझे भय न बाळगता सूर्यावर दृष्टि टाकत राहणाऱ्या या वीर जयद्रथाला पाहा; महाबाहो, या दुरात्म्याच्या वधाला हाच समय आहे-७०, ७१, ७२, शीघ्र याच्या मस्तकाचा छेद कर व स्वतःला (प्रतिज्ञापूर्ति द्वारा) सफल कर.' श्रीकृष्णांनी असे म्हटल्यावर प्रतापी अर्जुनाने कौरव सैन्याचा सूर्य व अग्निसमान तेजस्वी बाणांनी संहार प्रारंभ केला-७३, ७४ राजा, याप्रमाणे तुमच्या (कौरव पक्षाच्या) योद्ध्यांना बाणानी तीव्र जखमी करीत महाबाहु अर्जुन जयद्रथावर चालून गेला- ७६. (भयानक ज्वालांनी आसमंतांत) पुनः पुनः चाटणाऱ्या (सर्वभक्षी) अग्नीसमान त्या अर्जुनाला अगदी निकट आलेला पाहून, जयद्रथाचे संरक्षक फार घोटाळ्यात पडले-७७. महाराज, (तरीही) त्यावेळी रणभूमीवर कौरवांचे सर्व जयेच्छु योद्धे अर्जुनावर बाणांची वृष्टि करू लागले-७८. तेव्हा पुरुषश्रेष्ठ अर्जुनाने कौरव सैन्याच्या संहारार्थ बाणाचे भयंकर जाळे पसरवुन दिले - ८०. राजा, अशा प्रकारे तुमच्या (कौरवांच्या) सैन्यास पळावयास लावून अर्जुनाने जयद्रथाच्या (खास) संरक्षकांवर घोर बाणांनी प्रहार प्रारंभ केला-९४. अर्जुनाने अश्वत्थामा, कृप, कर्ण, शल्य, वृषसेन व दुर्योधन यांना तीव्र बाणजालाने झाकून टाकले- ९५. अशा प्रकारे तुमच्या त्या महारथ्यांना व्याकुळ करून अर्जुनाने (शेवटी) एक अग्नीसामान तेजस्वी भयानक बाण (भात्यातून) बाहेर काढला -१००. त्याक्षणी श्रीकृष्ण पुनः घाईघाईने म्हणाले, 'अर्जुना, पापी जयद्रथाचे मस्तक कापून टाक.'-१०४"

### जयद्रथाला शेवटपावेतो सूर्य दिसत होता

या विस्तृत वर्णनात श्लोक ६४ विशेष महत्वाचा असून, त्याचा विपर्यस्त अर्थ केला जातो. त्याच्या वास्तविक आशयानुसार श्रीकृष्णांच्या मायेचे असे सूक्ष्म स्वरूप होते की, केवळ एकट्या जयद्रथाला सूर्य दिसत राहील, पण (अर्जुनासह) अन्य सर्वांना सूर्य अस्तात गेलेला भासेल. पण कितीतरी भाषांतरांत याचा असा अगदी उलटा अर्थ केला जातो की, एकट्या जयद्रथाला (किंवा काही जण म्हणतात त्या प्रमाणे, जयद्रथालादेखील) सूर्यास्त भासणार होता. याची कांही उदाहरणे पाहा. गीतप्रेस गोरखपूर (हिन्दी), "अतः मैं यहा सूर्यदेव को ढकने के लिये कोई युक्ति करूंगा, जिससे अकेला सिन्धुराजही सूर्य को स्पष्ट रूप से अस्त हुवा देखेगा." का. वा. लेले, "यास्तव सूर्याच्या आच्छादनाविषयी मी एक उपाय याप्रसंगी योजितो. ह्यामुळे जयद्रथाला सूर्यास्त स्पष्टपणें झाला

असे वाटेल." बापट व देवस्थळी, "यास्तव हे पुरुषश्रेष्ठा, मी सूर्याला आच्छादित करण्याची उपाययोजना करितो. त्याच्या योगाने सूर्य अस्तासच गेला, असे सैन्धवास निश्चयाने वाटेल." न. र. फाटक (संपादक), "अर्जुना, मी सूर्यास आच्छादून टाकण्याविषयी एक उपाय योजीन. सूर्य अस्ताला गेला आहे असे त्या सैन्धवास स्पष्ट दिसेल."

वस्तुतः त्या श्लोकात 'अस्तंगत इति व्यक्तं' (सूर्य अस्तास गेलेला दिसेल) हे चरण आणि 'द्रक्षत्येकः सिन्धुराट्' ही दोन वेगळी वाक्यें आहेंत. परंतु उपरोक्त भाषांतरकार त्या दोघांना मिळून एकच संयुक्त वाक्य मानतात; आणि म्हणून जयद्रथ सूर्य अस्तास गेला आहे असे पाहत राहील असा अर्थ करतात. यांतील कांही लेखक 'एक' चा अर्थ 'एकटा' असा करत एकट्या जयद्रथास सूर्यास्त दिसत राहील असा आशय घेतात. पण महाभारतातील वर्णन पुढे जाऊन स्पष्ट म्हणते की, सर्व कौरव सैन्यास सूर्य अस्तास गेलेला दिसला. म्हणून अन्य भाषांतरकार, 'अस्तंगत इति व्यक्तं' चा जयद्रथाशी संबंध लावण्याचा चुकीचा आग्रह कायम ठेवनू 'एकः' चा अर्थ कसातरी ओढूनताणून 'निश्चयाने' (खात्रीने) असा करतात.

श्रीकृष्णांची योजना केवळ जयद्रथाला सूर्यास्त भासावा अशी असती, तर अर्जुनाला सूर्य दिसत राहिला असता. आणि मग श्लोक ६६ मध्ये श्रीकृष्णांनी अर्जुनाला 'तू स्वतः सूर्यास्त झाला अशा भ्रमात पडू नको' असे बजावण्याचे कारण नव्हते. पण जयद्रथ सोडून इतर सर्वांना त्यावेळी सूर्यास्त भासणार होता म्हणून ती सूचना द्यावी लागली. शिवाय, एकट्या जयद्रथाला सूर्यास्त भासला असता, तर त्याच्या महारथी संरक्षकांना सूर्य दिसत राहून ते निकराने लढत राहिने असते; व त्या स्थितीत जयद्रथवध शक्य नव्हता असे स्वतः श्रीकृष्णांचे म्हणणे होते; आणि मग मायावी सूर्यास्त निर्माण करण्यामागील सारा उद्देशच विफल झाला असता. पण श्लोक ६८ चा उत्तरार्ध व ६९ श्लोक चा पूर्वार्ध यावरून स्पष्ट आहे की, जयद्रथाच्या साऱ्या संरक्षकांना सूर्यास्त भासून ते अर्जुननाशाच्या कल्पनेने हर्षित झाले.

स्वतः जयद्रथाला आकाशात सूर्य अखेरपावेतो दिसत होता हे महाकवीने श्लोक ७० व ७१ मध्ये निःसंदिग्ध सांगितले आहे. त्यात म्हटल्याप्रमाणे, सूर्यास्ताच्या अखेरच्या क्षणाची अत्यंत तीव्रतेने प्रतीक्षा करणारा जयद्रथ त्यावेळेस मान मागे वळवून व मस्तक उंच करून क्षणाक्षणाला अस्ताचलाकडे सरकणाऱ्या सूर्यबिंबाकडे पाहत होता. या संदर्भात श्लोक ७२ चा अर्थ जयद्रथाला सूर्यास्त भासून तो निर्भय झाला असा नसून, अनेक महारथ्यांकडून आपण सुरक्षित



आहोत या भरंवशावर तो डुबणाऱ्या सूर्याकडे अधीरतेने पण निर्भयपणे पाहत होता असा आहे. आणि खास गोष्ट अशी की, जयद्रथाला सूर्य दिसत आहे याची त्याच्या संरक्षकांना कल्पना नव्हती, आणि त्यांना सूर्यास्त भासत आहे याची त्याला कल्पना नव्हती!

**श्रीकृष्ण मायेचे रहस्य**

श्रीकृष्णांच्या या 'योगिक' चमत्कारामागे वास्तविक उद्देश्य काय होता? मी 'उद्या' आणि तेही सूर्यास्तापूर्वी जयद्रथवध करीन अन्यथा अग्निप्रवेश करीन, अशी अर्जुनाने प्रतिज्ञा केली, तेव्हा या प्रतिज्ञेच्या दुष्करते बद्दल श्रीकृष्णांनी अर्जुनास चेतावणी दिली. त्यावर अर्जुनाने आत्मविश्वास व्यक्त केला. तरी त्याबरोबरच त्याने कांहीशी चिंताही व्यक्त करीत श्रीकृष्णांना म्हटले-

**मत्प्रतिज्ञाविघातार्थं धार्तराष्ट्रैः किलाच्युत**
**पृष्टतः सैन्धवः कार्यः सर्वैर्गुप्तो महारथैः।। द्रोणपर्व ८०-१२**
**ताभिः परिवृतः संख्ये सर्वैश्चैव महारथैः**
**कथं शक्येन संद्रष्टुं दुरात्मा कृष्ण सैन्धवः।।१४**

'श्रीकृष्णा, माझी प्रतिज्ञा विफल करण्यासाठी कौरवांचे सर्व महारथी निश्चितच जयद्रथाला पाठीशी घालून सुरक्षित ठेवतील- १२, कृष्णा, त्या सर्व महारथ्यांनी जयद्रथ रणभूमीवर वेढलेला असेल तेव्हा त्या दुष्टाला मी नेमका कसा पाहू शकेन? -१४'* याचाच उपाय श्रीकृष्णांनी मायावी सूर्यास्ताच्या द्वारे केला. मागील प्रकरणात पाहिल्याप्रमाणे रणभूमीवर पांडवांचे तोंड पश्चिमेकडे आणि कौरवांचे पूर्वेकडे असे. म्हणून कौरवांना सायंकालीन सूर्य पाठीमागे असे; आणि सूर्यास्त केव्हा होतो हे पाहण्यासाठी त्यांना एकसारखे मान मागे वळवून पाहावे लागे. यामुळे जेव्हा जयद्रथाच्या संरक्षकांना (मायावी) सूर्यास्त भासला, तेव्हा जयद्रथ सोडून शेष सर्व कौरव योद्ध्यांनी मागे वळून पाहणे बंद केले. पण एकटा जयद्रथ तरीही मान उंच वळवून मागे पहात राहिला ! हेच महाकवीने श्लोक ७० मध्ये जयद्रथाला अनुलक्षून 'उन्नाम्य वक्त्राणि तदा' या शब्दांनी वर्णन केले आहे ! याप्रमाणे त्याला वेढून असणाऱ्या साऱ्या (मान मागे न वळविता सरळ समोर पाहत राहणाऱ्या) वीरांहून तो स्पष्ट वेगळा दिसू लागला, आणि जयद्रथाचे मागे वळणारे मस्तक अर्जुनाच्या बाणाचे नेमके निशाण होऊ शकले !

* भांडारकर संस्था श्लोक १४ अधिकृत मानीत नाही.

अशा प्रकारे, श्रीकृष्णांच्या या मायेने स्वतः जयद्रथाला सूर्यास्तविषयक भ्रमात पाडले नाही, व तो शेवटपावेतो लढत राहिला. शिवाय त्याच्या संरक्षकांनी जेव्हा (मायावी) सूर्यास्तानंतरही अर्जुनाला लढणें चालू ठेवतांना पाहिले, तेव्हा त्यांनीही प्रतिकार चालू ठेवला; मात्र आता अर्जुनाचा अग्निप्रवेश नक्की होणार या अति आनंदाच्या भरांत त्यांच्या प्रतिकारांत पूर्वीचा निकराचा जोम राहिला नाही; आणि याचा लाभ घेऊन अर्जुनाने जयद्रथाच्या संरक्षकांना पराभूत करून त्याचा वध केला.

एका प्रचलित धारणेनुसार जयद्रथ मायावी सूर्यास्तामुळे फसून रणक्षेत्रावर मुक्त फिरू लागला असता, श्रीकृष्णांनी एकदम आपली माया आवरली, आणि जयद्रथाला वास्तव परिस्थितीची स्पष्ट जाणीव होण्यापूर्वीच अर्जुनाने त्याचा शिरच्छेद केला. पण महाभारतानुसार श्रीकृष्णांनी आपली माया जयद्रथवधानंतर आवरली (पाहा अध्याय १४६ श्लोक १३२,१३३, पुढे उद्धृत). याचा आशय असा होईल की, जर त्या धारणेनुसार स्वतः जयद्रथ त्या मायावी सूर्यास्ताने फसला असेल तर तो पूर्णपणे त्याच भ्रमांत असताना अर्जुनाने त्याचा वध केला व त्यानंतर श्रीकृष्णांनी आपली माया आवरली. पण हा सारा महाभारतातील सूक्ष्म कथनाचा विपर्यास होय. जयद्रथाला सूर्यास्ताविषयी क्षणभरही भ्रम झाला नव्हता. श्रीकृष्णांनी त्याला प्रथम भ्रमांत टाकून निर्धास्त क़ेले, व नंतर एका क्षणार्धासाठी त्याला नाममात्र सूर्य दाखवून, तो पूर्ण सावध होण्यापूर्वीच अर्जुनाला ('हा सूर्य आणि हा जयद्रथ' असे म्हणत) जयद्रथवध करण्यास सांगितले ही सारी निराधार कथा आहे.

**अर्जुनाच्या दोन भिन्न प्रतिज्ञा**

येथे एक प्रश्न उपस्थित होऊ शकेल. या प्रसंगी स्वतः जयद्रथ फसला नसेल, पण निदान त्याचे संरक्षक या मायावी सूर्यास्ताने भ्रमांत पाडले गेले नाहीत काय? मात्र संरक्षक स्वतः याबद्दल श्रीकृष्णार्जुनाविरूद्ध काही तक्रार करत नाहीत हेही आपण पाहिले आहे. त्यांच्या या मौनाचे कारण काय असावे?

यासंबंधात प्रायः दुर्लक्षित महत्त्वाची गोष्ट अशी की, जयद्रथवधार्थ अर्जुनाने दोन वेगळ्या प्रतिज्ञा केल्या होत्या. मी 'उद्या सूर्यास्तापूर्वी' जयद्रथवध करीन अन्यथा अग्निप्रवेश करीन ही वस्तुतः त्याची द्वितीय प्रतिज्ञा होती. याशिवाय, त्याची प्रथम प्रतिज्ञा इतकीच होती की, मी 'उद्या' रणांगणावर जयद्रथवध करीन, अन्यथा मला मरणोत्तर घोर दुर्गती प्राप्त होवो. ही प्रथम प्रतिज्ञा अध्याय ७३ च्या श्लोक २० पासून ४६ च्या पहिल्या ओळीपावेतो



विस्ताराने व्यक्त झाली असून, त्यात सूर्यास्तसमयाचे बंधन नव्हते. फक्त 'श्वः' (श्वो) म्हणजे उद्या (अर्थात प्रत्यक्ष लढाईच्या पुढल्या दिवशी) इतकेच तेथे पुनः पुनः म्हटले आहे.

**ब्राह्मणस्य प्रतिश्रुत्य यो वै लोभात् ददाति न**
**तेषां गतिं गमिष्यामि श्वो न हन्यां जयद्रथम् ।। द्रोणपर्व ७३-४४**
**धर्मादपेता ये चान्ये मया नात्रानुकीर्तिताः**
**ये चानूकीर्तितास्तेषां गतिं क्षिप्रमवाप्नुयाम्।।४५**
**यदि व्युष्टामिमां रात्रिं श्वो न हन्यां जयद्रथम्।४६**

'मी उद्या (म्हणजे प्रत्यक्ष लढाईच्या येत्या दिवशी) जयद्रथाचा वध न केल्यास, उपाध्यायाला (दान) कबूल करून जो नंतर लोभामुळे तें देत नाही त्याची गती माला प्राप्त होईल -४४'. (शेवटच्या तीन ओळींची चर्चा प्रकरण ९ मध्ये केली आहे). आणि यानंतर **अर्जुनाची दुसरी प्रतिज्ञा** प्रारंभ होते.

**इमां चाप्यपरां भूयः प्रतिज्ञां मे निबोधत।।४६**
**वद्यस्मिन्नहते पापे सूर्योऽ स्तमुपयास्यति**
**इहैव सम्प्रवेष्टाहं ज्वलितं जातवेदसम्।।४७**

'याशिवाय, पुनः माझी ही दुसरी प्रतिज्ञाही ऐका. जर या पापी जयद्रथाचा वध (माझ्या हातून) न होता, ('उद्या') सूर्य अस्तास जाईल, तर मी येथेच प्रज्वलित अग्नीत प्रवेश करीन.' येथे महाकवीने स्पष्टपणे 'अपरा प्रतिज्ञा' (दुसरी प्रतिज्ञा) म्हटले आहे; आणि यात सूर्यास्ताचा सर्वप्रथम उल्लेख येतो.

**दोन प्रतिज्ञांमुळे होणारी सूक्ष्मता**

प्रत्येक दिवशी सूर्यास्तावर लढणे थांबवलेच पाहिजे असा नियम नव्हता हे आपण वर पाहिले आहे. अर्जुनाची प्रथम प्रतिज्ञा अशी होती की, मी 'उद्या' लढणे स्थगित होण्यापूर्वी जयद्रथवध करीन (यांत सूर्यास्तमर्यादा नव्हती), अन्यथा मला मरणोत्तर घोर दुर्गति प्राप्त होवो. लढाईच्या प्रत्येक दिवशी उभय पक्ष युद्धविरामाला सहमत होईपावेतो लढणे चालू राहत असे. कोणीही एक पक्ष चाहील तर दुसऱ्या पक्षाने लढाईसाठी उभे राहणे आवश्यक होते. उदाहरणार्थ, जयद्रथवधाच्या दिवशींच (प्रकरण ७ मध्ये 'विश्रामदिनांत एक अपवाद' या सदराखाली दाखविल्याप्रमाणे) सूर्यास्तानंतर अंधाऱ्या रात्रीही लढाई चालू राहिली; आणि मध्यरात्री पांडवांच्या स्थगन प्रस्तावाला कौरवसेनापति द्रोणांनी संमती दिल्यावर लढाई चन्द्रोदयापावेतो स्थगिती झाली. पण पांडवाच्या सूचनेला संमती दिल्याबद्दल दुर्योधनाने द्रोणांना फार दोष दिला. (१८५-१,२,३); यावरून दिसून येते की, त्यावेळेस द्रोणांनी संमती दिली नसती तर पांडवांना त्या

मध्यरात्रीही लढाई चालू ठेवणे भाग होते.

म्हणून आपली पहिली प्रतिज्ञा पूर्ण करून मरणोत्तर दुर्गति टाळण्यासाठी लढाई सूर्यास्तानंतरही चालू ठेवण्याचा अर्जुनाला हक्क होता. उभय पक्षांना हें ज्ञात होते. आता अर्जुनाच्या त्या दोन प्रतिज्ञांचा एकूण परिणाम हा होता. त्या दिवशी सूर्यास्तापूर्वी जयद्रथवध केल्यास अर्जुनाच्या उभय प्रतिज्ञा पूर्ण होऊन, जिवंतपणी अग्निप्रवेश व मरणोत्तर दुर्गती या दोन्हीपासून तो वाचणार होता. आणि त्या दिवशी, पण सूर्यास्तानंतर, त्याने जयद्रथ वध केला असता तर (द्वितीय प्रतिज्ञा विफल झाल्याने), त्या दिवशीचे लढणे स्थगित झाल्यावर त्याला आत्मदाह करावा लागला असता, परंतु (प्रथम प्रतिज्ञा पूर्ण झाल्याने) तो मरणोत्तर दुर्गतीपासून वाचला असता. आणि शेवटी जर सूर्यास्तानंतरही त्याने जयद्रथवध केला नसता तर त्याला त्या दिवशीची लढाई संपल्यावर अग्निप्रवेश करावा लागून शिवाय मरणोत्तर दुर्गतीही प्राप्त झाली असती.

**दुर्योधनाचे प्रमुख उद्दिष्ट**

याप्रमाणे त्या दिवशी सूर्यास्तानंतरही उभय संमतीने लढाई स्थगित होईपावेतो (किंवा दुसरा दिवस उजाडेपावेतो) जयद्रथाच्या जीवितास अर्जुनाकडून धोका होता; आणि त्याला तोपावेतो पूर्ण संरक्षण देण्याचे कौरवांचे कर्तव्य होते. परंतु दुर्योधनाचा सारा प्रयास प्रथम या भोवती केंद्रित होता की, वाटेल ते करून जयद्रथाला सूर्यास्तापावेतो वाचवावे म्हणजे (त्या दिवशीं लढाई स्थगित झाल्यावर) अर्जुनाला स्वतःच अग्निप्रवेश करावा लागेल, आणि तो पांडवपक्षावर वज्राघातच झाला असता. या दृष्टीने जसा सूर्यास्त जवळ येऊ लागला तसे दुर्योधनाने कर्णास म्हटले-

**अल्पावशेषो दिवसो नृवीर**
**विधातयस्वाद्य रिपुं शरौघैः**
**दिनक्षयं प्राप्त नरप्रवीर**
**ध्रुवो हि नः कर्ण जयो भविष्यति।। द्रोणपर्व, १४५-१३**
**सैन्धवे रक्षमाणे तु सूर्यस्यास्तमनं प्रति**
**मिथ्याप्रतिज्ञः कौन्तेय प्रवेक्ष्यति हुताशनम्।।१४**
**अनर्जुनायां च भुवि मुहूर्तमपि मानद**
**जीवितुं नोत्सहेरन् वै भ्रातरोऽस्य सहानुगाः।।१५**
**कथं जीवति दुर्धर्षे त्वयि राधेय फाल्गुनः**
**अनस्तंगत आदित्ये हन्यात् सैन्धवकं नृपम्।।१९**



'नरवीर कर्णा, थोडासाच दिवस उरला आहे. तू शत्रूचा* बाणवर्षावाने निःपात करून टाक; नरश्रेष्ठा, (अशा स्थितीत) दिवस संपला की, आमचा जय निश्चित होईल-१३. सूर्यास्तापर्यंत जयद्रथाचे रक्षण केले तर अर्जुनाची प्रतिज्ञा खोटी ठरेल व तो अग्निप्रवेश करील.-१४. माननीय कर्णा, भूतलावरून अर्जुन नष्ट झाला की, त्याच्या बंधूंत व अनुयायांत एक मुहूर्तदेखील जिवंत राहण्याचा उत्साह उरणार नाही १५. कर्णा, अजिंक्य असा तू प्रत्यक्ष जिवंत असता, अर्जुन सूर्यास्तापूर्वी राजा जयद्रथाला कसा मारू शकेल? -१९.'

दुर्योधन अर्जुनाच्या प्रतिज्ञेचे उभय भाग जाणत नव्हता असे नाही. अन्यथा सूर्यास्ताचे (मायावी) दृश्य पाहिल्यावरही अर्जुनाला लढाई चालू ठेवताना पाहून, तो व त्याचे अनुयायी तत्काळ अर्जुनाच्या अग्निप्रवेशाचा आग्रह करू लागले असते, आणि त्याच वेळी स्वतः आकाशात सूर्य पाहणाऱ्या जयद्रथाच्या ध्यानात ती परिस्थिती येऊन त्याने त्यांना सावध केले असते ! पण या प्रसंगावर लिहिणारे अनेक लेखक (मायावी) सूर्यास्त पाहताच कौरवांनी लढणे सोडून अर्जुनाच्या अग्निप्रवेशाचा आग्रह धरला असे म्हणत असले, तरी महाभारतात तसे नाही. उलट, त्या सूर्यास्तानंतरही अर्जुनाला लढताना पाहून तेही ढिलाईने का होईना पण प्रतिकार करीत राहिले हें वर उद्धृत श्लोकांवरून दिसून येईल.

**कौरव योद्धे कर्तव्यच्युत झाले**

मात्र आता आजचे लढणे केव्हाही स्थगित झाल्यावर अर्जुनाचा अग्निप्रवेश निश्चित आहे या कल्पनेने कौरव योद्ध्यांना अपार हर्ष झाला. एकदा जयद्रथाला सूर्यास्तापावेतो वाचविले की त्यानंतर शेष लढाईविषयी दुर्योधनाला फारशी चिंता नव्हती. अर्जुनाचा अग्निप्रवेश निश्चित झाल्यावर त्या दिवशी लढाई आणखी काही वेळ चालू राहिली, तरी पांडव अतिहताश होऊन शेवटी कौरवांचा विजय निःसन्देह होणार असा त्याला विश्वास होता. या दृष्टीने दुर्योधनादींचे सारे लक्ष सूर्यास्तावर (१४५-४५,५६,५७), आणि स्वतःच्याच प्रतिज्ञेत सापडून अर्जुनाने स्वहस्ते मरावे, यावर केंद्रित होते.

म्हणून जयद्रथाच्या त्या महारथी संरक्षकांना (मायावी) सूर्यास्त दिसताच आपले अत्यंत ईप्सित उद्दिष्ट साध्य झाले असे वाटले; आणि त्या अत्यानंदात जरी त्यानंतर ते अर्जुनाशी लढत राहिले तरी त्यांच्या प्रतिकाराची तीव्रता कमी

* येथे शत्रू म्हणजे केवळ अर्जुनच नसून, त्याच्या साह्यार्थ येऊन पोचलेले सात्यकि व भीम ही आहेत. खास अर्जुनाचा (त्याच्या संभाव्य अग्निप्रवेशासह) वेगळा उल्लेख पुढल्या श्लोकात आहे.

झाली. वस्तुतः सूर्यास्तानंतरही त्या दिवशी लढाई स्थगित होईपावेतो जयद्रथाचे पूर्ण संरक्षण करणे हे त्यांचे कर्तव्य होते. पण आता आजची लढाई थांबल्यावर अर्जुनाचा स्वहस्ते अग्निप्रवेश आहे या तामसी विचाराने ते इतके हर्षमग्न झाले की, जयद्रथाच्या संरक्षणार्थ अर्जुनाचा प्रतिकार करण्यात त्यांची एकनिष्ठता कमी झाली; आणि याचा फायदा घेऊन अर्जुनाने शौर्याची पराकाष्ठा करीत त्या सर्व महारथ्यांना पराभूत केले, व जयद्रथावर अंतिम धावा केला.

या परिस्थितीत कौरवांनी अर्जुनाच्या बाणाने जयद्रथाचे मस्तक उडविलेले पाहिले तेव्हा त्यांना साहजिकच फार दुःख झाले. पण यानंतर जेव्हा लागलीच श्रीकृष्णांनी माया आवरली, व सर्वांनी अस्ताकडे जाणारा सूर्य पुनः आकाशात पाहिला, तेव्हा जयद्रथही मारला गेला व तिकडे अर्जुननाशही झाला नाही, हें पाहून कौरवांच्या दुःखास पारावार राहिला नाही !

**ततो विनिहते राजन् सिन्धुराजे किरीटिना**
**तमस्तद् वासुदेवेन संहृतं भरतर्षभ।।द्रोणपर्व, १४६-१३२**
**पश्चाज्ज्ञातं महीपाल तव पुत्रैः सहानुगैः**
**वासुदेवप्रयुक्तेयं मायेति नृपसत्तम।।१३३**
**हतं जयद्रथं दृष्ट्वा तव पुत्रा नराधिप**
**दुःखादश्रूणि मुमुचुर्निराशाश्चाभवन्जये।।१३५**

"भरतश्रेष्ठा (धृतराष्ट्र), अर्जुनाने जयद्रथाचा वध केल्यावर श्रीकृष्णाने तो (मायावी) अंधार दूर केला- १३२. राजोत्तमा, मागाहून तुमच्या पुत्रांना व त्यांच्या अनुयायांना माहीत झाले की, ती श्रीकृष्णनिर्मित माया होती-१३३. राजा, जयद्रथ मारला गेलेला पाहून तुमचे पुत्र दुःखाने अश्रुपात करू लागले आणि (अर्जुनाचा अग्निप्रवेशही टळल्याने) आपल्या विजयाबद्दल निराश झाले-१३५". परंतु अर्जुनाच्या अग्निप्रवेशाच्या कल्पनेने उत्पन्न तामसी अत्यानंदाने त्यांच्या स्वतःच्या कर्तव्यतत्परतेत आलेल्या ढिलाईमुळे अर्जुनास जयद्रथवध करणे संभव झाले, म्हणून नंतर त्या संबंधात कृष्णार्जुनांना दोष देण्यास त्यांचे जवळ तोंड नव्हते.

**श्रीकृष्णमायेची घटना प्रक्षिप्त नाही**

मायावी सूर्यास्ताचा वृत्तांत महाभारतातील जयद्रथवधाच्या प्रसंगाशी पूर्ण सुसंगत असून मूळ महाभारताचाच भाग आहे. तें सारे वर्णन प्रक्षिप्त आहे ही कांही जणांची कल्पना निराधार आहे. अर्जुनाच्या प्रतिज्ञेची वार्ता कौरवांकडे पोचताच तत्काळ पुढील दिवसाच्या लढाईत रणक्षेत्रावर जयद्रथाच्या संपूर्ण संरक्षणाची योजना आखण्यात आली. त्याची माहिती हेरांकडून कळताच



श्रीकृष्णांनी अर्जुनास बजावले की, जयद्रथाच्या रक्षणार्थ अगदी शेवटीही सहा अतिमहारथी उभे राहणार असून, काही विशेष केल्याशिवाय अर्जुन त्या सर्वांना पराभूत करू शकणार नाही (७५- २८,२९,३०). आणि स्वतः श्रीकृष्णही सचिंत होऊन दारुकास म्हणाले-

**सोऽहं श्वस्तत् करिष्यामि यथा कुन्तीसुतोऽर्जुनः।।७९-२५**
**अप्राप्तेऽ स्तं दिनकरे हनिष्यति जयद्रथम्...।।२६**

'यासाठी मी 'उद्या' असे काही करीन की, जेणेकरून कुन्तीपुत्र अर्जुन सूर्यास्तापूर्वी जयद्रथवध करू शकेल.' आणि याला अनुसरूनच श्रीकृष्णांनी शेवटच्या क्षणी मायावी सूर्यास्त निर्माण केला. व त्यामुळे जयद्रथाचे संरक्षक आपल्या आनंदात मग्न होऊन कर्तव्यभ्रष्ट झाले. जे या मायावी सूर्यास्ताला प्रक्षिप्त मानतात ते श्रीकृष्णांचे हे पूर्वीचे (व पुढेही उल्लेखित आणखी) उद्गार प्रक्षिप्त मानीत नाहीत. पण त्या मायावी सूर्यास्ताशिवाय ते उद्गार निरर्थक ठरणार नाहीत काय?

श्रीकृष्णांनी जयद्रथाच्या महारथी संरक्षकांविषयी अर्जुनाला आधीच शिबिरात जी चेतावणी दिली होती, तीच (आणि जवळजवळ त्याच शब्दांत) त्यांनी नंतर रणभूमीवर मायावी सूर्यास्त निर्माण करताना पुनः दिली (वर उद्धृत श्लोक १४६-६२,६३). असे असता पूर्वीचे श्लोक मूळ महाभारताचे मानावयाचे, पण नंतरचे अमान्य करावयाचे, हें सुसंगत कसे ठरेल? स्वतः अर्जुनानेही (वर दाखविल्याप्रमाणे) जयद्रथाला वेढणाऱ्या संरक्षकांच्या समुदायात मी ऐन वेळी नक्की त्याच्यावर नेम कसा धरू शकेन ही चिंता श्रीकृष्णाजवळ व्यक्त केली होती, आणि तिचेच अचूक निराकरण श्रीकृष्णांनी मायावी सूर्यास्ताच्या द्वारे केले.

मायावी सूर्यास्ताला प्रक्षिप्त मानण्याचा भरात भांडारकर शोध संस्थेने अध्याय १४६ मधील (वर उद्धृत) श्लोक ६२ पाहून १०४ च्या प्रथम ओळीपावेतो पूरे वर्णन काढून टाकले आहे; व अशा रीतीने श्लोक ६१ मध्ये श्रीकृष्णाचे अर्जुनाशी भाषण प्रारंभ होण्याचा जो उल्लेख आहे त्याचा सरळ संबंध श्लोक १०४ च्या द्वितीय पंक्तीत प्रारंभ होणाऱ्या श्रीकृष्णांच्या भाषणाशी लावला आहे. पण वस्तुतः श्रीकृष्णांची अर्जुनाशी हीं दोन भिन्न भाषणें होतीं. आणि तें एकच भाषण मानून मधले सर्व श्लोक प्रक्षिप्त मानल्याने, असेही काही श्लोक काढले जातात की ज्यांचा मायावी सूर्यास्ताशी संबंध नाही. उदाहरणार्थ, श्लोक १०१,१०२,१०३ मध्ये जयद्रथवधार्थ अर्जुनाने जो अंतिम दिव्यास्त्रमंत्रित बाण सोडला त्याचे वर्णन आहे. भांडारकर संस्था ते श्लोकही वगळते; मात्र

यानंतर त्याच बाणाचे श्लोक १२० व १२१ मध्ये आलेले वर्णन अधिकृत मानते. पण ते पूर्वीचे व नंतरचे श्लोक परस्पर पूर्ण सुसंगत आहेत. इतकेच नव्हे तर नंतरच्या श्लोकात अर्जुनाने तो अंतिम बाण धनुष्यावर केव्हा व कसा चढवला याचेच सुन्दर कथन आहे. असे असतां, ते पूर्वीचे श्लोक मायावी सूर्यास्ताच्या वृत्तांतात आले आहेत, आणि तें सूर्यास्त दृश्य (त्याचें वास्तविक स्वरूप व रहस्य ध्यानात न आल्याने) कसेही करून नाकारावयाचें, म्हणून ते मधले अन्य सुसंगत श्लोकही महाभारतातून काढणे कसे उचित ठरेल?

मायावी सूर्यास्ताची घटना नाकारणारे काही जण म्हणतात की, त्या समयी आकाशात ढगांनी सूर्य झाकला जाऊन क्षणभर सूर्यास्ताचा भास झाला असावा. परंतु तो दिवस वर्षा ऋतूचा नसून मार्गशीर्ष महिन्यातील वद्य पक्षाचा होता. आणि त्या दिवशी आकाशात ढग, व तेही सूर्याला संपूर्ण झाकून सूर्यास्ताचा आभास निर्माण करतील इतके दाट व विशाल, असण्याचा काहीही संकेत महाभारतात नाही. इतकेच काय, पण उलट त्या दिवशी अपराण्ह प्रहरी सूर्याचे ऊन कडक पडले होते असा महाभारतात उल्लेख आहे ! (द्रोणपर्व १२५-५१, प्रकरण १७ मध्ये उद्धृत).

श्रीकृष्णांची ती माया नाकारू चाहणारे काही अन्य म्हणतात की, त्यावेळी खग्रास सूर्य ग्रहण लागले असेल. परंतु असे असते, तर पंचांगातून सर्वांना त्याची आधीपासून माहिती असती, आणि कोणालाही सूर्यास्ताविषयी भ्रम होण्याचे कारण नव्हते. याशिवाय, सूर्यग्रहण अमावास्येलाच होतें, आणि त्या दिवशी अमावास्या होती काय?

महाभारतकार महाकवीने जयद्रथवधाच्या प्रसंगी श्रीकृष्णांनी केलेल्या अद्‌भुत मायेचे सूक्ष्म मार्मिक वर्णन दिले असून, त्या मायाप्रयोगाचा मूळ उद्देश व रहस्यमय स्वरूप यथोचित ध्यानांत घेणे आवश्यक आहे. तसें न करतां, जयद्रथाला अंधारात ठेऊन व तो बेसावध असतां मारल्याचा श्रीकृष्णार्जुनांवर आरोप करणें पूर्ण निराधार आहे. ❐



प्रकरण १९

# आणखी एक संख्यात्मक कूट

## अर्जुनाजवळ गांडीव धनुष्य असण्याचा काळ

कौरवांनी गोग्रहणार्थ विराटनगरावर केलेल्या आक्रमणप्रसंगी अज्ञातवास संपवून अर्जुन प्रकट झाला, त्यावेळी विराटपुत्र उत्तराशी झालेल्या संभाषणातही महाकवीने अर्जुनाच्या तोंडी एक संख्यावाचक कूट घातले आहे. त्या दिवशी सूर्योदयाच्या सुमारास त्या आक्रमणाची वार्ता नगरात आल्यावर राजकुमार उत्तर बृहन्नला- रूपी अर्जुनास सारथी करून कौरवांशी युद्ध करण्यास निघाला (प्रकरण १). पण प्रत्यक्ष कौरव सैन्य पाहिल्यावर तो घाबरून मागे वळू लागला. तेव्हा अर्जुनाने त्याला पकडून ठेवले, व मी स्वतः कौरवाशी लढेन, तू माझे सारथ्य कर असें म्हटले. यानंतर अर्जुनाने पांडवांनी अज्ञातवास प्रारंभवेळी नगराबाहेर एका वृक्षावर लपवून ठेवलेली शस्त्रे उत्तराकडून काढविली; आणि (अद्याप स्वतःचा खरा परिचय न देता) तो त्या शस्त्रांची माहिती उत्तरास देऊ लागला. त्यात आपल्या सुप्रसिद्ध गांडीव धनुष्याविषयी अर्जुन म्हणाला की, हे धनुष्य पूर्वी ब्रह्माने एक हजार वर्षे, प्रजापतीने पाचशे तीन वर्षे, इन्द्राने ८५ वर्षे, राजा सोमाने पाचशे वर्षे व वरुणाने शंभर वर्षे धारण केले होते (विराट पर्व, ४३-१,५,६); आणि इतके सांगून अर्जुनाने पुढे म्हटले-

**पार्थः पंच च षष्टिं च वर्षाणि श्वेतवाहनः।।३-६**

"(आणि) ज्याच्या रथाचे घोडे श्वेत असतात त्या अर्जुनाने (या धनुष्याला) 'पंच च षष्टिं च' वर्षे (धारण केले आहे)".

येथे 'पंच च षष्टिं च' शब्दांनी अभ्यासकांत मोठा प्रश्न उपस्थित केला आहे. त्याचा नेहमीचा अर्थ 'पाच अधिक साठ अर्थात पासष्ट' असा आहे. पण महाभारतात अर्जुनाला गांडीव धनुष्य प्राप्त होण्याचा जो काळ दिला आहे, तेथपासून या संभाषणापावेतो पासष्ट वर्षे होणे अशक्य आहे. अर्जुनाने अग्निदेवाच्या सूचनेवरून खांडव वन जाळले (व ते स्थान मानव वसतीस सुलभ केले), त्यावेळी अग्नीने तें धनुष्य वरुणाजवळून आणून अर्जुनास दिले होते (आदिपर्व

अध्याय २२४). यानंतर मयासुराने पांडवांसाठी विशाल सभागृह निर्माण केले. भीम, अर्जुन, नकुल, व सहदेव यांनी चारी दिशांनी भारतभर महान विजय केले. आणि त्यानंतर युधिष्ठिराने राजसूय यज्ञ केला. तो यज्ञ दोन वर्षे चालतो.* त्या यज्ञसमाप्तीनंतर काही महिन्यांनीच द्यूत होऊन पांडवांचा वनवास- अज्ञातवास प्रारंभ झाला; आणि त्याचे तेरावे वर्ष आता पूर्ण झाले. याप्रमाणे पाहता अर्जुनाला गांडीव धनुष्य प्राप्त होऊन या वेळेपावेतो पासष्ट वर्षे जाणें असंभव होते.

या असंभवाची आणखी एक पुष्टि आहे. कुरुक्षेत्रांवरील युद्धात अभिमन्यु मारला गेला तेव्हा तो सोळा वर्षांचा होता असे आदिपर्वातील पुढील श्लोकांत दर्शविले आहे. असुरनाशार्थ इन्द्राचा अंश पृथ्वीवर पांडुपुत्र अर्जुन रूपाने जन्म घेईल असे चन्द्राने (सोमाने) देवांस सांगून पुढे म्हटले की, माझा पुत्र वर्चा अर्जुनपुत्र अभिमन्यु रूपांने जन्म घेईल.

**तस्यायं भविता पुत्रो बालो भुवि महारथः**
**ततः षोडश वर्षाणि स्वास्थ्यत्वमरसत्तमाः ।। आदिपर्व, ६७-११७**
**अस्य षोडषवर्षस्य स संग्रामो भविष्यति**
**यत्रांशाः वः करिष्यन्ति कर्म वीरनिषूदनम्।।११८**

'श्रेष्ठ देवांनो, हा (माझा पुत्र वर्चा) त्याचा (अर्जुनाचा) पुत्र म्हणून पृथ्वीवर जन्म घेईल आणि बालवयातच महारथी मानला जाईल; त्यानंतर (तेथे) हा सोळा वर्षे राहील-११७. याच्या सोळाव्या वर्षी तें (कौरव- पांडव) युद्ध होईल, ज्यात तुमच्या अंशापासून उत्पन्न योद्धे शत्रुवीरांचा निःपात करणारे कर्म करतील-११८.' चन्द्राचे आणखी म्हटले की, त्या युद्धांत एक दिवस हा (अभिमन्यु) चक्रव्यूहांत प्रवेश करून महापराक्रम केल्यावर मारला जाईल. महाभारतानुसार अर्जुनाचा द्वारकेत सुभद्रेशी विवाह होऊन तो तिच्यासह इन्द्रप्रस्थास परत आल्यावर अभिमन्यूचा जन्म झाला; व त्यानंतर खांडववनदहन झाले. यानंतर वर सांगितल्याप्रमाणे राजयूस यज्ञ, द्यूत व शेवटी पांडवांचा वनवास- अज्ञातवास झाला. आणि तो समाप्त होतांच गोग्रहण युद्ध झाले (ज्याच्या आरंभी वर उद्धृत केल्याप्रमाणें अर्जुनाने गांडीव धनुष्य धारण करण्याचा तोपावेतोचा आपला काळ सांगितला). आणि यानंतर सुमारे सात महिन्यांनी कुरुक्षेत्रावरील युद्धांत अभिमन्यूचा वध झाला. याप्रमाणेही, खांडवदाहप्रसंगी

* पाहा काणे, पूर्वे उल्लेखित Vol II, pp1214 -23 and Vol III, p.962; व शतपथ ब्राह्मण पंचम काण्ड.



अर्जुनास गांडीव धनुष्य प्राप्त झाल्यापासून गोग्रहण युद्धापावेतो सुमारे पंधरा वर्षे मोजली, तर अभिमन्यूचे एकंदर आयुष्य आदिपर्वातील वरील श्लोकांत म्हटल्याप्रमाणे सोळा वर्षे होऊ शकते. तो काळ पासष्ट वर्षाइतका वाढविणे संभव नाही. मग महाभारतकार विराटपर्वाच्या श्लोक ४३-९ मध्ये अर्जुनाच्या द्वारे तो काळ 'पंच च षष्टिं वर्षाणि' कसा म्हणतात?

**विविध तर्क**

भाष्यकार नीलकंठ येथे 'वर्ष' म्हणजे 'वर्षा' (पर्जन्यवृष्टि) असा अर्थ करून अशा दोन वर्षांचे एक पूर्ण संवत्सर रूपी वर्ष मोजु चाहतात. या हिशोबाने पासष्ट 'वर्षाणि' म्हणजे $32\frac{1}{2}$ वर्षे होतात. पण वरील अवधीत साडे बत्तीस वर्षे तरी कोठे होतात?

दप्तरी एक वेगळेच स्पष्टीकरण देतात,'Therefore we have to take it that the period sixtyfive 'varshas' is counted from the burning of the forest to the end of Arjuna's life. Arjuna lived 22 years after the war as the eclipses prove and we can suppose that $21\frac{1}{2}$ years passed between the burning of the forest and the War. In making the number 65 the latter period appears to have been doubled before it is added to the former $[22+(2\times21\frac{1}{2})=65]$. This mistake might have happened in this way. The latter period may have been stated somewhere as 43 and being misunderstood as meaning 43 years it was added to २२ years of the former period. This is the explanation of 65 and no better explanation suggests itself.' (पू.उ.pages 92-93). दप्तरींना अर्जुनाच्या वचनात आकड्यांची काही चूक झाल्याचे वाटते ! आणि ती दाखविण्यासाठी ते कुरुक्षेत्रावरील युद्धानंतर अर्जुन बावीस वर्षे जगला असे गृहीत धरतात; मात्र महाभारतानुसार तो काळ ३६ वर्षे होता. (पाहा स्त्रीपर्व २५-४४,४५; मौसल

पर्व १-२). पण तें असो. खांडववनदाह व महायुद्ध या दरम्यानच्या वर्षाची दुप्पट करून ती त्या तथाकथित २२ वर्षांन जोडून एकूण बेरीज अर्जुनाच्या तोडी कोण कशाला घालील? आणि विराट राजपुत्र उत्तराला गांडीव धनुष्याचा परिचय देताना अर्जुन आपल्या निधनापावेतोचा काळ कशाला मोजेल? आपला निधनसमय त्याला आधीच माहीत तरी होता काय? काही अन्य लेखक यावेळी अर्जुनाचे वय पासष्ट वर्षे असावे असाही तर्क करतात. पण गांडीव धनुष्य अर्जुनाजवळ जन्मापासून नव्हते; आणि वरील श्लोकात तें त्याच्याजवळ कधीपासून होते हे सांगितले असून त्याचा अर्जुनाच्या जन्मसमयाशी काही संबंध नाही.

**कूटाचे स्पष्टीकरण**

खरे म्हणजे महाभारतकारांनी येथे पुनः एक शाब्दिक श्लेष केला आहे. वरील वचनात 'षष्टिं' चा अर्थ साठ नसून, त्याचा विग्रह 'षष्+टिं' (टिम्) असा आहे! पैकी 'षष्' चा अर्थ सहा होतो. बाकी उरले 'टिम्'. संस्कृत मध्ये 'क' चा उपयोग एक या संख्येसाठीही होतो. या क्रमाने 'ख' म्हणजे दोन, 'ग' म्हणजे तीन असें होत 'ट' चा अर्थ अकरा होतो. प्राचीन ज्योतिषशास्त्रज्ञ आर्यभट्टांनी या अक्षरांचा असा प्रयोग केला आहे.* आता 'वर्षाणि' शब्द नपुंसकलिंगात आहे. म्हणून महाकवीने 'ट' चे रूपांतर नपुंसकलिंगात (किम् प्रमाणे) 'टिम्' केले, व त्याचा 'षष्' शी संधी करून 'षष्टिम्' शब्द तयार केला! याप्रमाणे 'पंच च षष्टि च' याचा अर्थ होतो, पाचसहा (अथवा सुमारे साडेपाच) अधिक अकरा, एकूण सोळा-सतरा! आणि अर्जुनाला तें धनुष्य प्राप्त होऊन या वेळपावेतो सुमारे इतकीच वर्षे होऊ शकतात हे आपण वर पाहिले आहे.

कदाचित कोणी शंका घेईल की, 'च' चा अर्थ 'आणि' असतां, मी येथे 'पंच च षष्' चा अर्थ पाच किंवा सहा (पाच-सहा) करीत आहे. परंतु संस्कृत पद्यात 'च' अनेक वेळा केवळ पादपूरणार्थ येतो; म्हणून तो 'च' वगळून 'पंच-षष्' (पाच-सहा) असा (शांतिपर्वातील उपरोल्लेखित 'पंच-षट्' प्रमाणे) एक जोडशब्द होऊ शकतो. या शिवाय 'च' चा उपयोग एक संभाव्य विकल्प या अर्थानेही कधी कधी होतो.

पण यासंबंधात एक वेगळेही स्पष्टीकरण शक्य आहे. वर आदिपर्व ६७-११७,११८ च्या आधारे मृत्युसमयी अभिमन्यूचे वय सोळा वर्षे मानले आहे. पण

* पाहा, डॉ. गोरखप्रसाद कृत 'भारतीय ज्योतिष का इतिहास' (हिंदी) पृ. ७७-८२; आणि ओककृत 'गीर्वाण लघुकोश'.



महाभारतात अन्यत्र अभिमन्यूचे जे उल्लेख आहेत, त्यात युद्धसमयी त्याचे वय वर्षात न देता, त्याला 'अप्राप्तयौवन,' 'शिशु', 'अर्भक', 'युवा', 'तरुण' आदि म्हटले आहे. यातील काही विशेषणे उघडच वात्सल्यप्रेरित असून वयाच्या दृष्टीने अर्थवादात्मक आहेत. म्हणून अभिमन्यूने युद्धात केलेला महान पराक्रम व अन्यही काही घटना विचारात येता, काही अभ्यासकांच्या मते त्याचे मृत्युसमयी वय सोळापेक्षा अधिक असावे. भांडाकर शोध संस्थेने सोळा वर्षांचा उल्लेख करणारे वरील दोन श्लोक अधिकृत मानले नाहीत. पांडवांच्या वनवासापूर्वी (किंबहुना राजसूय यज्ञापूर्वी) अभिमन्यूचा उपनयन संस्कार झाला होता (आदिपर्व २२०-८७), आणि राजसूय यज्ञ समाप्त झाल्यावर काही सन्मान्य विशेष आमंत्रित परत जात असताना, त्यांच्याबरोबर पांडवांतर्फे राज्याच्या सीमेपावेतो सादर जाण्याइतके (सभापर्व, ४५-४९) अभिमन्यूचे वय होते; हें पाहतांही त्याचें वय सोळा वर्षापेक्षा अधिक मानले जाऊ शकते.

याशिवाय, वर सांगितल्याप्रमाणे खांडवदाहाच्या काहीसे पूर्वी अभिमन्यूचा जन्म झाला; आणि खांडवदाहाचे 'महान कर्म' केल्यानंतर अर्जुनापासून द्रौपदीस पुत्र झाला (आदिपर्व २२०-८३). त्यानंतर एक वर्षांने द्रौपदीस नकुलापासून, व आणखी एक वर्षांने सहदेवापासून पुत्र झाला (पाहा आदिपर्व २२०-८६). याप्रमाणे अभिमन्यु व त्या नकुलसहदेवपुत्रांच्या जन्मकाळांतील अंतर पाहता, अभिमन्यूचे वय जर मृत्युसमयी सोळा वर्षे असेल, तर त्या नकुलसहदेवपुत्रांचे वय युद्धांत सुमारे चौदा व तेरा वर्षेच येईल. परंतु या सर्व पांडुपुत्रांनी यापूर्वी बारा वर्षे पूर्ण विद्याभ्यास करून शस्त्रास्त्रविद्या प्राप्त करण्यात घालविली होती-

**एते द्वादश वर्षाणि क्रीडामुत्सृज्य बालकाः**
**अस्त्रार्थमवसन् भीष्मे बिभ्रतो व्रतमुत्तमम्।। द्रोणपर्व १०-५२**

'या बालकांनी बारा वर्षे क्रीडा सोडून उत्तम विद्यार्थीव्रत पालन करीत अस्त्रविद्या प्राप्ती साठी कठोर वातावरणांत घालविली होती.' वरीलप्रमाणे

* या श्लोकांत 'भीष्मे'चा अर्थ 'भीष्मांजवळ' असा नाही. पांडवपुत्र भीष्मांजवळ अस्त्रविद्या शिकण्यास कधीच नव्हते. म्हणून तेथे 'भीष्मे' चा अर्थ 'संयमित कठोर वातावरणांत' असा दिसतो. 'भीष्म' शब्दाचा 'भीषण', 'भयंकर', 'कटोर' या अर्थी उपयोग स्त्रीपर्व २३-१४ मध्ये आला आहे; किंबहुना तो त्याचा मूळ अर्थ आहे. ही बारा वर्षे पांडवांच्या वनवास-अज्ञातवास कालातील असली पाहिजे; त्यावेळी शैशवावस्थेत अभिमन्यु आपल्या पित्यापासून आणि द्रौपदीपुत्र मात्यापित्यापासून, दूर राहून द्वारकेस शिक्षण घेत होते.

वयगणना केली तर, (स्वतः अभिमन्यूचा, आणि युधिष्ठिर, भीम, व अर्जुन यांच्या द्रौपदीपुत्रांचा, विचार बाजूस ठेवला तरी) निदान नकुलसहदेवपुत्रांच्या बाबतीत हें बारा वर्षे शिक्षणाचे विधान खरे ठरू शकणार नाही. या दृष्टीनेही युद्धात मृत्युसमयी अभिमन्यूचे वय सोळा वर्षापेक्षा अधिक मानणें संभव होईल. हें मत स्वीकारले, तर 'पंच च षष्टिं च' याचा अर्थ ('टिम्' च्या वर दिलेल्या स्पष्टीकरणानुसार) ५ +६ + ११= २२ असा होऊ शकतो. आणि अभिमन्यूजन्मापासून राजसूय यज्ञापावेतो सात वर्षे (यांत त्याचा उपनयन संस्कार), नंतर यज्ञाची दोन वर्षे, (मध्यंतरी काही महिने), त्यानंतर वनवास - अज्ञातवासाची तेरा वर्षे, आणि त्यानंतर महायुद्धांत अभिमन्यूच्या मृत्यूपावेतो सुमारे सात आठ महिने, अशी गणना केली तर, अभिमन्यूचे एकूण आयुष्य सुमारे तेवीस वर्षे येऊन, अर्जुनाजवळ (खांडवदाहप्रसंगी) गांडीव धनुष्य आल्यापासून गोग्रहण युद्धापावेतोचा काळ सुमारे बावीस वर्षे येतो.

पण 'पंच च षष्टिं च' च्या वर सुचविलेल्या दोन अर्थांपैकी कोणताही स्वीकारला, तरी त्याचा अर्थ 'पासष्ट' नाही (व ते शब्द वापरण्यात महाभारतकारांनी गणिताची काहीही चूक किंवा उलटापालट केली नाही !) यांत संशय नाही. ❐



प्रकरण २०

# द्रोणाचार्य आणि एकलव्य

द्रोणाचार्य- एकलव्य कथा महाभारताच्या आदिपर्वांत आली आहे. द्रोण व पांचाल देशाचां राजपुत्र द्रुपद विद्यार्थी दशेंत मित्र होते. त्या वेळी द्रुपदाने द्रोणास वचन दिले की मी राजा झाल्यावरही मैत्री कायम ठेवीन. पुढे तो सिंहासनस्थ झाल्यावर एक दिवस द्रोण त्या वचनाचे स्मरण ठेवून त्याच्याकडे गेले; पण त्याने उद्धटपणे द्रोणांचा अपमान करून म्हटले की, निर्धन सामान्य माणसानें राजाशी मैत्रीची अपेक्षा करणें मूर्खपणाचे आहे. यावर धनुर्विद्येत पूर्ण पारंगत असलेल्या द्रोणांनी विचार केला की, काही चांगले शिष्य तयार करून त्यांच्या द्वारे द्रुपदाला धडा शिकवावा.

या उद्देशाने फिरत फिरत द्रोण कुरुकुलाची राजधानी हस्तिनापुरला आले. तेथे त्यांचे शालक कृप शिक्षक होते. तोपावेतो राजा पांडु मरण पावला असून, विधवा कुंती पाच बालक पांडुपुत्रांसह हस्तिनापुरी येऊन धृतराष्ट्र-गांधारी जवळ राहत होती. धृतराष्ट्र अंध असल्याने राज्याचा कारभार भीष्म चालवीत होते. पाच पांडव आणि शंभर धार्तराष्ट्र यांचे एकत्र शिक्षण चालू होते.

धनुर्विद्येचे श्रेष्ठ ज्ञाते द्रोणाचार्य स्वतः हस्तिनापुरास आल्याचे माहीत झाल्यावर, भीष्मांनी त्यांना विनंती केली की, त्यांनी कुरुकुलांतील राजपुत्रांना उच्च धनुर्विद्या शिकवावी. भीष्मांनी द्रोणांच्या निवासाची व उपजीविकेची उत्तम व्यवस्था करून दिली (आदिपर्व १३१-३). अशा प्रकारे द्रोणांनी हस्तिनापुरला कौरव पांडव राजपुत्रांचे आचार्य म्हणून कार्य प्रारंभ केले. आसपासचे अन्यही विद्यार्थी त्यांचे जवळ येऊन धनुर्विद्या शिकू लागले.

**एकलव्याचा प्रवेश**

या पार्श्वभूमीत एकलव्य आचार्य द्रोणांकडे आला.

**ततो निषादराजस्य हिरण्यधनुष्यः सुतः**
**एकलव्यो महाराजे द्रोणमभ्याजगाम ह।। आदिपर्व १३१-३१**

(वैशंपायन म्हणाले), 'महाराज (जनमेजय), यानंतर निषाद राज्याचा राजा हिरण्यधनु याचा पुत्र एकलव्य द्रोणापार्शी (धनुर्विद्या शिकण्यासाठी) आला.' परंतु -

**न स तं प्रतिजग्राह नैषादिरिति चिन्तयन्**
**शिष्यं धनुषि धर्मज्ञस्तेषामेवान्ववेक्षया।।१३१-३२**

'कर्तव्यनिष्ठ द्रोणाने हा नैषादि म्हणजे निषाद राज्याचा राजपुत्र आहे हे ध्यानांत घेऊन, केवळ त्यांचा (कुरुकुलाच्या राजपुत्रांच्या हिताचा) विचार करून त्याला (एकलव्याला) धर्नुविद्येसाठी शिष्य म्हणून स्वीकारले नाही.' येथे महाकवीने 'तेषाम् एव अन्ववेक्षया' म्हटले आहे. हाच शब्दप्रयोग आदिपर्व ३०-५ मध्यें गरुड व बालखिल्य ऋषि यांच्या कथेतही आला असून, तेथे त्याचा अर्थ 'केवळ त्यांचा (ऋषींचा) (त्यांच्या सुरक्षिततेचा) विचार करून' असा आहे. प्रस्तुत संदर्भात 'तेषाम्' (त्यांचा) शब्दाचा संबंध हस्तिनापुरच्या राजपुत्रांशी आहे; तीन श्लोकांपूर्वीच (१३१-२९) 'कौरवान्' (कुरुकुलाचे वंशज) शब्दाने त्यांचा उल्लेख आला आहे. एकलव्य एका परराजाचा पुत्र होता; आणि याचा विचार करून हस्तिनापुरचे कर्तव्यनिष्ठ सेवक असलेल्या द्रोणांनी एकलव्याला धनुर्विद्या शिकविण्यास नकार दिला. एकलव्य 'निषाद' जातीचा होता येवढ्यासाठींच द्रोणांनी तो नकार दिला हा आरोप चूक आहे.

**स्वाभिमानी ईमानदार द्रोण**

द्रोणाचार्यांच्या नकाराची पर्वा न करता एकलव्याने त्यांची पार्थिव प्रतिमा केली, व तिचीच गुरु म्हणून पूजाअर्चा करीत स्वतः वनांत धनुर्विद्येचा निष्ठापूर्वक अभ्यास प्रारंभ केला. त्याने स्वतःला द्रोणाशीं अशा प्रकारें संबद्ध कां केलें? उघडच, त्या काळी स्वतःला द्रोणशिष्य म्हणण्यांत समाजांत विशेष प्रतिष्ठा प्राप्त होत असली पाहिजे.

एक दिवस जंगलात एकलव्याचें धनुर्विद्येतील अद्भुत कौशल्य पाहून चकित झालेल्या पांडवांना त्यानें आपला परिचय देत म्हटलें-

**निषादाधिपतेर्वीरा हिरण्यधनुषः सुतम्**
**द्रोणशिष्यं च मां वित्त धनुर्वेदकृतश्रमम् ।। आदिपर्व १३१-४५**

'वीरांनो, मी निषादराज हिरण्यधनूचा पुत्र व द्रोणांचा शिष्य हा माझा परिचय आहे; मी परिश्रमपूर्वक ही धनुर्विद्या प्राप्त केली आहे.' हें ऐकून साहजिकच पांडवांना आश्चर्य वाटलें; त्यांनी एकलव्याला द्रोणशिष्यांत कधीही पाहिले नव्हतें. अर्जुनाने द्रोणांकडे जाऊन म्हटले-

**तदाहं परिरभ्यैकः प्रीतिपूर्वमिदं वचः**



**भवतोक्तो न मे शिष्यस्त्वद्विशिष्टो भविष्यति।। १३१-४८**
**अथ कस्मान्मद्विशिष्टो लोकादपि च वीर्यवान्**
**अन्योऽ स्ति भवतः शिष्यो निषादाधिपतेः सुतः।।४९**

"त्या दिवशीं तर आपण मला छातीशीं लावून मोठ्या प्रेमानें निश्चित आश्वासन दिले होतें की,' 'माझा अन्य कोणीही शिष्य तुझ्याहून श्रेष्ठ असणार नाही.' मग माझ्याहून श्रेष्ठ व (मला माहीत असलेल्या) सर्व लोकांपेक्षा श्रेष्ठ (धनुर्धारी) पराक्रमी हा निषादराजपुत्र आपला एक अन्य शिष्य कसा आहे?" अर्जुनाला ते आश्वासन दिलें असतांही, द्रोणाचार्य त्या निषादराजपुत्राला, जाहीर रीत्या शिष्यत्व नाकारून, गुप्त रीत्या वनांत अर्जुनापेक्षाही श्रेष्ठ धनुर्विद्या शिकवीत होते कीं काय? द्रोणांनी क्षणभर अर्जुनाच्या आक्षेपावर विचार केला, व अर्जुनाला बरोबर घेऊन ते सरळ एकलव्याकडे गेले.

द्रोण स्वाभिमानी व आपल्या ईमानदारीशीं निष्ठावान होते. वर प्रकरण ७ मध्ये पाहिल्याप्रमाणे, कुरुक्षेत्रावर जयद्रथवधानंतर झालेल्या रात्रियुद्धात जेव्हां कौरव सेनापति असलेल्या द्रोणांनी शत्रुपक्षीय अर्जुनाच्या योग्य सूचनेवरून चन्द्रोदयापावेतो लढाई थोडी स्थगित करणें मान्य केल्याबद्दल दुर्योधनाने द्रोणांवर आक्षेप घेऊन त्यांच्या निष्ठेवरही संशय घेतला, तेव्हां द्रोणांनी अत्यंत व्यथित होऊन चन्द्रोयावर पुनः आरंभ झालेलें लढणें नंतर कांहीही विश्राम न घेता दुसरे दिवशीं चालू ठेवलें, व शेवटी त्यांत प्राणत्याग झाला ! असे ते द्रोणाचार्य यावेळी अर्जुनासमक्ष एकलव्याच्या तथाकथित शिष्यत्वाच्या बाबतींत आपली सत्यता सिद्ध करू चाहत होते.

द्रोणांनी अर्जुनास दिलेल्या आश्वासनाचे दोन भाग होते. एक त्यांच्या शिष्यांपावेतो सीमित असून दुसरा अधिक व्यापक होता. यांतील व्यापक आश्वासन द्रोणांच्या पुढील शब्दांत व्यक्त झालें आहे-

**प्रयतिष्ये तथा कर्तुं यथा नान्यो धनुर्धरः**
**त्वत्समो भविता लोके सत्यमेतद् ब्रवीमि ते ।।१३१-२०**

"अर्जुना, तुला मी सत्य सांगतो कीं, साऱ्या जगांत तुझ्यासमान अन्य कोणी धनुर्धारी असणार नाही असा मी प्रयास करीन." येथे 'प्रयतिष्ये' शब्दाचा संबंध द्रोणांच्या अध्यापन परिश्रमाशी आहे. द्रोण संपूर्ण जगांत अर्जुनासमान कोणी योद्धा होणार नाही अशी निश्चित खात्री अर्थातच देऊं शकत नव्हते; तुला विद्यादान करताना माझ्याकडून मी यथासंभव सर्व परिश्रम करीन इतकेंच एका श्रेष्ठ गुरूने आपल्या शिष्योत्तमाला दिलेलें तें आश्वासन होते.

अर्जुनाला द्रोणांनी दिलेलें त्यांच्या शिष्यांपावेतो सीमित आश्वासन

स्वतः अर्जुनाने वर उद्धृत श्लोक १३१-४८ मध्यें व्यक्त केलें आहे. द्रोणांनी म्हटलें होते की, त्यांचा अन्य कोणताही शिष्य अर्जुनापेक्षा श्रेष्ठ असणार नाहीं. पण याचा अर्थ ते अन्य विद्यार्थ्यांना विद्यादान करताना कुचराई करीत असत असा नव्हें. द्रोण सर्व शिष्यांना समान विद्यादान करीत असत-

**तुल्येष्वस्त्रोपदेशेषु सौष्ठवेन च वीर्यवान्**

**एकः सर्वकुमाराणां बभूवातिरथोऽर्जुनः ।। १३१-६५**

'द्रोण सर्वांना शस्त्रास्त्रविद्या समान रीत्या शिकवीत होतें, तरी अर्जुन आपल्या प्रतिभेमुळे सर्व कुमारांत अतिरथी झाला.'

**एकलव्याला अखेरची संधी**

द्रोण एकलव्याजवळ पोचल्यावर त्यानें नतमस्तक होऊन द्रोणांचे स्वागत केलें. एकलव्याच्या संबंधांत अर्जुनानें घेतलेली आपत्ती द्रोणांनी शिष्यांविषयी दिलेल्या आश्वासनावर मुख्यत्वें आधारित होती. एकलव्यानें स्वतःला द्रोणशिष्य म्हटलें म्हणून अर्जुनाने द्रोणाजवळ जाऊन तक्रार केली. यासाठी द्रोणांनी एकलव्याला म्हटलें-

**यदि शिष्योऽसि मे वीर वेतनं दीयतां मम।। १३१-३४**

"वीरा, जर तूं माझा शिष्य असशील तर माझी गुरुदक्षिणा दे." यांत 'यदि' (जर) हा शब्द महत्त्वाचा आहे. त्या शब्दाद्वारें त्यांनी अर्जुनासमक्ष एकलव्याला सूचित केलें कीं, वस्तुतः मी तुला शिष्य केलें नाही. म्हणून तू माझा शिष्य असण्याचा दुराग्रह सोडशील तर (भलेही तू एक अतिश्रेष्ठ धनुर्धर राहिला तरी) अर्जुनानें उपस्थित केलेला वाद समाप्त होईल, पण जर तुला तो आग्रह कायम ठेवावयाचा असेल तर माझी गुरूदक्षिणा दे.

द्रोणाचार्यांनी 'यदि' चा प्रयोग करून का होईना गुरुदक्षिणा मागितली, तेव्हां एकलव्याला वाटलें असेल कीं द्रोण विपुल द्रव्यादि घेऊन मला शिष्यत्व मान्य करतील. परंतु द्रोण धनाचे लोभी नव्हते;* त्यांना अर्जुनासमोर आपलें वचन सत्य करावयाचें होते. म्हणून द्रोणांनी एकलव्याचा उजवा अंगठा मागितला! स्वतः महाभारतकारांनी या मागणीला 'दारुण' म्हटलें आहे (१३१-५७), आणि

---

* आणि तरीही द्रोणांवर हा निराधार क्षुद्र आरोप पाहा, "मिंधेपणाचा डाग लपविण्यासाठी द्रोण नाना तऱ्हेच्या बहाण्यांचा आश्रय घेत होता. समजून उमजून नव्हे, तर तो त्याच्या स्वभावातच आला होता. एकदा गेलेले दारिद्र्य परतून येईल की काय, हीच धास्ती बहुधा त्याला गिळीत असावी. दारिद्र्याच्या पाठलागातून तो कधीच मुक्त झाला नाही." (दुर्गा भागवत, "व्यासपर्व", पृ. ३२).



यासाठी या घटनेची पार्श्वभूमि सूक्ष्मतेनें दिग्दर्शित केली आहे.

एकलव्यानें आपल्या अथक परिश्रमानें धनुर्विद्येत जी विशेष श्रेष्ठता प्राप्त करून घेतली होती, ती त्याला 'वीर' संबोधित करून मान्य करीत असतांही, तिच्यासह त्याला आपला शिष्य करून घेण्यांत द्रोणांनी अर्जुनास (आपल्या शिष्यांसंबंधी) दिलेल्या आश्वासनाचा भंग झाला असता. म्हणून एकलव्याला त्याच्या इच्छेनुसार शिष्यत्व मान्य करतांना त्याची धनुर्विद्या कांहीशी कमी स्तरावर आणणें त्यांना आवश्यक झालें. प्रतिष्ठापूर्ण द्रोणाशिष्यत्व प्राप्त करण्याची अनिवार्य आकांक्षा बाळगणाऱ्या एकलव्यानें आपला अंगठा कापून द्रोणांसमोर ठेवला! पण त्यानंतरही तो आपली धनुर्विद्या कायम ठेवूं शकला, मात्र पूर्वीपेक्षा थोड्या कमी पातळीवर-

**ततः शरं नैषादिरङ्गुलीभिर्व्यकर्षत**

**न तथा च स शीघ्रोऽभूद् यथा पूर्वं नराधिप ।। १३१-५९**

'राजा (जनमेजय), तेव्हांपासून एकलव्य (अंगठ्याऐवजी) बोटांनी शरसंधान करू लागला, मात्र त्यांत पूर्वीइतकी शीघ्रता राहिली नाही.' आतां तो अर्जुनापेक्षा 'अधिक श्रेष्ठ' राहिला नाही. 'समान' राहिला असेल. त्याच्या हार्दिक आकांक्षेनुसार त्याला अधिकृत द्रोणाशिष्यत्व प्राप्त झालें, आणि तिकडे द्रोणांनी अर्जुनास दिलेलें (शिष्यांसंबंधी) वचनही कायम राहिलें.

**ततोऽर्जुनः प्रीतमना बभूव विगतज्वरः**

**द्रोणश्च सत्यवागासीन्नान्योऽभिभवितारर्जुनम्।।१३१-६०**

'यामुळें अर्जुनाच्या मनांतील (द्रोणांनी दिलेल्या आश्वासनाविषयीं) किंतु दूर होऊन तो प्रसन्नचित्त झाला, आणि अर्जुनाहून श्रेष्ठ अन्य कोणी (द्रोण शिष्य) असणार नाही हे द्रोणाचे वचन सत्य राहिले.' येथे 'नान्यो' (न अन्यः) चा संबंध द्रोणांच्या शिष्यांशी आहे. मुख्यत्वें शिष्यत्वाच्याच संदर्भात अर्जुनाने एकलव्याबद्दल द्रोणापाशी तक्रार केली होती. आणि एकलव्याचीही विशेष तळमळ द्रोणांचे शिष्यत्व प्राप्त करण्यासाठी होती.

महाभारताच्या एका पाठांतील पुढील श्लोकानुसार यानंतर स्वतः द्रोणांनी एकलव्याला शेष बोटांनी बाण चालविणें शिकविले-

**स सत्यसंधं नैषादिं दृष्टवा प्रीतोऽ ब्रवीदिदम्**

**एवं कर्तव्यमिति वा एकलव्यमभाषत।।**

'नेमके बाण संधारण करणाऱ्या एकलव्याकडे पाहून द्रोण प्रसन्न चित्ताने एकलव्याला असे म्हणाले, (धनुष्य चालविणे) या अन्य प्रकारेही (म्हणजे अंगठ्याशिवाय बोटांनीही) केले जाऊ शकते.' त्या काळांत याचेही महत्त्व

असले पाहिजे. लढाईत अंगठा जख्मी झाल्यावरही धनुष्य चालू ठेवण्याची कला योद्धयांना आवश्यक होती. भील (निषाद) लोकांत अंगठा न लावता बाण सोडण्याची प्रथा दीर्घकालापासून प्रचलित असण्याचे सांगण्यात येते. एक लेखक म्हणतात,'All the other Bhil warriors who trained in archery followed the prince's example and drew the bow with their middle finger, and the custom prevailed even afterwords among the tribe.' ("Indian Myth and Legend", by D.A. Mackenzie, p.183).

**द्रोणाचार्य आणि अर्जुन**

केवळ अर्जुनाला लाभ देण्यासाठी एकलव्याचे घोर नुकसान करण्याचा द्रोणांवर आरोप करणारे प्रायः विसरतात की, त्याच अर्जुनाविरूद्ध नंतर द्रोणांनी युद्ध केले; आणि तें दोनदा, गोग्रहणाचे वेळी व कुरुक्षेत्रावर महायुद्धांत. हस्तिनापूर राज्याचा एक निष्ठावान सेवक म्हणून द्रोणांनी कर्तव्यबुद्धीने अर्जुनाशी युद्ध केले. एकलव्याशीही त्यांचे एकूण वर्तन कर्तव्यभावना व सत्यप्रियता यांनी प्रेरित होते. या दृष्टीने महाभारताच्या द्रोणाचार्यांची तुलना व्हिक्टर ह्यूगो यांच्या Les Miserables या फ्रेंच कादंबरींतील पोलिस अधिकारी जॅव्हर्टशी, किंवा सॉमरसेट मॉम यांच्या An Hour before the Dawn या इंग्रजी कादंबरीतील सैनिक अधिकारी रोजरशी, करणें उद्बोधक होईल.

येथे एका अन्य घटनेवरही विचार इष्ट होईल, जिला अनुलक्षून द्रोणांवर आरोप केला जातो. द्रोण अध्यायनास आरंभ करण्यापूर्वी शिष्यांना नदीवरून पाणी भरून आणण्यास सांगत असत. एकदा त्यांनी आपला पुत्र अश्वत्थामाला (चौड्या तोंडाचा) कुंभ, पण इतरांना (चिंचोळ्या तोंडाचे) कमंडलू देण्यास सुरवात केली. त्यामुळें अश्वत्थामा पाणी घेऊन इतर शिष्यांपेक्षा द्रोणांजवळ लवकर पोचे, व द्रोण तेवढ्या वेळांत त्याला काही शिकवीत. परंतु लवकरच अर्जुनाच्या ध्यान हें येऊन, तो द्रोणांनीच शिकविलेल्या वरुणास्त्राचा प्रयोग करून आपला कमंडलु शीघ्र भरू लागला; आणि अशा रीतीनें अश्वत्थामाबरोबरच द्रोणाजवळ पोचू लागला (आदिपर्व १३१-१६ ते १९).

यावर आक्षेप घेतला जातो की, द्रोण पक्षपातपूर्वक आपल्या पुत्रास काही विद्या अधिक द्यावी या हेतूने भांड्यांत असा भेद करीत. पण अश्वत्थामा त्यांचा पुत्र होता आणि ते त्याला अन्य वेळीही कोणतीही विद्या देऊं शकत होते. त्यासाठी अशा एखाद्या चलाखीची काय आवश्यकता होती? वस्तुतः यांत द्रोण शिष्यांची परीक्षा घेत होते. अर्जुन वरुणास्त्राचा प्रयोग करून



द्रोणाजवळ शीघ्र येऊ लागला, तेव्हा द्रोणांच्या दृष्टीने तो परीक्षेत उत्तीर्ण झाला. अन्य शिष्यांनी गुरुपाशी उशिरा पोचण्याची पर्वा न करता अश्वत्थामाला दिलेल्या कुंभापेक्षा आपला कमंडलू हलका आहे यातच आनंद मानला.

एकलव्याच्या संदर्भात काही जण द्रोणांबरोबर अर्जुनालाही दोष देतात.✻ जणूं काय, अर्जुनानेच दुष्ट बुद्धीने द्रोणांकडून एकलव्याचा अंगठा कापविला. परंतु महाभारताचा अर्जुन न्यायी व उदारवृत्तीचा आहे. गीतेंत श्रीकृष्णांनी त्याला जन्मतःच अहिंसा, सत्य, अक्रोध, अद्रोह आणि सदगुणांनी संपन्न म्हटले आहे (१६-५).

**द्रोणाचार्य आणि धृष्टद्युम्न**

द्रोणांनी पांडवांना युद्धविद्या शिकवून तयार केल्यावर त्यांच्याकडून उन्मत राजाद्रुपदाला बंदी बनविले; आणि नंतर उदारपणे त्याला मुक्त केले. पण या अपमानाचा बदला घेण्यासाठी द्रुपदाने एक यज्ञ करून द्रोणवधार्थ धृष्टद्युम्न पुत्र प्राप्त केला. त्याचा जन्मच द्रोणाचा वध करण्यासाठी होता; आणि स्वतः द्रोणांनाही हें माहीत होते. तरीही राजा द्रुपदाने धनुर्विद्या शिकण्यासाठी धृष्टद्युम्नाला आचार्य द्रोणांकडेच पाठविले. द्रोणांनी द्रुपदाला मुक्त केले होते तेव्हा द्रुपदाने (नाइलाजानें) द्रोणांशी मैत्री मान्य केली होती, मात्र त्याच्या मनांतून द्रोणांविषयी शत्रुताच होती. पण द्रोणांनी आपल्याकडून त्या मित्रतेचें पालन करीत धृष्टद्युम्नाला धनुर्विद्या शिकविणें मान्य केले !

**धृष्टद्युम्नं तु पांचल्यमानीय स्वं निवेशनम्**
**उपाकरोदस्त्रहेतोर्भारद्वाजः प्रतापवान् ।। आदिपर्व, १६६-५५**
**अमोक्षणीयं दैवं हि भावि मत्वा महामतिः**
**तथा तत् कृतवान् द्रोण आत्मकीर्त्यनुरक्षणात्।।५६**

'पांचाल राजपुत्र धृष्टद्युम्नाला प्रतापी द्रोण आपल्या निवासस्थानी घेऊन आले, व त्याला अस्त्रविद्या शिकवून उपकृत केले. महाबुद्धिवान द्रोण दैवलिखित भावी घटना अटळ मानत होते; त्यांनी (मित्र रूपात) आपली कीर्ति कायम राहण्यासाठी असे केले.' शेवटी धृष्टद्युम्नाने खरोखरच कुरूक्षेत्रावर युद्धांत निःशस्त्र अवस्थेत द्रोणांचा क्रूर वध केला. जो आपला वध करणार आहे त्यालाच उदार बुद्धीने शस्त्रविद्या शिकविण्याचें अन्य उदाहरण आहे काय? आणि तरीही याच अभूतपूर्व गुरु द्रोणांवर आपल्या शिष्यांत पक्षपात

✻ पाहा, "अर्जुन आणि द्रोण एकाच हीन ईर्षेने पेटलेले - आपल्याहून कोणी प्रवीण असू नये. असलाच तर त्याचा काटा कसाही काढावा. एकलव्याच्या बाबतीत झालेल्या अन्यायाचे जनक दोन : द्रोण व अर्जुन म्हणजेच पांडव." (दुर्गा भागवत, 'व्यासपर्व' पृ. ३३-३४).

करण्याचा आरोप केला जात असतो.

**एकलव्याचे शेष जीवन**

अंगठा कापण्याच्या घटनेनंतर महाभारतात एकलव्याचा उल्लेख येत नाही असा काही जणांचा ग्रह चूक आहे. इन्द्रप्रस्थास पांडवांच्या राजसूय यज्ञांत एकलव्य एक सन्मान्य आमंत्रित म्हणून उपस्थित होता. त्या प्रसंगी अग्रपूजेसाठी भीष्मांनी श्रीकृष्णांचे नाव सुचविल्यावर, शिशुपालानें त्याला विरोध करीत अग्रपूजेसाठी (त्याच्या मते) अधिक पात्र अशा उपस्थित व्यक्तींचा जो उल्लेख केला, त्यात 'एकलव्यं विक्रांतं' (पराक्रमी एकलव्य) चा ही समावेश होता (सभापर्व, ४४-२१). आंगठा कापल्यावरही एकलव्य एक महान योद्धा मानला जात असे हे यावरून दिसून येते.

याशिवाय, कुरुक्षेत्रावरील युद्धांत घटोत्कच वध प्रसंगी अर्जुनाशी बोलतांना श्रीकृष्णांनी काही बलवान दुष्टांची नावें घेतली, त्यांतही एकलव्याचा उल्लेख आहे-

**जरासन्धश्चेदिराजो महात्मा**
**महाबाहुश्चैकलव्यो निषादः।। द्रोणपर्व १८०-३२**
**एकैकशो निहताः सर्व एते**
**योगैस्तैस्तैस्त्वद्धितार्थं मयैव।३३**
**जरासन्धश्चेदिराजो नैषादिश्च महाबलः**
**यदि स्युर्न हताः पूर्वमिदानीं स्युर्भयंकराः ।।१८१-२**
**ते हि वीरा महेश्वासाः कृतास्त्रा दृढयोधिनः**
**धार्तराष्ट्रां चमूं कृत्स्नां रक्षेयुरमरा इव।।४**

"जरासंध, महामनस्वी शिशुपाल, व महाबाहु निषाद एकलव्य हे सर्व माझ्या द्वारें तुमच्या हितार्थ विभिन्न युक्तिप्रयोगांनी एक एक करून मारले गेले आहेत- ३२,३३. जर जरासंघ, शिशुपाल व महाबलवान निषाद (एकलव्य) आतापावेतो मारले गेले नसते तर या वेळी भयंकर ठरले असते-२. ते महाधर्नुधर, अस्त्रप्रवीण व दृढ लढवय्ये होते; आणि कौरवांच्या संपूर्ण सैन्याचे देवांसमान ते रक्षण करते-४". अंगठा कापल्यानंतरही एकलव्य किती श्रेष्ठ योद्धा होता हें यावरून दिसून येते.

वर श्लोक १८०-३२,३३ मध्यें शिशुपाल व जरासंघा बरोबर एकलव्याचाही उल्लेख आहे. तेथे श्रीकृष्ण 'मयैव निहताः' (माझ्या द्वारेंच मारले गेले) असे म्हणतात; पण त्याचा आशय त्या सर्वांना स्वतः श्रीकृष्णांनीच प्रत्यक्ष मारले असा नाही; जरासंघाचा वध श्रीकृष्णाच्या प्रेरणेने पण भीमानें केला होता. हेच



'मयैव निहताः' शब्द गीतेंत (११-३३) श्रीकृष्णांनी कुरुक्षेत्रावर लढणाऱ्यांसाठी देखील म्हटले असून, त्यांचा प्रत्यक्ष वध श्रीकृष्णांनी केला असा आशय नाही. एकलव्याचा वध (अथवा मृत्यु) शेवटी केव्हां व कोणत्या परिस्थितीत झाला याचे स्पष्टीकरण महाभारतात आढळले नाही, एखाद्या अन्य पौराणिक ग्रंथात असेल.

**एका श्लोकाचा वेगळा अर्थ**

द्रोणपर्वाच्या अध्याय १८१ मध्ये श्रीकृष्ण अर्जुनास म्हणतात-

**त्वद्धितार्थे च नैषदिरङ्गुष्ठेन विजोजितः**
**द्रोणेनाचार्यकं कृत्वा छद्मना सत्यविक्रमः।। १८१-१७**

यांत 'आचार्यकं' चा अर्थ 'आचार्यत्व','आचार्यानें शिष्यांशी केलेलें वर्तन' असा करून श्लोकाचा प्रायः असा आशय घेतला जातो की, 'अर्जुना, तुझ्या लाभार्थ द्रोणाने 'आचार्यकं' चा (आचार्य रूपाने गुरुदक्षिणा मागण्याचा) कपटी बहाणा करून सत्यपराक्रमी एकलव्याचा अंगठा कापविला'. पण 'आचार्यकं' चा 'शिष्याचे गुरूशी वर्तन' 'शिष्यद्वारा गुरुचे पूजन अथवा आदर सत्कार' असाही अर्थ होतो.* द्रोणपर्वातच एक ठिकाणी 'अचार्यकं' शब्द या अर्थाने आला आहे. कुरुक्षेत्रावरील युद्धांत एकदा कृपाचार्य व अश्वत्थामा अर्जुनावर घोर शरवृष्टि करू लागले असतां-

**सोऽजिघांसुर्गुरुं संख्ये गुरोस्तनयमेव च**
**चकाराचार्यकं तत्र कुन्तीपुत्रो धनंजयः ।। द्रोणपर्व १४७-६**
**अस्त्रैरस्त्राणि संवार्य द्रौणेः शारद्वतस्य च**
**मन्दवेगानिषूंस्ताभ्यामजिघांसुरवासृजत्।।७**

"तो (अर्जुन) युद्धांत गुरु (कृपाचार्य) व गुरुपुत्र (अश्वत्थामा) यांचा वध करू चाहत नसून त्यानें या वेळी 'आचार्यकं' म्हणजे आचार्याविषयी आपला पूज्यभाव प्रकट केला -६. म्हणून त्याने (केवळ स्वतःच्या रक्षणार्थ) अश्वत्थामा व कृपाचार्य यांच्या अस्त्रांचें अस्त्रांनी निवारण करीत, त्यांच्या जिवास धोका पोचू नये अशा बेताने त्यांच्यावर मंदगति बाण टाकले-७". येथे 'आचार्यकं' चा अर्थ शिष्याने आचार्याविषयी प्रदर्शित आदरभाव असा आहे.

उद्योगपर्वातही हा शब्द आला आहे. युद्धारंभापूर्वी भीष्म दुर्योधनाला त्याच्या पक्षाच्या प्रमुख योद्ध्यांचे वर्णन करीत असताना द्रोणांचा उल्लेख करून म्हणाले-

---

* पाहा ज. वि. ओक कृत 'गीर्वाण लघुकोश' व आपटे कृत 'संस्कृत - इंग्रजी कोश'.

नैव जातु महेश्वासः पार्थमक्लिष्टकारिणम्
हन्यादाचार्यकं दीप्तं संस्मृत्य गुणनिर्जितम्।। उद्योग पर्व १९७-१६

यांत आचार्यकं चा अर्थ शिष्यद्वारा गुरूपूजन असा असून, या श्लोकाचा हा सुसंगत अर्थ होतो, "अर्जुनाने आपल्या श्रेष्ठ युद्धकौशल्याने (राजा द्रुपदाला) जिंकून व द्रोणासमोर उभा करून जें 'दीप्त' (उज्वल) 'आचार्यकं' (गुरूपूजन) केले होते, त्याचे स्मरण ठेवून महाधनुर्धारी द्रोण पराक्रमी कृत्ये सहज करणाऱ्या अर्जुनाचा कधीही वध करणार नाही."

या प्रमाणे 'आचार्यकं' चा आशय घेऊन वरील श्लोक १८१-१७ चा हा अर्थ होतो, "सत्यपराक्रमी (श्रेष्ठ धनुर्धारी) निषादराजपुत्र एकलव्यानें (द्रोणाचार्यांचे) चोरून लपून (त्यांच्या संमति विरूद्ध) (त्यांची पार्थिव प्रतिमा तयार करून) गुरुपूजनादि करून तो स्वतःला द्रोणशिष्य म्हणून लागल्यावर, द्रोणांनी तुझ्या हितार्थ (त्यांच्या शिष्यांत तुझ्यापेक्षा श्रेष्ठ कोणी असणार नाही हे वचन सत्य करण्यासाठी) त्याला अंगुष्ठरहित केले (व त्याचे धनुर्धारित्व तुझ्यापेक्षा अधिक श्रेष्ठ असणार नाही इतक्या पातळीवर आणले)."

एकलव्याच्या या कथेत आर्य-अनार्य विरोध पाहणेंही निराधार आहे. महाभारताची रचना अशा भेदापासून पूर्णपणें अलिप्त आहे. त्यांत वर्णित प्रमुख संघर्ष एकाच कुरुकुलाच्या दोन शाखांत झाला होता. वर सांगितल्याप्रमाणे द्रोणांनी एकलव्यास आपला शिष्य करणें अमान्य करण्याचे तो 'निषाद' होता हे नसून, तो एका अन्य राज्याचा राजपुत्र होता हें होते. आणि नंतर राजसूय यज्ञांत अग्रपूजेसाठी शिशुपालालाने प्रमुख व्यक्तीं ची नावें घेतली त्यांत एकलव्याचाही समावेश केला हें वर उद्धृत केलें आहे. ☐



प्रकरण २१

# कर्ण व त्याचे जन्मरहस्य

महाभारताच्या पात्रांत कर्णाला एक विशिष्ट स्थान आहे. वस्तुतः तो पांडुपत्नी कुन्तीला कौमार्यावस्थेंत (सूर्यापासून) झालेला पुत्र होता. पितृरोषाच्या व जननिंदेच्या भयानें कुन्तीनें जन्मतःच त्याला एका पेटींत नीट ठेवून नदींत सोडून दिले. संयोगाने ती पेटी हस्तिनापुरच्या अधिरथ सूताच्या हाती पडून, त्यानें व त्याची पत्नी राधेने त्या नवजात शिशूला आपल्या पुत्रासमान मोठ्या प्रेमाने वाढविले. लोकांत कर्णाचे कुन्तीपुत्रत्व अज्ञात राहून तो सूतपुत्र व राधेय (राधापुत्र) म्हणून ओळखला गेला. कुरुक्षेत्रावरील युद्धांत त्याचा मृत्यु झाल्यावर शेवटी पांडव उभय पक्षांच्या मृत आप्तांना तिलांजली देत असतां, स्वतः कुन्तीने कर्णाचे जन्मरहस्य पांडवांना सांगितले, व त्यानंतर तें जगजाहीर झालें.

या संबंधात एक महत्वाचा प्रश्न असा की, स्वतः कर्णाला त्याचे जन्म रहस्य केव्हा व कोणाकडून कळले?

**स्वतः श्रीकृष्णांनी कर्णास ते रहस्य प्रथम सांगितले काय?**

बहुप्रचलित धारणा अशी आहे की, कर्णाला तें सर्वप्रथम श्रीकृष्णांनी सांगितले.* हस्तिनापुरची अंतिम शांतिवार्ता भंग पावल्यावर श्रीकृष्ण तेथून ताबडतोब परतले, तेव्हा त्यांनी कर्णास आपल्या रथांत बसवून नगराच्या सीमेपावेतो आणलें; व कौरवपक्ष सोडून पांडवांकडे येऊन मिळण्यासाठी त्याला समजाविताना, तू वस्तुतः कुन्तीचा कन्यावस्थेतील पुत्र आहेस याची जाणीव देत म्हटले-

**त्वमेव कर्ण जानासि वेदवादान् सनातनान्**
**त्वमेव धर्मशास्त्रेषु सूक्ष्मेषु परिविष्ठितः ।।उद्योगपर्व १४०-७**
**कानीनश्च सहोढश्च कन्यायां यश्च जायते**

* याची दोन उदाहरणे -- शिवाजी सावंत 'मृत्युंजय कर्ण' (तृतीय आवृत्ती, पृ.४९७); डॉ. श्रीराम पंडित 'शोध कर्णाचा' (पृ.२२).

**बोढारं पितरं तस्य प्राहुः शास्त्रविदोजनाः।।८**

**सोऽसि कर्ण तथा जातः पाण्डोः पुत्रोऽसि धर्मतः**

**निग्रहाद् धर्मशास्त्राणामेहि राजा भविष्यसि।।९**

"कर्णा, तू स्वतः सनातन वैदिक नियम जाणतोस, धर्मशास्त्रांच्या सूक्ष्म विवेचनांचे तुला चांगले ज्ञान आहे. कुमारिकेच्या कानीन (म्हणजे विवाहापूर्वी जन्मणाऱ्या), आणि सहोढ (म्हणजे विवाहापूर्वी गर्भसंभव होऊन विवाहानंतर जन्मणाऱ्या), पुत्रांचा पिता तिच्याशी विवाह करणाऱ्या पतीला मानावे असे धर्मशास्त्रांनी म्हटलें आहे. कर्णा, तुझाही जन्म असाच असल्यानें तू पांडूचा धर्मपुत्र आहेस. मज बरोबर चल; धर्मशास्त्रांनुसार तू (पाण्डवांच्या राज्याचा) राजा होशील."

परन्तु, श्रीकृष्णाकडून आपल्या जन्मरहस्याचा हा उल्लेख ऐकल्यावर कर्णानें उत्तर दिलें-

**सर्वं चैवाभिजानामि पाण्डोः पुत्रोऽस्मि धर्मतः**

**निश्चयाद् धर्मशास्त्राणां यथा त्वं कृष्ण मन्यसे।।१४१-२**

**कन्यागर्भं समाधत्त भास्करान्मां जनार्दन**

**आदित्यवचनाच्चैव जातं मां सा व्यसर्जयत्।।३**

**सोऽस्मि कृष्ण तथाजातः पाण्डोः पुत्रोऽस्मि धर्मतः**

**कुन्त्या त्वहमपाकीर्णो यथा न कुशलं तथा।।४**

**सूतो हि मामधिरथो दृष्ट्वैवाभ्यानयद् गृहात्**

**राधावाश्चैव मां प्रादात् सौहार्दान्मधुसूदन।।५**

"कृष्णा, तू म्हणतोस त्याप्रमाणे धर्मशास्त्रीय वचनांनुसार मी पांडूचा धर्मपुत्र आहे हें सर्व मला पूर्ण माहीत आहे. जनार्दना, माझ्या मातेंने कुमारी अवस्थेंत सूर्याच्या आग्रहावरून त्याच्याशी संगम करून मला गर्भात धारण केलें, आणि जन्म होताच तिने मला टाकून दिलें.* कृष्णा, अशा प्रकारें माझा जन्म झाला असून मी पांडूचा धर्मशास्त्रानुसार पुत्र आहे. पण कुन्तीनें

* काही (उदाहरणार्थ गीताप्रेसने दिलेल्या) भाषांतरांत,'आदित्यवचनात्' चा संबंध ' विसर्जयत्'शी लावून असा अर्थ केला जातो की, 'माझा जन्म झाल्यावर तिने सूर्याच्या सांगण्यावरून मला नदीत टाकून दिले.' पण नवजात शिशूचा त्याग करावयास सूर्याने कुंतीस सांगितले असे महाभारतात म्हटले नाही, आणि त्यासंबंधात कर्णानेही कधी सूर्याला दोष दिला नाही. उलट 'आदित्यवचनात्'चा संबंध सूर्य-कुंतीसमागमाकडे लावण्यात पुष्टि अशी की, कुंती प्रथम बराच वेळ त्यासाठी तयार होत नसता सूर्याने तिला आग्रह करून त्यासाठी राजी केली होती. (पाहा वनपर्व अध्याय ३०६, ३०७)



माझा अशा प्रकारें त्याग केला कीं, मी धडपणें जिवंत राहणेही मुष्किल होतें. मधुसूदना, त्यानंतर अधिरथ सूतानें मला पाहून आपल्या घरीं आणलें, आणि मोठ्या प्रेमानें मला राधेच्या स्वाधीन केलें". कर्ण आणखी म्हणाला, 'त्या क्षणीं मजविषयीं ममतेने राधेला पान्हा फुटला व तिच्या स्तनांतून दूध बाहेर येऊं लागलें. आणि कृष्णा, पुढे तिनेंच माझें मलमूत्र स्वहस्ते सावडून मला लहानाचा मोठा केलें. असें असतां, धर्मशास्त्र जाणणारा मी (तिच्या वृद्धावस्थेंत तिचा त्याग करून) तिच्या तोंडचा ममतेचा व आसन्याचा घास आता कसा काढून घ्यावा?' (१४१-६,७).

कर्णाच्या या उत्तरावरून दिसून येते कीं, कर्णाला आपलें जन्मरहस्य श्रीकृष्णांनी सांगण्यापूर्वीच माहीत झाले होते. आणि विशेष असें कीं, त्याला माहीत झालें आहे हें श्रीकृष्णही जाणत होते, म्हणून त्यांनी कर्णाला तू कुंतीचा विवाहपूर्व पुत्र आहेस असें म्हणत असतांहि त्याच्या जन्मदात्या पित्याचा (सूर्याचा) उल्लेख केला नाही, आणि स्वतः कर्णाने तो केला.

मग कर्णाला हें जन्मरहस्य सर्वप्रथम कोणाकडून कळले होतें?

**कुंतीने ते कर्णाला प्रथम सांगितले काय?**

पांडवांना येऊन मिळण्यास कर्णाने नकार दिल्यावर श्रीकृष्णांनी हस्तिनापुर सोडले. तिकडे कर्ण शहरांत परतला. यावेळी दुपार प्रारंभ होण्याचा समय होता. कर्ण आपल्या नियमानुसार मध्यान्ह सूर्योपासनेसाठी गंगातटावर गेला. यावेळी तो कोणाचेही मागणें शक्य तोवर अमान्य करीत नसे. याच्या थोड्याच वेळापूर्वी कुंतीला शांतिवार्ता भंग होऊन कौरवपांडवांत आता युद्ध अटळ झाल्याचे श्रीकृष्णांकडून कळलें होते. शिवाय विदुरानेही येऊन अतिशय दुःखी अंतःकरणानें तिला तें सांगितले होते (उद्योगपर्व, अध्याय १४४ श्लोक १ ते ९). यामुळें निदान या शेवटच्या क्षणी कर्णाचा आपल्याच सहोदर भावांशी संग्राम टाळण्याचा प्रतत्न करावा या हेतूनें कुंतीही सरळ कर्णाच्या मध्यान्ह उपासना स्थली गेली. जातांजातां ती विचार करू लागली -

**आशंसे त्वद्य कर्णस्य मनोऽहं पाण्डवान् प्रति।।१४४-१८**

**प्रसादयितुमासाद्य दर्शयन्ति यथातथम्।१९**

'आज मी कर्णाला (त्याच्या जन्माची) वास्तविक स्थिती स्पष्ट करून त्याचे मन पांडवांकडे प्रसन्न करण्यासाठी त्याच्याजवळ जाऊन बोलते.' यावरून दिसते की, कर्णाला त्याचे जन्मरहस्य यापूर्वी कळलें होते याची कल्पना कुंतीला नव्हती. आपली उपासना संपल्यावर कर्णाने कुंतीकडे पाहून म्हटले-

**राधेयो ऽहमाधिरथिः कर्णस्त्वामभिवादये**

**प्राप्ता किमर्थं भवती ब्रू हि किं करवाणि ते।।१४५-१**

'देवी, मी राधा- अधिरथाचा पुत्र तुला नमस्कार करतो. कोणत्या हेतूने येथे येणे झाले? मी आपले कोणते कार्य करू ते सांगावे.'

आणि यावर वर्षानुवर्षे हृदयांत खोल लपवून ठेवलेलें रहस्य, आता सारी लाजलज्जा बाजूला सारून, कर्णाजवळ उघडे करीत ती बोलू लागली-

**कौन्तेयस्त्वं न राधेयो न तवाधिरथः पिता**
**नासि सूतकुले जातः कर्ण तद् विद्धि मे वचः।।१४५-२**
**कानीनस्त्वं मया जातः पूर्वजः कुक्षिणा धृतः**
**कुन्तिराजस्य भवने पार्थस्त्वमसि पुत्रक।।३**
**प्रकाशकर्मा तपतो योऽयं देवो विरोचनः**
**अवीजनत् त्वां मय्येष कर्ण शस्त्रभृतां वरम्।।४**

'कर्णा, तू राधापुत्र नसुन कुन्तीचा (अर्थात माझा) पुत्र आहेस. तुझा पिता अधिरथ नसून तुझा जन्म सूतकुलातला नाही. माझें हे सांगणे नीट ध्यानात घे. बेटा, कुन्तिराजाच्या राजवाड्यांत मी राहत असतां कन्यावस्थेंत मी गर्भात धारण केलेला तू माझा प्रथम पुत्र असून पार्थ (पृथापुत्र) आहेस. कर्णा, प्रकाश व उष्णता देणाऱ्या या भगवान सूर्यदेवानें शस्त्रधाऱ्यात श्रेष्ठ अशा तुला माझ्या पोटी जन्म दिला आहे.' याच वेळी सूर्यानेही आकाशवाणी द्वारा कुंतीच्या या कथनाची पुष्टि केली (१४६-१,२,३).

मोठ्या उत्कंठेने कुंती कर्णाची प्रतिक्रिया पाहू लागली. तिला वाटलें असेल की, हे रहस्य ऐकतांच कर्ण मोठ्या प्रेमाने मला आई म्हणून हाक मारून माझ्याजवळ येईल. पण कर्णाला आता हे जन्मरहस्य नवें नव्हतें. यापूर्वी श्रीकृष्णांनी तें त्याला सांगितले होतें; आणि त्याच्याही पूर्वी त्याला तें कळलें होते. म्हणून कुंतीकडून तें श्रवण केल्यावर तो क्षणभरही स्तंभित किंवा उत्कंठित झाला नाही.

कर्णाला आपले जन्मरहस्य सर्वप्रथम कोणी सांगितले असावे हे आपण पुढे पाहणार आहों. पण जेव्हा केव्हा त्यानें तें सर्वप्रथम ऐकलें तेव्हा त्याचे लक्ष साहजिकच बिचाऱ्या कुंतीवर केन्द्रित झाले असले पाहिजे आणि तें प्रेमाने नव्हे तर रोषानें ! इतकी वर्षे माझ्या आसपास हस्तिनापुरांत सतत वावरणारी❋ ही

❋ पांडूच्या मृत्यूनंतर लहान पांडवांसह कुंती हस्तिनापुरात येऊन राहिली होती; आणि त्याशिवाय पांडवांच्या वनवास-अज्ञातवासाच्या तेरा वर्षांतही कुन्ती हस्तिनापुरातच (धृतराष्ट्र-गांधारीच्या आश्रयाने) राहत होती.



कुंतीच माझी जन्मदात्री आहे ! आणि असे असूनही आजपावेतो हिनें मला एकदाही ओळख देऊ नये? सूतपूत्र म्हणूनच माझे संस्कार व विवाह झाले; आणि माझ्या पुत्रांचीही तीच दशा झाली; आणि ही कुन्ती मूग गिळून हें सारे पाहत केवळ आपल्या अन्य पुत्रांच्या सुखदुःखाची चिंता वाहत राहिली!

म्हणून त्या दिवशीं कडक उन्हांत कुन्ती कर्णापुढे ममतेची भीक मागत **पदर पसरून** दीन मुद्रेनें उभी राहिली, तेंव्हा कर्णाने प्रारंभीच आपल्या मनांतले तें सारें किल्मिष आडपडदा न ठेवतां तिला ऐकविलें (अध्याय १४६). त्याने नवजात अवस्थेत त्याचा त्याग केल्याबद्दल तिला सरळ दोष दिला. स्वतः कुन्तीने त्या घटनेचा स्पष्ट उल्लेख केला नसताही, कर्णाला आता तें सारें आधीच कळून चुकले होते. शेवटी तो म्हणाला की, आजपावेतो कौरवांच्या मैत्रीत राहिल्यानंतर आता युद्धाच्या ऐन मोक्यावर मी त्यांना सोडणार नाही. पण तरीही मध्यान्ह सूर्योपासनेच्या समयी याचना करावयास आलेल्या कुंतीला अगदीच रिकाम्या हातानें परत न पाठवितां, त्याने तिला वचन दिलें कीं, अर्जुनाव्यतिरिक शेष चार पांडवांचा मी वध करणार नाही.

**सूर्याने ते कर्णास सांगितले काय?**

पांडवांचा अज्ञातवास काळ समाप्त होत असताना इन्द्राने (अर्जुनाच्या प्रेमाने व पांडवांच्या हितार्थ) कर्णाची जन्मतः प्राप्त दिव्य कवचकुण्डलें हरण करून नेण्याचा विचार केला. सूर्याला त्याची चाहूल लागली; आणि पुत्रप्रेमाने प्रेरित होऊन त्याने कर्णाला सांगितले की, इन्द्र ब्राह्मण रूपानें तुझ्याकडे येऊन तुझी कवचकुण्डलें मागेल, तू ती देऊ नको. परंतु कर्णाने उत्तर दिले की मी माझा मध्यान्ह उपासना समयी दातृत्वाचा नियम सोडणार नाही; यावर सूर्याने सांगितले की निदान बदल्यात तू एक अमोघ 'शक्ति' (एक प्रकारचे शस्त्र) मागून घे. या संवादात सूर्य कर्णास म्हणाला -

**अहं तात सहस्त्रांशुः सौहृदात् त्वां निदर्शये**
**कुरुष्वेतद् वचो मे त्वमेतत् श्रेयः परं हि ते ।। वनपर्व ३००-२२**

"कर्णा, मी सहस्त्रांशु सूर्य सौहृदामुळें तुला हे सांगत असून माझ्या या सांगण्याप्रमाणें कर, तें तुझ्या परम हिताचे आहे." या प्रसंगी सूर्याने कर्णाला आपला पितृत्वसंबंध व्यक्त न करता इतकेंच म्हटलें की, 'माझ्या भक्तांचे रक्षण करणें मला आवश्यक असल्यानें (मी तुला हे सांगते आहे), महाबाहो कर्णा, तू माझा भक्त आहेस, माझी एकनिष्ठ उपासना करतो, हें पाहून माझ्या मनांतही तुझ्यासाठी ममत्व उत्पन्न झाले आहे, म्हणून मी सांगितले तसें कर.' (३०१-८). कर्ण दीर्घकालापासून सूर्योपासक असल्याने सूर्याचे हें स्पष्टीकरण

त्याला सहजच पुरेसे वाटले. यावरून दिसून येते की, या वेळेपावेतो कर्णाला आपले सूर्यपुत्रत्व ज्ञात झाले नव्हतें.

**कर्णाला रहस्य केव्हां कळले?**

येथे हे ध्यानांत घेणे आवश्यक आहे की, हें रहस्य जाणल्यानें कर्णाच्या पांडवांशी संबंधावर फार मोठा प्रभाव पडत होता. आतापावेतो त्यांचा माझ्याशी काहीही संबंध नाही या भावनेने तो बेदरकारपणें त्यांचेविरूद्ध जाहीर मत्सर व द्वेष व्यक्त करीत असे. पण या रहस्यामुळे कुन्तीपुत्र त्याचे सहोदर बंधू ठरत होते. आणि आज ना उद्या हे जगजाहीर होणार याची कल्पना त्याला असलीच पाहिजे. म्हणून, जरी पांडवांविरूद्ध वैरभाव त्याच्या मनांत दृढ होऊन बसला होता, तरी हें रहस्य ज्ञात झाल्यानंतर निदान समाजांत त्यांच्याविषयी बोलताना काहीसा संयम इष्ट आहे इतकें कर्ण समजू शकत होता.

या दृष्टीने कर्णाच्या आचरणाचे परीक्षण केले म्हणजे याविषयी काही सूचक संकेत मिळतात. पांडवांच्या अज्ञातवास समाप्तीनंतर राजा द्रुपदाचा पुरोहित पांडवांचे राज्य परत मागण्यासाठी हस्तिनापुरला आला असतां, दुर्योधन कांही बोलण्यापूर्वीच कर्ण एकदम म्हणाला 'दुर्योधनातर्फे शकुनीने पांडवांना द्यूतांत हरवलें व द्यूताच्या अटीनुसार पांडव वनवासावर गेले. आतां पांडव ती अट पूर्ण न करतांच (अज्ञातवासाचें तेरावें वर्ष पार न पाडतांच प्रकट होऊन) राज्य परत मागत आहेत हा त्यांचा मूर्खपणा आहे. कोणाच्याही धमकावणीने दुर्योधन तें राज्य परत देणार नाही, मात्र न्यायानुसार सारी पृथ्वी देखील देईल. पांडवांनी प्रतिज्ञेनुसार पुनः वनवासांत जावे, अन्यथा खुशाल युद्ध करावें' (उद्योगपर्व २१-८ ते १५). या उद्‌गारांत आपल्यास पूर्वीचाच कर्ण दिसतो.

आणखी कांही दिवसांनी धृतराष्ट्राचा दूत होऊन संजय पांडवांकडे गेला. तो असफल परत आल्यावर कौरवसभेत झालेल्या चर्चेतही कर्णाची तीच पूर्वीची वृत्ति दिसून येते (उद्योगपर्व ४८-२९ ते ३२). या प्रसंगी कर्ण इतकेंही म्हणाला की, 'मी पळभरांत पांचालादि वीरांना व पृथापुत्रांना (कुन्तीपुत्रांना) देखील त्यांच्या पुत्रपौत्रांसह यमसदनास पाठवीन' (६२-५).

यावरून येथपावेतो कर्णाला आपलें कुंतीपुत्रत्व कळलें नव्हतें असा संकेत मिळतो. मात्र यानंतर अंतिम शांतिवार्तेसाठी स्वतः श्रीकृष्ण हस्तिनापुरीं गेले, तेंव्हा शांतिवार्ता भंग झाल्यावर त्याच दिवशी कर्णाचें श्रीकृष्णांशी व कुंतीशी (वर उद्धृत) संभाषण झालें, त्यावरून स्पष्ट आहे की, त्यापूर्वी त्याला आपलें जन्मरहस्य कळून चुकले होते. या सर्वाचा निष्कर्ष असा कीं, त्या



शांतिवार्तेच्या दिवसाच्या थोड्याच समयापूर्वी कर्णाला तें कळलें असावे. पण हें आणखी निश्चित करण्यापूर्वी या संबंधांत एका अन्य प्रश्नाकडे वळणे आवश्यक आहे.

**ते रहस्य कोणाकोणास माहीत होते?**

स्वतः कुंतीला तें रहस्य अर्थातंच संपूर्ण माहीत होते. अधिरथ सूताने वाढविलेला मुलगा वसुषेण हा सूर्यापासून झालेला माझा पुत्र आहे, याची माहिती गुप्त हेरांकडून तिला लवकरच मिळाली होती (वनपर्व ३०९-१५).

सूर्यालाही तें माहीत होतें. इन्द्रालाही ज्ञात असावें. कवचकुंडलहरण प्रसंगी जेव्हां कर्णानें इन्द्रास म्हटलें की, तुमच्या या प्रकारें माझ्याकडे येण्याची पूर्वसूचना मला प्राप्त झाली होती, तेंव्हा इन्द्रानें उत्तर दिलें की, माझी योजना सूर्यास कळून चुकली होती व त्यानेंच तुला सूचना दिली असली पाहिजे (वनपर्व ३१०-१८).

श्रीकृष्णांना हें रहस्य प्रथमपासूनच माहीत होतें याविषयी एक वचन हरिवंशांत आहे. श्रीकृष्णांनी गोवर्धन पर्वत उचलून व्रजवासियांचे रक्षण केल्यावर, इन्द्राने श्रीकृष्णांची प्रशंसा करून विनंती केली कीं, कुन्तीच्या पोटीं जन्मलेल्या (माझा पुत्र) अर्जुनाला त्यांनी सर्व प्रकारें साह्य करीत असावें. यावर श्रीकृष्णांनी मला कुन्ती, अर्जुन व पांडव माहीत आहेत असे सांगून आणखी म्हटलें-

**कानीनं चापि जानामि सवितुः प्रथमं सुतम्**
**पितृष्वसरि कर्णं वै प्रसूतं सूततां गतम्।। विष्णुपर्व १९-९७**

'याशिवाय सूर्यापासून माझ्या आतेला (कुन्तीला) कुमारी अवस्थेत झालेला प्रथम पुत्र, जन्मानंतर सूतकुलाचा म्हणून ओळखला जात असलेला, कर्णही मी जाणतो.' खरें म्हणजे, महाभारतात श्रीकृष्णांना ज्या ईश्वरी स्वरूपात चित्रीत केलें आहे, तें पाहतां त्यांना हें रहस्य केव्हांही अज्ञात असणें असंभवच होतें.

परंतु, याशिवाय कर्णाचें जन्मरहस्य कृष्णद्वैपायन व्यास, नारद व भीष्म यांनाही माहीत होते. युद्धांत भीष्म शरशय्येवर पडल्यावर कर्ण त्यांच्या भेटीस गेला असतां, त्यानें कौरवपक्ष सोडून पांडवांस मिळावें असें त्याला समजावितांना भीष्म म्हणाले-

**कौन्तेयस्त्वं न राधेयो न तवाधिरथः पिता**
**सूर्यजस्त्वं महाबाहो विदितो नारदान्मया।। भीष्मपर्व १२२-९**
**कृष्णद्वैपायनाचैव तच्च सत्यं न संशयः ।। १०**

'महाबाहो (कर्णा), तू राधापुत्र नसून कुन्तीपुत्र आहेस, आणि तुझा

पिताही अधिरथ नसून तुझा जन्म सूर्यापासून झाला आहे. मला हें नारदांपासून व कृष्णद्वैपायनांकडूनही कळलें असून तें निःसंशय सत्य आहे.' पण कर्णाला हें यापूर्वीच कळलें होते; कर्णाने कौरव पक्ष सोडण्यास पुनः नकार दिला.

नारदांना हें रहस्य माहीत होतें याचें भीष्माच्या या वचनाशिवाय आणखीही प्रमाण आहे. युद्धसमाप्तीनंतर कुन्तीकडून कर्णाचे जन्मरहस्य कळल्यावर युद्धिष्ठिराला कर्णवधाबद्दल फार शोक झाला, त्या वेळी नारदांनी युद्धिष्ठिराला कर्णांचे समग्र चरित्र सांगताना सुरवातीस म्हटलें की, लोकांत सूतपुत्र म्हणून ओळखला जाणारा कर्ण वस्तुतः एका कुमारिकेच्या पोटीं जन्मला होता. (शांतिपर्व- २-३,४,५).

काही जणांच्या मते विदुरालाही कर्णाचे जन्मरहस्य समजलें होते. मला यासाठी महाभारतांत आधार आढळला नाही. तरुण कौरवपांडवांचे शस्त्रास्त्रशिक्षण पूर्ण झाल्यावर द्रोणाने त्यांचे जनतेसमोर प्रदर्शन केले (आदिपर्व अध्याय १३३ ते १३६). त्यावेळी योगायोगानें कर्ण व अर्जुन आव्हानपूर्वक एकमेकांविरूद्ध द्वंद्व युद्धार्थ उभे ठाकले; हे पाहतांच माझेच दोन्ही पुत्र आतां परस्परांविरूद्ध लढतील या कल्पनेने कुंतीला मूर्छा आली. तेव्हां विदूराने जलसिंचन करून तिला सावध केले. पण केवळ इतका आधार विदुराला कुंतीच्या मनाची खरी व्यथा माहीत होती या अनुमानाला पर्याप्त नाही. कर्णही शस्त्रास्त्रांत अतिकुशल असल्याने या द्वंद्व युद्धात अर्जुनाच्या जीवनाला धोका आहे या धास्तीने कुंती व्याकुळ झाली असेल अशीही विदुराची कल्पना संभव होती. यानंतर कित्येक वर्षांनी हस्तिनापुरच्या शांतिवार्तेच्या दिवशी कुंती कर्णाकडे जाण्याच्या थोड्याच वेळापूर्वी विदुर तिला भेटला होता (उद्योगपर्व अध्याय १४४); त्यावेळी झालेल्या त्यांच्या संवादांत कौरवपांडवांच्या गृहकलहाविषयींच चिंता व्यक्त असून कर्णाच्या जन्मरहस्याचा कांहीही उल्लेख नाही.

**कर्णाला जन्मरहस्य प्रथम कोणी सांगितले?**

तें सूर्याने सांगितले नव्हते, व इन्द्रानेंही नाही. श्रीकृष्ण व कुंती यांनी शांतिवार्तेच्या दिवशी कर्णाजवळ त्याचा उच्चार केला, पण त्यापूर्वीच त्याला तें कळले होतें.

असे दिसते की, जोपावेतो समाजांत आपली अब्रू उघडी न पडावी म्हणून स्वतः कुन्ती कर्णाचे जन्मरहस्य प्रकट करू चाहत नव्हती, तोपावेतो तें रहस्य जाणणारे अन्यही त्याचा उच्चार प्रायः टाळत राहिले. पण आता शेष सारे शांतिप्रयास विफल होऊन शेवटी स्वतः श्रीकृष्ण अंतिम शांतिवार्तेसाठी हस्तिनापुरला जात होते; आणि दुर्योधनाचा दुराग्रही स्वभाव व अंध धृतराष्ट्राची



लाचारी स्थिती सर्वविदित असल्याने, श्रीकृष्णांच्या शांतिवार्तेची सफलता संदेहास्पदच होती. हस्तिनापुराला जाण्यास निघण्यापूर्वी श्रीकृष्णांनी रडत असलेल्या द्रौपदीला म्हटले होते की, कौरवांनी न्यायसंगत संधि स्वीकार न केल्यास, ते मारले जाऊन तू रडत आहेस त्याप्रमाणे त्यांच्या विधवा स्त्रिया रडत राहतील (उद्योगपर्व अध्याय ८२).

या परिस्थितींत या अंतिम समयी कर्णाला त्याचे कुन्तीपुत्रत्व सांगून (कौरवपांडव कुल युद्ध झाले तरी) निदान कुंतीच्या पुत्रांत परस्पर घृणास्पद संघर्ष टाळावा असा प्रयत्न करण्याची इच्छा नारदांना व श्रीकृष्णांनाही होणे स्वाभाविक होते. नारदांनी यापूर्वीही पांडवांच्या जीवनांत काही महत्वपूर्ण भूमिका पार पाडली होती. द्रौपदीच्या स्वयंवरानंतर तिच्यामुळे पांडव बंधूंत आपसांत विरोध होऊ नये या उद्देशानें, नारदांनी स्वतः इन्द्रप्रस्थास येऊन द्रौपदीसंबंधाने त्या पाच भावांसाठी एक नियम घालून दिला होता. आणि त्यानंतर कांही वर्षांनी नारदांनी पुनः पांडवांकडे येऊन त्यांना राजसूय यज्ञ करण्याची प्रेरणा दिली होती (सभापर्व अध्याय ५ ते १२).

श्रीकृष्णांच्या हस्तिनापुर शांतिवार्तेच्या वेळी नारदांची उपस्थिती महाभारतकारांनी विशेष रूपाने दर्शविली आहे. श्रीकृष्ण हस्तिनापुरला जात असतां मार्गात त्यांना काही महर्षि भेटले; त्यांना शांतिवार्तेत होणारे श्रीकृष्णांचे भाषण प्रत्यक्ष ऐकण्याची इच्छा होती (उद्योगपर्व अध्याय ८३ श्लोक ६० ते ७२). महाभारताच्या एका पाठांत त्या ऋषींची नांवेही दिली असून त्यांत नारदांना प्रमुख म्हटले आहे. यानंतर प्रत्यक्ष शांतिवार्तासभेंत उपस्थित त्या ऋषींचा स्वतः श्रीकृष्णांनी 'नारदप्रमुखान् ऋषीन्' असा उल्लेखही केला (अध्याय ९४ श्लोक ४१ ते ४६). आणि याशिवाय त्या सभेत स्वतः नारदांनी भाषण देऊन दुर्योधनाला समजावण्याच्या प्रयत्नही केला (अध्याय १०६ ते १२३).

हा सारा संदर्भ ध्यानांत घेता, नारदांनी यावेळी कर्णाला त्याचे जन्मरहस्य सांगण्याचा विचार करून हस्तिनापुरच्या वाटेंत श्रीकृष्णांना आपला विचार सांगितला, श्रीकृष्णांनाही तो (कुंतीपुत्रांत संघर्ष टाळण्याशिवायही) दुर्योधनाविरूद्ध 'भेदनीति' चा प्रयोग करण्याच्या दृष्टीनें उचित वाटला, आणि तदनुसार नारदानें हस्तिनापुरला पोचतांच कर्णाला त्याचे जन्मरहस्य सर्वप्रथम सांगितले. हा निष्कर्ष सर्व संबंधित तथ्यांशी व संकेताशी सुसंगत जुळतो. यामुळेंच हस्तिनापुराला पोचल्यावर श्रीकृष्णांना हें माहीत होते की, कर्णाला (नारदाकडून) त्याचे जन्मरहस्य कळलें आहे; आणि त्या संदर्भात त्यांनी कर्णाला एकीकडे

बोलावून संवाद केला हें आपण वर पाहिलेंच आहे.

जर श्रीकृष्णांशी नारदांचा या विषयावर विचारविनिमय हस्तिनापुरच्या वाटेत झाला, तर नारद श्रीकृष्णांच्या अगोदर हस्तिनापुरला पोचून कर्णास तें रहस्य कसें सांगू शकले? तसें तर नारद आकाश संचारी होते (उद्योगपर्व ९४-४१). पण या वेळी ते अन्य ऋषींबरोबर रस्त्यानें जात होते हें ही विचारांत घेतले, तरी प्रकरण ५ मध्यें दाखविल्याप्रमाणें, श्रीकृष्णांचा हस्तिनापुर प्रवास केवळ एक दिवसाचा नसून चार पाच दिवस चालला होता, आणि तेवढ्यांत नारद शीघ्रतापूर्वक श्रीकृष्णांच्या आधी हस्तिनापुरास पोचू शकत होते.

कर्णाला त्याचे जन्मरहस्य नारदांनी सांगितले असावे याच्या पुष्ट्यर्थ महाभारतांत एक विशेष संकेतही आहे. जेव्हा कवचकुण्डलें मागण्यास इन्द्र येण्याची पूर्वसूचना सूर्याने कर्णाला दिली, त्यावेळी सूर्याने कर्णाला आपला पुत्र न म्हणतां केवळ भक्त म्हटलें (वनपर्व ३००-२२, ३०१-८, वर उद्धृत). पण त्याबरोबर सूर्य आणखी असें म्हणाला-

**अस्ति चात्र परं किञ्चिदध्यात्मं देवनिर्मितम्**
**अतश्च त्वां ब्रवीम्येतत् क्रियतामविशङ्कया।। वनपर्व ३०१-९**
**देवगुह्यं त्वया ज्ञातुं न शक्तं पुरुषर्षभ**
**तस्मान्नाख्यामि ते गुह्यं काले वेत्स्यति तद् भवान्।।१०**

"यासंबंधात देवांनी योजलेले एक रहस्य असून, त्यामुळेंच मी तुला हें सांगत आहे; तू याप्रमाणे निःशंक कर. कर्णा, देवांचे तें रहस्य तू (यावेळी) जाणू शकणार नाही (यावेळी तें तूला माहीत व्हावें अशी देवांची योजना नाही). म्हणून मी तुला तें सांगत नाही. परंतु योग्य वेळी तुला तें माहीत होईल." याच संदर्भात जनमेजयाने वैशंपायनास विचारले, 'किं तद् गुह्यं न चाख्यातं कर्णायेहोष्णरश्मिना' (३०३-१ "सूर्याने या वेळी कर्णास न सांगितलेलें तें 'रहस्य' काय होते?") आणि उत्तरांत वैशंपायनाने कर्णाचा सारा जन्मवृत्तांत सांगितला.

महाभारतकारांनी कर्णाच्या जन्मरहस्यासाठी विशेष रूपाने प्रयुक्त हा 'देवगुह्यं' शब्दप्रयोग नारदांनी युद्धसमाप्तीनंतर युधिष्ठिराला कथन केलेल्या कर्णाच्या जन्मवृत्तांताच्या आरंभीही पुनः आला आहे, 'गुह्यमेतत् तु देवानां कथयिष्यामि ते ऽ नघ' (शांतिपर्व २-३). हे शब्दसाम्य या तर्काची पुष्टि करतें की, महाभारतानुसार तें 'देवगुह्यं' (कर्णाचे जन्मरहस्य) देवर्षि नारदांनी कर्णाला सर्वप्रथम सांगितले होते. देवांच्या गोष्टी इकडेतिकडे पोचविण्याची नारदांची पौराणिक भूमिका प्रसिद्धच आहे.



नारदांनी कर्णाला कथन केलेलें तें रहस्यकथन पूर्ण विफल झालें असेही नाही. श्रीकृष्णशिष्टाईच्या बैठकीत कर्ण एक अक्षरही बोलला नाही. उलट यापूर्वी तो दुर्योधनातर्फे पांडवांविरूद्ध कसें उर्मट बोलत असे हें आपण वर पाहिलेंच आहे. परंतु यावेळी श्रीकृष्णांनी दुर्योधनाला उद्देशून प्रत्यक्ष कर्णाचे नांव घेत तुच्छतापूर्वक म्हटलें की, 'दुर्योधना, तू दुःशासन, शूर कर्ण व शकुनी यांच्यावर भरवसा ठेवून आहेस, पण पांडवांविरूद्ध पराक्रमासाठी हे अपूरेच ठरतील' (उद्योगपर्व १२४- ४५, ४६, ४७); तरीही अभिमानी कर्णाने यावर काहीही उत्तर दिले नाही. श्रीकृष्णांनी त्या सभेंत स्वतः कर्णाच्या समक्ष आणखी हेंही म्हटलें-

**नृशंसानामनार्याणां पुरूषाणां च भाषणम्**
**कर्णदुःशासनाभ्यां च त्वया च बहुशः कृतम् ।। उद्योगपर्व १२८-१२**

'(दुर्योधना), तू कर्ण व दुःशासन यांसह (पांडवांविरूद्ध) क्रूर व असभ्य पुरूषांसमान अनेक उद्‌गार काढले आहेस.' यावर दुःशासनानें एकदम उठून उत्तर दिले (१२८-२२. २३, २४). पण दोन दिवसांपूर्वीच आपलें जन्मरहस्य जाणणारा कर्ण मूकच राहिला! तें रहस्य कळल्यानंतरही दुर्योधनपक्ष सोडण्याचा विचार त्यानें केला नाही; पण समाजात आपला पांडवद्वेष व्यक्त करण्याच्या त्याच्या वृत्तीवर आतां कांही आळा बसला होता असे दिसतें. ❐

प्रकरण २२

# द्रौपदी आणि तिचें पंचपतित्व

महाभारत कथेचें लोकरीतिष्टया अतिशय असाधारण असें द्रौपदीचें पंचपतित्व एक विलक्षण वैशिष्ट आहे. भारतीय संस्कृतींत बहुपतित्व रूढ नाही. आणि तरीही श्रेष्ठ भारतीय पतिव्रतांत द्रौपदीला आदराचें स्थान दिलें गेलें आहे.

**महाभारतांतील कथन**

वारणावत नगरांतील कपटी लाक्षागृहातून जीव वाचवून पळाल्यानंतर कुंती व पांडव व्यासांच्या आदेशानुसार एकचक्रा नगरींत गुप्तपणें राहू लागले (आदिपर्व अध्याय १५५). तेथे पांडवांना राजा द्रुपद आपली कन्या द्रौपदीचे स्वयंवर करणार आहे अशी बातमी कळली, व त्याबरोबरच तिच्या यज्ञोद्‌भव जन्माचा वृत्तांतही कळला (अध्याय १६४, १६५, १६६). साहजिकच तरुण पांडवांना स्वयंवरात उपस्थित राहण्याची इच्छा झाली. कुंतीच्या संमतीने त्यांनी द्रुपदनगरास जाण्याचे ठरविले (अ. १६७). या दरम्यान व्यास येऊन त्यांना भेटले (अ. १६८). त्यांनीही पांडवांना द्रुपदनगरास जाण्यासाठी प्रोत्साहित केले, व द्रौपदीच्या पूर्वजन्माची एक कथा सांगून या जन्मी ती तुम्हा पाच बंधूंची पत्नी होण्यासाठी नियुक्त आहे असे म्हटले.

यावेळी व्यासांनी सांगितलेली ती कथा अशी होती. एका ऋषिकन्येस काही कारणाने पति मिळत नव्हता. यासाठी तिने शंकराची आराधना केली. शंकरानें प्रसन्न होऊन तुला काय हवें तें माग असे म्हटले. कन्येने मला सर्वगुणसंपन्न पती हवा असे म्हटले. पण जोर देण्यासाठी तिने ते पाच वेळा म्हटले. म्हणून शंकराने तुला भरतकुलोत्पन्न पाच श्रेष्ठ पती प्राप्त होतील असा वर दिला. कन्या म्हणाली की, मला एकच पति हवा. पण शंकर म्हणाले की, तू पाच वेळा मागितले म्हणून मी तुला पाच पती दिले, व पुढील जन्मी ते तुला प्राप्त होतील. इतके सांगून व्यास म्हणाले की तीच कन्या आता द्रुपदाच्या कुळात जन्म पावली आहे, आणि-



**निर्दिष्टां भवतां पत्नी कृष्णा पार्षत्यनिन्दिता**
**पांचालनगरे तस्मान्निवसध्वं महाबलाः।। आदिपर्व, १६८-१५**

'राजा पृषताची पौत्री अनिंद्य कृष्णा (द्रौपदी) तुमची (तुम्हा पाच बंधूंची) पत्नी नियुक्त आहे; म्हणून महाशूरांनो, तुम्ही पांचाळ (द्रुपद) नगरात जाऊन राहा.' यानंतर व्यास गेले; आणि कुंतीसह पांडव द्रुपदनगरी एका कुंभाराच्या घरांत एका कुटीत ब्राह्मण वेषांत भिक्षावृत्तीने निवास करू लागले.

स्वयंवराचे दिवशी पांडव राजमंडपात गेले. तेथे धनुर्विद्येसंबंधी एक फार कठीण पण लावला होता. अनेक राजे तो जिंकण्यास असमर्थ ठरल्यावर ब्राह्मणवेषधारी अर्जुनाने तो जिंकला. युधिष्ठिर, नकुल व सहदेव निवासस्थानी जाण्यास पुढे निघाले. एका ब्राह्मण बटूने द्रौपदी जिंकल्याचे पाहून तेथे जमलेले अनेक राजे खवळले. पण भीमार्जुनांनी त्या सर्वांचा शौर्याने प्रतिकार केला, व द्रौपदीसह ते आपल्या निवासस्थानी गेले. इकडे कुन्ती कुटीत एकटीच होती; आणि वेळ अपराण्ह प्रहराची (१८९-४७), व सहज झोपेची डुलकी आणण्यासारखी ('सुप्तजनप्राये') होती.

युधिष्ठिरादि तिघे आधी घरी पोचले. लवकरच द्रौपदीसह भीमार्जुनही आले; त्यांनी विजयामुळे अति प्रफुल्लित मनोवृत्तीत ('परमप्रतीतो') काहीशा गमतीच्या स्वरात बाहेरूनच (१९०-१) म्हटले, 'आई ही आम्ही भिक्षा आणली आहे.' कुंतीने आतूनच पडल्या पडल्या म्हटले, 'सर्वे समेत्य भुङक्त' (१९०-२), 'तुम्ही सर्व मिळून ती खा'. पण दुसऱ्याच क्षणी द्रौपदीला प्रत्यक्ष पाहून आजच्या 'भिक्षे' चे खरे स्वरूप तिच्या ध्यान्यात आले. सहाजिकच ती चपापली; व आपल्या तोंडून चुकून ('प्रमादात') भलतेच शब्द बाहेर पडले असे म्हणाली (१९०-४). मात्र तरीही ('भुङक्त' चा अर्थ उपभोग घ्या असा व्यापकही होत असल्याने) माझे ते शब्द द्रौपदीच्या बाबतीत खरे ठरावेत अशी इच्छा तिने व्यक्त केली (१९०-५) यावर,

**स एवमुक्तो मतिमान् नृवीरो**
**मात्रा मुहूर्तं तु विचिन्त्य राजा**
**कुन्तीं समाश्वास्य कुरुप्रवीरो**
**धनंजयं वाक्यमिदं बभाषे।।१९०-६**
**त्वया जिता फाल्गुन यज्ञसेनी**
**त्वयैव शोभिष्यति राजपुत्री**
**प्रज्वाल्यतामग्निरमित्रसाह**

गृहाण पाणिं विधिवत् त्वमस्याः ।।७

"राजा (जनमेजय), त्या बुद्धिमान कुरूश्रेष्ठ नरवीराने (युधिष्ठिराने) आईचे ते म्हणणे ऐकून थोडा विचार केला व कुंतीला (तुझ्या इच्छेप्रमाणे होईल अशा स्वरूपाचे) आश्वासन दिलें, पण (प्रथम अर्जुनाचें मन जाणण्यासाठी) अर्जुनाला म्हटले- 'अर्जुना, तू द्रौपदीला जिंकले आहेस आणि तुझ्या जोडीनेच ही राजपुत्री शोभा पावेल; तरी शत्रुंजया, अग्नी प्रज्वलित करून हिचे विधिवत पाणिग्रहण कर'." पण वडील बंधूंच्या पूर्वी मी लग्न करणे उचित नाही असे अर्जुनाने नम्रपणे उत्तर दिले. द्रौपदी पाचीं बन्धूंची पत्नी व्हावी असा व्यासांनी यापूर्वीच आदेश दिला होता. अर्जुनाचा विचार ऐकून युधिष्ठिराने सर्व बंधूंवर दृष्टिक्षेप केला व द्रौपदीच्या पंचपतित्वाचा निर्णय स्पष्टपणें व्यक्त केला.

दुसरे दिवशी राजा द्रुपदाच्या आमंत्रणावरून कुंती व द्रौपदीसह पांडव, राजवाड्यात गेले. यापूर्वीच द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नाने आधल्या दिवशी पांडवांच्या मागोमाग चुपचाप जाऊन त्यांचे सारे वागणे वगैरे पाहिले होते; व बहुधा हे ब्राह्मणवेषधारी पांडव असावेत असी सुखद शंकाही त्याने पित्याजवळ व्यक्त केली होती. आता राजवाड्यात युधिष्ठिराने आपला सर्वांचा स्पष्टच परिचय दिला. द्रुपदास फार आनंद झाला. त्याने सुचविले की, अर्जुनाचा द्रौपदीशी रीतसर विवाह साजरा व्हावा (१९४-२०). पण युधिष्ठिराने म्हटले की, आम्ही पाचही जण तिच्याशी विवाह करू चाहतो.

हे ऐकून द्रुपद म्हणाला, 'एका पतीला अनेक पत्न्या असतात. पण एका स्त्रीचे अनेक पती कोठेही एकले नाहीत; युधिष्ठिरा, लोकरीती व वेद याविरूद्ध हा भलताच विचार तुम्ही काय केला आहे?' यावर युधिष्ठिराने उत्तर दिले की, असे विवाह पूर्वीही झाले आहेत. माझा विचार धर्मानुकुल आहे, आणि आमच्या मातेचीही अशीच इच्छा आहे. अशा प्रकारे बोलणे चालू असता स्वतः व्यास महर्षी तेथे उपस्थित झाले. द्रुपदाने त्यांच्यासमोर हा प्रश्न ठेवला. युधिष्ठिराने पुनः म्हटले की माझे म्हणणे धर्मानुकुल असून, प्राचीन काळी अत्यंत धर्मनिष्ट अशा गौतमगोत्रीय जटिला नामक स्त्रीने सात ऋषींशी विवाह केला होता (१९५-१४), व मुनिकन्या वार्क्षीदेखील दहा तपोपूत बंधूंची पत्नी झाली होती (१९५-१५); आणि आमच्या मातेनेही आम्हाला असा आदेश दिला आहे (१६,१७); कुंतीनेही असे म्हटल्याची पुष्टी केली. (१८). यावर व्यास म्हणाले की युधिष्ठिराचे म्हणणे धर्मानुकूल आहे; ते द्रुपदाला एकीकडे घेऊन



गेले व द्रौपदीच्या दोन जन्मपूर्व घटना सांगून पाच पांडवांची ती पूर्वनियोजित पत्नी आहे हे समजाविले (आदिपर्व अध्याय १९६).

यापैकी एका कथेप्रमाणे द्रौपदी मूळची 'स्वर्गश्री' असून पाच पांडव मुळात वज्रधारी देवराज इन्द्र व चार 'पूर्वेन्द्र'यांचे अवतार होते. शंकराच्या आज्ञेने हे पाच इहलोकी पाच पांडवांच्या रूपाने जन्म पावले असून, स्वर्गश्री त्यांची पत्नी होण्यासाठी द्रौपदीच्या रूपाने अवतरली आहे. व्यासांनी त्या पाच जणांची नांवेही सांगितली, आणि द्रुपदाला दिव्य दृष्टी देऊन ते पाच व स्वर्गश्री यांचे दर्शन घडविले. द्रौपदी पूर्वीची स्वर्गश्री असल्याचे उल्लेख महाभारतात अन्यत्रही आले आहेत (सभापर्व ८१-२९,३० व स्वर्गारोहण पर्व ४-१२,१३). व्यासांनी द्रुपदास सांगितलेली दुसरी कथा ऋषिकन्येची असून ती त्यांनी पूर्वी पांडवांसही सांगितली होती. शेवटी समन्वय करीत व्यास म्हणाले की, द्रौपदी म्हणजेच ती स्वर्गश्री व ऋषिकन्या होय, व अशा प्रकारे ती आधीपासूनच पाच पांडवांची पत्नी नियुक्त आहे (आदिपर्व १९६-५१, ५२,५३).

यानंतर द्रुपदाने आपली संमती दिली, व युधिष्ठिरापासून प्रारंभ करून एकेकाशी एकेक दिवशी असे द्रौपदीचे पाचही पांडवांशी विवाह झाले.

असे हे महाभारतकारांनी कथन केलेले द्रौपदीच्या पंचपतित्वाचे मूलभूत स्वरूप आहे. आता या पंचपतित्वाविषयी जे भ्रम व्यक्त करण्यात येतात त्यावर विचार करू.

**ते पंचपतित्व विशिष्ट जातीचे होते काय?**

चिं. वि. वैद्य लिहितात, "एका स्त्रीने अनेक पती करण्याची चाल प्रारंभी प्रारंभी हिमालयातून नवीन आलेल्या चंद्रवंशी आर्य लोकात सुरू होती असे द्रौपदीच्या उदाहरणावरून आपणास मान्य करावे लागते. यात एक विशेष लक्षात ठेवण्यासारखा हा आहे की, हे अनेक पती निरनिराळ्या कुटुंबातील नसून एकाच कुटुंबातले सख्खे भाऊ असत व हल्लीही हिमालयातील पहाडी लोकात कित्येक ठिकाणी ही चाल रूढ आहे. त्यांतही असाच प्रकार आहे.... काही चंद्रवंशी आर्यांनी आणलेले ही चाल भरतखंडात रुजली नाही. भारत काळी भारतीय आर्य लोकात ती बिलकुल रूढ नव्हती" ('महाभारताचा उपसंहार' प्रकरण ७).

पण महाभारतातील पांडव भारतीय आर्य नव्हते काय? महाभारतात त्यांची जी वंशावळ दिली आहे ती सारी भारतीय आर्यवंशीय आहे. आणि राजा

द्रुपद कोण होता? अभारतीय आर्य म्हणून पांडवांनी पंचपतित्वाचा आग्रह धरला असता, तरी राजा द्रुपदानें त्याला कशी मान्यता दिली असती? आणि युधिष्ठिराने पंचपतित्वाचे जे दोन प्राचीन अपवादात्मक दाखले दिले (ज्यांची पुष्टि आदिपर्व ७५-५ व हरिवंश अध्याय २ मध्येही होते) ते कोणत्या आर्यांचे होते? द्रौपदीचें पंचपतित्व एखाद्या विशिष्ट जातिप्रथेशी संबद्ध दर्शविणारा उल्लेख व्यासांच्या, युधिष्ठिराच्या, कुंतीच्या तोंडी मुळीच नाही. उलट महाभारतकारांनी त्या अपवादात्मक घटनेचा संपूर्ण संबंध द्रौपदी व पांडवांच्या पूर्वजन्मांशी लावला आहे.*

**ते पंचपतित्व पांडवांच्या लंपटतेमुळे होते काय?**

दाजी पणशीकर 'महाभारत एक सूडाचा प्रवास' या पुस्तकांत (प्रकरण २३) लिहितात, "द्रौपदीशी पांडवांचा विवाह झाल्यानंतर अर्जुनाने सुभद्रेला पळवून आणून तिच्याशी विवाह केला ...... नियमाला अपवाद करूनही जो नवा नियम द्रौपदीसाठी अमलात आणला जातो तोच नियम सुभद्रा किंवा इतर स्त्रियांना का लागू होत नाही? याचे सरळ आणि स्पष्ट कारण हेच निष्पन्न होते की, असाधारण सौन्दर्यवती द्रौपदीचे आकर्षण त्या चारही पांडवांना अनिवार्य ठरले, आणि त्यामुळेच त्यांनी रूढीविरूद्ध जाऊनही द्रौपदीला आपली वाटेकरी करण्याचा क्षुद्रपणा केला. ...... द्रौपदीसारखी सुंदरांगी यौवना एकट्या अर्जुनाची म्हणून राहण्याने इतर चार पांडवांच्या मनांत तिच्याविषयीच्या आकर्षणामुळे असूया निर्माण होऊ शकते. तिला पाहताच युधिष्ठिरापासून सर्वानाच ती आपली पत्नी असावी असे वाटते." (पृ.२६९-२७०)

या उद्धरणात पुढील ध्वनी आहेत- द्रौपदीचे असामान्य सौंदर्य तिच्या पंचपतित्वाचे खरे कारण होते; पांडवांच्या अन्य वैयक्तिक पत्न्या तितक्या सुंदर नव्हत्या; आणि त्या सुंदर असत्या तर सर्व पांडवांनी त्यांनाही आपल्या वासनापूर्तीचे भक्ष्य बनविले असते. पण ही विधाने निराधार आहेत.

महाभारतकारांनी द्रौपदीचे सौंदर्य तिच्या पंचपतित्वाचे कारण मानलेले नाही. व्यासांनी सांगितलेला तिचा जन्मपूर्व वृत्तांत हे त्याचे खरे कारण आहे. तो वृत्तांत केवळ पौराणिक भाकडकथा होय असेही कोणास म्हणावयाचे असेल, तरी ती कथा पांडवांच्या डोक्यातून निघाली नसून व्यासांनी त्यांना व

* वि. का. राजवाडे 'भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास' पुस्तकांत द्रौपदीच्या पंचपतित्वाच्या संबंधात व्यासोक्त पूर्वजन्मकथांचा काहीही उल्लेख करीत नाहीत. महाभारतांतील काही अन्य कथांविषयीही या पुस्तकांत निराधार विपर्यस्त विचार व्यक्त केले आहेत.



नंतर द्रुपदाला सांगितली आहे. पांडवांनी द्रौपदीला प्रत्यक्ष पाहण्यापूर्वीच व्यासांनी तिचें त्यांच्याशी असे पूर्वनियोजित पंचपतित्व सांगून ठेवले होते आणि त्याप्रमाणे पांडवांनी निर्णय घेतला.

कमलाबाई टिळक लिहितात ("युधिष्ठिर", पृ. १८,१९,२०) "....भिक्षा काय आहे न पाहतांच, कुंतीने 'नेहमीसारखी वाटत घ्या बाळानों' म्हणून उत्तर देऊन टाकले. पण बाहेर येऊन त्रिभुवनसुंदरी द्रौपदी पाहताचं ती स्तंभित झाली. मुलांची पंचाईत झाली. आईच्या तोंडातून निघालेला शब्द वृथा जायला नको होता. शिवाय त्या सर्वांगसुंदर श्यामेला बघून पांची जणांची मनें विचलित झाली होती..... धर्मराज काय किंवा भीम काय कुणाही एका पांडवाची धर्मपत्नी म्हणून घरांत वावरणे, गृहशांतीच्या तसेंच कौटुंबिक स्थैर्याच्या दृष्टीनें धोक्याचे ठरणार आहे हें सत्य अनुच्चारित असलें तरी कुंतीला व धर्मराजाला ढळढळीत दिसत होते. तेव्हां या प्रश्नाची उकल म्हणून पांचांनीही द्रौपदीला वरावें म्हणजे आईच्या शब्दही खाली पडणणार नाही व कलहाचे बीजही रूजणार नाही, असा निर्णय घेण्यात आला."

द्रौपदीला प्रत्यक्ष पाहिल्यावर प्रत्येक पांडवाला तिजविषयी अनिवार्य अभिलाषा उत्पन्न होऊन जो तो तिला स्वपत्नी करण्याची इच्छा करू लागला असे नव्हे. व्यासांनी पांडवाना आधींच सांगितलें होते की, द्रौपदी तुम्हा पाचांची पत्नी नियुक्त आहे. तरीही तिच्याशी कोणत्या क्रमानें विवाह करावयांचा होता हा प्रश्न उरला होता. युधिष्ठिरानें सर्वात मोठा भाऊ म्हणून स्वतःला एकदम द्रौपदीशीं विवाहार्थ पुढे न करतां, कुंती व द्रौपदीसमोर अर्जुनास प्रथम म्हटले की, तू हिला जिंकली असल्याने तू हिच्याशी प्रथम विवाह कर (श्लोक १९०-७, वर उद्धृत). आणि यावर अर्जुनही एकदम बाशिंग बांधून द्रौपदीबरोबर बोहल्यावर चढण्यास न धावता उलट म्हणाला- "राजा, माझ्या हातून असा अधर्म घडवू नका; असे आचरण धर्मानुकूल होणार नाही; हीन लोक असे करतात. प्रथम तुमचा विवाह व्हावा, नंतर महान कर्मे करणाऱ्या या महाबाहु भीमाचा, त्यानंतर माझा; माझ्यामागून नकुलाचा व तत्पश्चात सहदेवाचा. भीम, मी, नकुल, सहदेव व द्रौपदी हे सारे तुमच्या आज्ञेच्या अधीन आहेत, आणि एकूण परिस्थिती विचारात घेऊन जे धर्मानुकूल व राजा द्रुपदालाही हितकर असेल ते करावे; तदनुसार आम्हाला आदेश द्या, आम्ही सर्व त्याप्रमाणे करण्यास तयार आहो" (१९०-८,९,१०) अन्य कोणीही भावाने याविरूद्ध अवाक्षरही काढले नाही.

पण तरीही येथे एका विशेष श्लोकावर विचार करू. वरील विचारविनिमय

चालू असता-

**तेषां तु द्रौपदीं दृष्ट्वा सर्वेषाममितौजसाम्**
**सम्प्रमथ्येन्द्रियग्रामं प्रादुरासीन्मनोभवः ।।१९०-१३**

"द्रौपदीकडे पाहून त्या सर्व अति शूर वीरांच्या इन्द्रियांना उत्तेजित करीत (त्यांच्या चेहऱ्यावर) मदनभाव प्रकट झाला." या श्लोकावरून पांडवाविषयी कुत्सित उद्‌गार काढले जातात. पण द्रौपदी तुम्हा पाचांची पूर्वनियोजित पत्नी आहे हा व्यासांचा संदेश त्या सर्वांना आधीच ज्ञात होता. महाभारतकारांना द्रौपदीचे पंचपतित्व पूर्वनियोजित पण तरीही सर्व पांडवांच्या दृष्टीनें पूर्णतः वैयक्तिक स्वेच्छापूर्वक दाखवावयाचे होते. वरील श्लोकाचा मथितार्थ इतकाच की, महाकवीने यात काव्यात्मक भाषेत पाचही पांडवांची द्रौपदीविषयक संमती दर्शविली आहे.

आतां, पांडवांच्या अन्य पत्न्यां विशेष सुंदर नव्हत्या, व असत्या तर ते पाचही बंधू आपली वासनापूर्ती त्यांच्यावर देखील लादते या विधानांतील सत्यता पाहू. सुभद्रेविषयी अर्जुन म्हणतो, 'रूपेण चैषा संपन्ना कमिवैषान् न मोहयेत्' (आदिपर्व २१८-१८,'ही रूपसंपन्न असून कोणाला मोहित करणार नाही?'). याशिवायही महाभारतकार तिला 'चारुसर्वांगी' (सर्वांगसुंदर, वरांगना, पृथुताम्राक्षी, पूर्णेन्दुसदृशानना' असे म्हणतात (२१६-७,२२०-२९). आणि तिच्याशी विवाह करण्याची इच्छा झाल्यावर अर्जुनाने परभारेंच विवाह करून न टाकता, युधिष्ठिराकडे निरोप पाठवून संमति मागविली. आणि संमति मिळाल्यावरच त्याने सुभद्राहरण केले. तिकडे आपली संमती देतांना आम्ही शेष पांडवही तिच्याशी विवाह करू चाहतो अशी काहीही अट युधिष्ठिराने घातली नाही.

द्रौपदीस्वयंवरापूर्वी पांडवांना हिडिंबा एका अतिशय सुंदर स्त्रीच्या स्वरूपांत भेटली होती. तिचेही तें सौंदर्य 'अतिमानुषम्' होते. तिला पाहून कुंतीला ती एखादी देवकन्या, वनदेवता किंवा अप्सराच वाटली! (आदिपर्व १५३-१,२,३,४). अशा तिला पाहून, व ती केवळ भीमाशी संबंध चाहत असतां, शेष तरुण पांडवांचे चित्त विचलित झाले काय? आणि भीम तरी तिच्यावर एकदम भाळला काय? युधिष्ठिराने संमति दिल्यावरच भीमानें तिचा स्वीकार केला, व तोही एकाच पुत्रप्राप्तीच्या अटीवर. तो पुत्र घटोत्कच होय. पांडवांवर द्रौपदीच्या संबंधांत अनिवार्य कामुकतेचा आरोप करीत दुर्गा भागवतही लिहितात, 'भावाभावांनी एक द्रौपदी वाटून घेतली, त्याच्या मुळाशी कुंतीच्या आज्ञेहूनही ती एकाला मिळाल्यास इतरांचे स्वास्थ जाईल, भावांचा एकोपा मोडेल, तसे होऊ नये हाच हेतू गर्भित होता.' ('व्यासपर्व'पृ.१२०)



पांडव बंधूवर असा आरोप करणाऱ्यांना पुढील श्लोकांत कांहीसा आधार भासण्याचा संभव आहे म्हणून त्यावर खुलासा करतो. कुंतीसमक्ष द्रौपदीसंबंधाने बोलणें चालू असतां, युधिष्ठिरानें सर्वभावांवर दृष्टिक्षेप केला, आणि -

**अब्रवीत् सहितान् भ्रातृन् मिथोभेदभयान्नृपः**
**सर्वेषां द्रौपदी भार्या भविष्यति हि नः शुभः ।।१९०-१६**

'राजा (युधिष्ठिरा) ने द्रौपदीवरून आम्हां बंधूंत संघर्ष होऊ शकले या भीतीनें म्हटले की, ही कल्याणी द्रौपदी आम्हां सर्वांची भार्या होईल.' पण युधिष्ठिराला द्रौपदीमुळे आपल्या बंधूंत संघर्षाचा संभव वाटला, तो अन्य बंधूंच्या कामलोलुपतेमुळे नव्हे तर, व्यासांनी त्यांना आधींच सांगितले होते की, द्रौपदी तुम्हा पांचाजणांची पत्नी पूर्वनियुक्त आहे या कारणानें. हें या श्लोकाच्या पूर्वी लागूनच आलेल्या श्लोक १५ च्या या द्वितीय पंक्तीवरून स्पष्ट आहे, "द्वैपायनवचः कृत्स्नं सस्मार मनुजर्षभः". त्या वचनाच्या संदर्भात द्रौपदीचा विवाह केवळ कोणा एका बंधूशीं झाला असता, तर अन्य बंधूंच्या मनांत वैषम्य उत्पन्न होणें स्वाभाविकच होते. व्यासांनी आधींच तसे सांगून ठेवले नसतें, तर द्रौपदीचा विवाह एका पांडवाशीं झाला असता तर अन्य बंधूंनी गृहकलह केला असता असे सुचविण्यास पांडवांच्या संपूर्ण चारित्र्यांत काहीही आधार नाही.

**ते पंचपतित्व कुंतीने लादलें होते काय?**

'युगान्त' पुस्तकांत इरावती कर्वे म्हणतात, "द्रौपदी पाचांची बायको करण्याचा निश्चयही तिचाच (कुंतीचा)" (पृ.७५); "ती पाचांची व्हावी हा हट्ट कुंतीचाच" (पृ.८१).

पण अशा प्रकारे द्रौपदींच्या पंचपतित्वाची मूळ जबाबदारी कुंतीवर टाकणे चुकीचे आहे. तिने आपली ती इच्छा व्यक्त करण्यापूर्वी स्वतः व्यासांनी द्रौपदी पाचही पांडवांची पूर्वनियोजित पत्नी आहे हे निःसंदिग्ध सांगितले होते. या दृष्टीने कुंतीच्या त्या शब्दांची एकंदर पार्श्वभूमि पाहा. स्वयंवराचे दिवशी पांडव राजमंडपात गेले. ती अत्यंत आतुरतेने पुत्र तेथून परत येण्याची वाट पाहत होती हे काय सांगावयास पाहिजे? दुपार टळून अपराण्ह समय होऊ लागला तसे 'मन चिंती तें वैरी न चिंती' या न्यायाने तिचें मन अधिकच चिंतित व उदास होऊन गेले; त्या दिवसाचे वातावरणही कोंदट व सुस्ती आणणारे होते (आदिपर्व १७९-४३ ते ४६; १८९-४६,४७).

अर्जुनाने पण जिंकल्यावर युधिष्ठिर, नकुल व सहदेव प्रथम कुटीवर आले. पण तेथे एकटी बसलेल्या उदास कुंतीस संभवतः क्षणभर गुंगी आलेली

पाहून, ते भीमार्जुनासह द्रौपदीची वाट पाहत स्वस्थ राहिले. लवकरच द्रौपदीसह भीमार्जुन येऊन पोचले; व आनंदाच्या भरात 'आई, ही पाहा आम्ही आज आणलेली भिक्षा' असे गमतीने म्हणाले. कुंती अर्धवट सुस्तीत असावी; आणि इतक्या उशिरा येऊनही आपली मुले द्रौपदीच्या स्वयंवराबद्दल काहीच न सांगता केवळ भिक्षा आणल्याचे सांगत आहेत हें पाहून, आधीच उदास अशा तिने पडल्या पडल्याच एकदम (आज मला खाण्याची इच्छा नाही हे नैराश्यपूर्ण स्वरात प्रामुख्याने सुचवीत ) 'तुम्हीच सर्व मिळून ती खा (भुङ्क्त)' असे उद्गार काढले. पण दुसऱ्याच क्षणी द्रौपदीला समोर पाहून कुंती चपापली; पण तरीही ('भुङ्क्त' चा अर्थ 'उपभोग घ्या' असा व्यापकही होत असल्याने) तिने द्रौपदीच्या बाबतीतदेखील माझे ते शब्द खरे ठरावे असा आदेश व्यक्त केला.

या आदेशामागील तिची भूमिका काय होती? केवळ चुकून आपल्या तोंडातून निघालेल्या काही शब्दांमुळे द्रौपदीसारख्या अपरिचित तरुण नववधूच्या गळ्यांत पंचपतित्वाचे लोकविलक्षण लोढणे आजीवन अडकवावे असा दुराग्रह धरण्याइतकी कुंती निश्चितच मूर्ख वा दुष्ट नव्हती.

कुंतीच्या या आदेशापूर्वीच व्यासांनी द्रौपदीच्या त्या पंचपतित्वाचा संदेश दिला होता. आणि आपल्या तोंडून सुस्तीच्या भरात निघालेल्या शब्दांची महर्षि व्यासांनी दिलेल्या संदेशाशीं योगायोगानें पूर्ण सुसंगति पाहून, कुंतीने माझे ते शब्द खरे करा असे म्हटले. तरी वस्तुतः व्यासांनी दिलेला संदेश खरा करा हा तिचा आशय होता. महर्षी व्यास त्या सर्वांना सम्पूर्ण आदरणीय होते. ते त्यांचे परम हितकर्तेही होते, दिव्य दृष्टीने सम्पन्न होते; भूतभविष्याचे ज्ञाते होते. म्हणून द्रौपदी आता प्रत्यक्ष घरी आल्यावर व्यासांच्या त्या संदेशाप्रमाणे वागा असे तिने मातृ-आज्ञेच्या द्वारें आपल्या मुलांना सांगितले.

हे म्हणत असताच कुंतीने साधारण भिक्षा व द्रौपदी यात भेद करून एक मार्मिक पुष्टीही जोडली.

**पांचालराजस्य सुतामधर्मो**
**न चोपवर्तेत न विभ्रमेच्च।।१९०-५**

'या द्रुपदकुमारीला कोणत्याही अधर्माने स्पर्श करू नये व ती (दुर्दशेत) भटकत फिरू नये'. अर्थात तुम्ही सर्वांनी तिच्याशी विधिवत विवाह करावा. व्यासांचा संदेश असाच होता.

व्यासांनी तो संदेश पांडवांना स्वयंवरास जाण्यापूर्वी तर दिला होताच; पण नंतरही त्यांनी स्वतः येऊन तो द्रुपदाला समजावून सांगितला. त्यावेळेस



स्वतः युधिष्ठिराने पंचपतित्वासाठी दोन प्राचीन दाखले देऊन आईच्या इच्छेचीही पुष्टि केली. पण खरे समर्थन व्यासांचा संदेश हें होतें; आणि स्वतः ते उपस्थित असल्याने त्यांनी केवळ युधिष्ठिराने दिलेल्या समर्थनावर भर न देता, आपला संदेश दिव्य दृष्टीच्या साह्याने स्पष्ट करून द्रुपदाचे मन वळविले. सारांश, द्रौपदीच्या पंचपतित्वाची सारी जबाबदारी महाभारतकारांनी पांडव व द्रौपदी यांच्या जन्मपूर्व घटनांवर, आणि त्यावर आधारित व्यासांच्या संदेशावर टाकली असून, कुंतीचा आदेश निमित्तमात्र होता.

तरीही राजगोपालाचार्य आपल्या पुस्तकांत व्यासांच्या संदेशाचा काहीही उल्लेख न करता द्रौपदीच्या पंचपतित्वाबद्दल केवळ पुढील खुलासा करतात. राजा द्रुपदाने युधिष्ठिराच्या सूचनेला तीव्र विरोध करताच,"Yudhisthira answered : 'O King, kindly excuse us. In a time of great peril we vowed that we would share all things in common and we cannot break that pledge. Our mother has commanded us so'. Finally Drupada yielded and the marriage was celebrated."✱

अमरेन्द्र गाडगीळ 'महाभारत- सर्वांगीण दर्शन' पुस्तकांत (पृ.६३) म्हणतात "द्रौपदी ही द्रुपद- राजकन्या. द्रुपदाने हिच्या स्वयंवरासाठी लावलेल्या मत्स्यवेधाचा पण जिंकून अर्जुनाने ही पत्नी मिळविली. परंतु कुंतीमातेच्या विचित्र शब्दांमुळे हिचा विवाह पांचही पांडवांशी झाला." आणि तसेच 'भारतीय संस्कृति कोश' (संपादक महादेवशास्त्री जोशी) यांतील द्रौपदीविषयक हा उतारा पाहा. "अर्जुन द्रौपदीला घेऊन बंधूंसह मुक्कामावर आला व कुंतीला विनोदाने म्हणाला, 'आई, पाहिलीस का आम्ही आज काय भिक्षा आणली आहे ती?' यावर कुंती नेहमीच्या सवयीप्रमाणे वर न पाहताच बोलून गेली, 'बाळांनो ती भिक्षा सगळे मिळून वाटून घ्या!' अर्जुनाने भिक्षा म्हणून आणली आहे ती एक नववधू स्त्री आहे. हे समजल्यावर कुंतीला आपल्या उद्गाराचा पश्चाताप झाला. आपलें हें बोलणें मुलांनी खऱ्या अर्थाने घेऊ नये, असेंही तिनें स्पष्ट केले. परंतु युधिष्ठिराने आईचे शब्द पाळण्याचा आग्रह धरला आणि तसे द्रुपदाला कळविले. द्रुपदाला ते पटणे शक्य नव्हते, परंतु युधिष्ठिराने व्यासांकरवी ते पटवून दिलें आणि अर्जुनाने पराक्रमाने मिळविलेली द्रौपदी पाचही पांडवांची पत्नी झाली." कुंतीचे ते शब्द 'नेहमीच्या सवयीप्रमाणे' होते, आणि विशेष म्हणजे तिने नंतर ते परत घेतले, हें महाभारताच्या कोणत्या पोथीत आहे?

✱ 'Mahabharata' by C.Rajagopalachari (Bharatiya Vidya Bhavan, Page 67).

यात व्यासांचा उल्लेख आहे पण किती संदिग्ध! या उद्धरणावरून व्यासांनी कुंतीच्या शब्दांनाच आधार मानून पांडवांनी त्यांचे पालन करणे आवश्यक आहे असा युक्तिवाद द्रुपदाजवळ केला असा सहज ग्रह होऊ शकतो.

अ. दा. आठवले 'महाभारताचे वास्तव दर्शन' या पुस्तकांत द्रौपदीच्या पंचपतित्वाचे विवेचन करताना व्यासांच्या संदेशाचा समर्पक उल्लेख करतात. पण तरीही (पृ.११५) ते कुंतीच्या शब्दांना एक स्वतंत्र बाब मानून, पांडवांनी विशुद्ध मातृभक्तीने कुंतीच्या त्या शब्दांचे पालन केले असेही द्रौपदीच्या पंचपतित्वाचे एक वेगळे समर्थन देतात. पण मातापित्याची आज्ञा पाळावी ही सर्वसाधारणपणे भारतीय संस्कृति असली, तरी ती आज्ञा सर्वथा अश्रेयस्कर असेल, किंवा तिच्या पालनाने कोणा त्रयस्थ व्यक्तीवर व्यर्थ विपरीत प्रभाव पडणार असेल, तरी ती पाळावी हें मातृपितृभक्तीच्या आदर्शात बसेलसे वाटत नाही. भरतानें रामाला डावलून सिंहासनावर आरूढ होण्याचा कैकयीचा आदेश अमान्य केला. प्रल्हादाची तर गोष्टच सोडा. भीष्मांनीही विचित्रवीर्याच्या विधवांच्या संबंधात सत्यवतीची आज्ञा मानली नाही. ध्रुवाने ईश्वरप्राप्तीचा मार्ग सोडून परत फिरण्याचा पित्याचा आदेश अमान्य केला.

कुंतीच्या त्या शब्दांचा प्रभाव केवळ पांडवांवरच नव्हे, तर त्या परक्या घरातून आलेल्या नव-वधूवरही आजीवन आणि अतिशय लोकविरूद्ध प्रकारे पडणार होता. अशा गोष्टीस केवळ मातेची इच्छा हे समर्थन पुरेसे होणार नाही. वस्तुतः प्रथमपासूनच पांडव व कुंती यांच्या दृष्टीसमोर व्यासांचा संदेश होता. अन्यथा, कुंतीच्या पदरी वेडगळपणा तरी येतो किंवा, हीन स्वार्थी हेतू येतो. तिला वेडगळ कुणीच म्हणणार नाही. म्हणून मग तिच्या त्या इच्छेमागे भलभलते हेतू लावले जातात.

इरावती कर्वे म्हणतात की, त्या पंचपतित्वाच्या द्वारे "पाचांचा न फुटणारा एकसंधपणा तिने (कुंतीने) साधला." तिने "द्रौपदीमुळे पाचांनाही एकत्र बांधून टाकले" ('युगान्त'पृ.७५-७६). "एकाची झाली असती तर जी कलहाची बीजे पेटली गेली असती त्या सर्वांचा मुळातच नायनाट झाला व पांडवांची एकी अभेद्य राहिली."(पूर्वोक्त पृ.१०७).

आपण क्षणभर द्रौपदीच्या कारणानें पांडवांमध्ये अशा संघर्षाचा संभव मान्य केला, तरी त्यावर एका स्त्रीला त्या सर्वांची पत्नी करून देणें हा उपाय किती हास्यास्पद आहे! अशा उपायानें भ्रातृकलह मिटविल्याचें एकही प्रत्यक्ष उदाहरण आहे काय? मग पौराणिक संदोपसुंदी कशाला झाली असता? पत्नीरूप स्त्रीमुळं असे कलह मिटतील कीं वाढतील? खरे म्हणजे द्रौपदीच्या



पंचपतित्वाचे मूळ कारण पांडवांत एकी राहावी हें नव्हतें; महाभारतकारांनी तें सर्वस्वी पूर्वजन्मनियुक्त दाखविले आहे.

आतां कुन्तीवर अरोपित केलेला दुसरा एक हेतु पाहा. स्वतः कुन्तीचा संबंध पाच पुरूषांशी आला होता- सूर्य, पांडु, धर्म, वायु आणि इन्द्र.✱ आणि स्वतः कुंतीच्या अशा पूर्वजीवनामुळे तिने नववधू द्रौपदीवरही पंचपतित्व लादण्याचा आग्रह धरला असा कांही जणांचा कुतर्क आहे. आनंद साधले लिहितात. "पाच नवऱ्यांची बायको अशा एकमेवाद्वितीय अवस्थेत ती (कुंती) स्वतः होती. समानधर्मचरिणी मिळण्याचा संभव उपस्थित झाला असता मानसिक समाधानासाठी त्या संभवाचा मार्ग उचलून धरण्याची प्रेरणा तिला साह्यकारी झाली नसेलच असे तरी कसे म्हणावे?" ('हा जय नावाचा इतिहास आहे' पृ.८). प्र.न.जोशी लिहितात की (युधिष्ठिराने द्रौपदीच्या पंचपतित्वासाठी द्रुपदाजवळ कुंतीच्या आदेशाचाही उल्लेख केला तेव्हा) "युधिष्ठिराच्या या मतास स्वतः कुंतीनेही संमती दिली. तिला कदाचित् स्वतःचेच उदाहरण आठवले असेल. सूर्याचा व तिचा संबंध होताच की नाही? यमधर्म, वासु (यु) देव,इन्द्र यांच्या अंशापासून आपणांस झालेल्या या गुणी पुत्रांची कथा तिला राहून राहून आठवली. आपल्या कुळात परंपरा नवी नसल्याचे तिला समजले.' ('पांचाली', पृ.२५-२६).

सासू होऊ पाहणाऱ्या कोणाही महिलेवर (संपूर्ण स्पष्ट पुराव्याशिवाय) करू नये इतका हीन हा आरोप आहे. फार काय एखादी वेश्या देखील आपल्या पुत्राच्या नववधूत स्वतःच्या दुर्दैवी जीवनाची पुनरावृत्ती पाहण्याचा सहसा विचार करणार नाही.✱

बरे, कुंतीच्या आणि द्रौपदीच्या परिस्थितीत काही साम्यही होते काय? कुंतीचा सूर्याशी संबंध विवाहपूर्व होता. कुंती द्रौपदीविषयी असे काही म्हणत होती काय? उलट ती द्रौपदीला अधर्मापासून अगदी दूर ठेवा असेच प्रथमपासून म्हणत होती, आणि कुंतीचा नंतर तीन देवांशी आलेला संबंध पाण्डूला

---

✱ 'युगान्त' पुस्तकांत इरावती कर्वे अतिशय विपर्यस्तपणे यांत सूर्याऐवजी (की सूर्याशिवाय?) दुर्वास, व धर्माऐवजी विदुर सुचवितात ! आणि त्याचा आधार घेऊन P.Lal "The Mahabharata of Vyasa" पुस्तकांत (pages ३८-३९, ३९४-३९५) विदुर-कुंतीविषयी ती अत्यंत हीन कल्पना व्यक्त करतात.

✱ आणि आपल्या पूर्व जीवनाचे स्मरण ठेवून कुंतीला आपल्या सुनेवर पंचपतित्व लादावयाचे होते तर ते एकट्या द्रौपदीवरच का? आपल्या अन्य सुनांच्या बाबतीतही तिने असें का केले नाही?

मिळालेल्या शापाने त्याच्या प्रजोत्पत्तीसाठी असमर्थतेमुळे होता. याचें युधिष्ठिरादि पांडवांशी काय साम्य?

**तें पंचपतित्व द्रौपदीच्या कामगंडामुळे होते काय?**

दुर्गा भागवत 'व्यासपर्व' पुस्तकांत लिहितात, "द्रौपदी मुळातच तरुणी आणि त्यांतही संगमोत्सुक ..... कुंतीचा बोल खरा करण्याचा केवळ योगायोग साधून तिनें पाच पतींना वरण्यासाठी खुशी दाखविली, तारुण्य नसानसांतून वाहत होते आणि त्याला योग्य अशा वासनाही तिच्यांत तेवत होत्या". (पृ.१२२). आणि या संदर्भात त्यांना 'द्रौपदीच्या स्वभावांतला हा सकामतेचा तंतू' विशेष रूपाने दिसतो (पृ.१२३); आणि द्रौपदीला त्या 'कामकलिका' म्हणतात (पृ.१२१). किंबाहुना, द्रौपदीची कामवासना विवाहित पाच पतींपुरतीच मर्यादित न मानतां दुर्गाबाईंना द्रौपदीने (आपल्या पतींसमक्ष) कृष्णाशीं बोलताना वापरलेल्या 'प्रणय' व सख्य (वनपर्व १२-६०,६१) या शब्दांमागेही ती वासना अस्फुट रूपांत कां होईना दिसते ! आणि द्यूत प्रसंगी असहाय द्रौपदीने श्रीकृष्णांचा आर्तधावा केला, व श्रीकृष्णांनी योगमायेच्या द्वारे तिला वस्त्रें पुरविली, हा देखील केवळ 'भक्त-देव' असा 'ढोबळ' संबंध नसून, त्याच्या मुळांत त्या 'दोन मनांतल्या भावांचा लसलसता कोंब होता' असे या लेखिकेला वाटतें (पृ.१२५). श्री. अ.दा.आठवले (पूर्वाक्त पृ.१८५) म्हणतात, "द्रौपदीच्या वासना प्राकृतिक आणि कमालीच्या उत्कट अशा होत्या आणि त्यामुळे एका पुरुषाशी विवाह होऊन तिचे भागले नसते असा अत्यंत अधमपणाचा आरोपही दुर्गाबाईंनी द्रौपदीवर केला आहे."

द्रौपदीवर अनिवार्य कामवासनेच्या या आरोपाला महाभारतातंत कांहीही समर्थन नाहीं. द्रौपदीविवाहानंतर पाण्डव एक वर्ष द्रुपदाकडेच राहिले (आदिपर्व ६१-३१). नंतर ते हस्तिनापुरास आले; तेथे धृतराष्ट्राने त्यांना अर्ध राज्य दिलें व ते खांडवप्रस्थास (इन्द्रप्रस्थास) गेले. तेथे राज्यविस्तार करीत त्यांची अनेक वर्षे गेली, 'तत्र ते न्यवसन पार्थाः संवत्सरगणान् बहून' (६१-३५). या संपूर्ण काळांत द्रौपदीच्या संबंधानें एकाही पांडवाच्या वाड्यांत पाळणा हालला नाही. आणि यानंतर कांही अपरिहार्य कारणानें अर्जुनाला बारा वर्षे राज्याबाहेर राहावे लागलें. त्या बारा वर्षानंतर अर्जुन सुभद्रेसह इन्द्रप्रस्थास परत आल्यावर सुभद्रापुत्र अभिमन्यूचा जन्म झाला, आणि त्याच सुमारास द्रौपदीला प्रत्येक पाण्डवापासून एकेक वर्षाच्या अंतराने एकेक पुत्र झाला. या सर्वांचा काय आशय होतो? अर्जुन द्रौपदीपासून दूर होता त्या काळांत शेष पांडवही द्रौपदीपासून शरीरसंबंधांने दूर राहिले. आणि अशा प्रकारे विवाहाला कित्येक वर्षे लोटल्यानंतर



तिला प्रत्येक पतीपासून केवळ एकेकच पुत्र झाला. द्रौपदी आणि पांडव यांच्या संयमाचें आणखी काय प्रमाण हवे? याशिवाय वनवास-अज्ञातवासाच्या तेरा वर्षातही पांडवांनी व द्रौपदीने पाळलेला संयम प्रकरण २ मध्ये सूचित केला आहे.

**ते पंचपतित्व व्यासांच्या संदेशानुसार होते**

अस्तु, एकूण निष्कर्ष हा की, महाभारतात वर्णित द्रौपदीच्या पंचपतित्वाची मूळ जबाबदारी कुंतीवर नाही, पांडवांवर नाही व द्रौपदीवरही नाही. वस्तुतः ती जबाबदारी व्यासांनी दिव्यदृष्टीनें जाणलेल्या द्रौपदी व पांडवांच्या जन्मपूर्व घटनांवर आहे. पूर्वजन्मांवर विश्वास हें भारतीय संस्कृतीचे प्राचीन काळापासून एक वैशिष्ट्यपूर्ण अंग आहे. त्याच-आधारे भीष्मांनी शिखंडीवर बाण टाकण्याचे नाकारून मरणही पत्करले. महाभारतातील सारे 'अंशावतरण' प्रकरण (आदिपर्व अध्याय ६७) अशाच स्वरूपाच्या धारणेवर आधारित आहे.

द्रौपदीस्वयंवरास जाण्याची गोष्ट पांडवांजवळ व्यासांनी काढण्यापूर्वीच पांडवांच्या मनात तो विचार आला होता. पण त्याचा पंचपतित्वाशी काही संबंध नव्हता. देशातील अनेक तरुणांप्रमाणेच पांडवांनाही साहजिकच त्या समारंभात उपस्थित राहण्याची इच्छा झाली. पण द्रौपदी तुम्हा पाचांची पूर्वनियोजित पत्नी आहे हा विचार व्यासांनी त्यांच्या मनात रुजवला. आणि मग पांडव स्वयंवरांत उपस्थित राहिले ते त्या धारणेच्या पार्श्वभूमीत. तेथे धनुर्विद्येसंबंधी पण लावला होता म्हणून तो अर्जुनाने जिंकला; शारीरिक बलाचा असता तर भीमाने जिंकला असता; यक्षप्रश्नाच्या घटनेसमान काही ज्ञानप्रदर्शनाचा असता तर युधिष्ठिर पुढे झाला असता. मात्र पाचापैकी कोणीही पण जिंकला असता तरी द्रौपदी पाचही बंधूंची पत्नी व्हावयाची आहे असा व्यासांचा संदेश होता.

व्यासांनी द्रौपदी व पांडवांच्या ज्या पूर्वकथा सांगितल्या त्यात केवळ मानवी पातळीवरील पूर्वजन्मच नसून बराचसा अद्‌भुत भागही आहे हे खरे. द्रौपदीचे पंचपतित्व एक अतिशय असाधारण घटना असून, महाभारतकारांनी त्याची उभारणी अद्‌भुततेच्या पायावर केली आहे. वर्तमान युगात द्रौपदीच्या पंचपतित्वाचे विवेचन सामान्य मानवी पातळीवर करण्याची इच्छा अनेकांना होते. परंतु महाभारतात येथेच नव्हे तर आणखीही कितितरी अद्‌भुत भाग आहे. तो सगळा दूर करावयाचा म्हटल्यास वेगळे महाभारतच लिहावे लागेल. मग केवळ एखाद्या विशिष्ट स्थळींच अद्‌भुत अंश काढून मानवी वासना-इच्छांचे वेगळे ठिगळ जोडण्याने काय होणार?

याशिवाय असे की, द्रौपदीचा महान पतिव्रता म्हणून गौरव करीत असताही महाभारतकारांनी तिचे पंचपतित्व अगदी असाधारण व लोकविलक्षण मानले असून, अनुकरणीय म्हटलें नाही. महाभारतातले अन्य कोणतेही स्त्रीपात्र बहुविवाहित नाही. महाकवीने द्रौपदीच्या पंचपतित्वाभोवती अद्‌भुततेचे जें वलय निर्माण करून ठेवले आहे तें तसेच राहू देण्याने काही बिघडत नाही. द्रौपदी व पांडव यांच्या जन्मातच अद्‌भुतता आहे. आणि व्यासांनी द्रुपदास त्यांची जन्मपूर्वकथा नुसती सांगितली इतकेच नव्हे, तर दिव्यदृष्टीने तिचे प्रत्यक्ष दृश्यही दाखविले असे महाभारतकारांनी म्हटले आहे ते फार महत्त्वाचे आहे. अन्यथा, महाभारताचे उदाहरण देऊन अन्य कोणी अशी एखादी कथा सांगून दुसऱ्याला भ्रमात पाडण्याचा प्रयास करू शकला असता!

**द्रौपदीने पंचपतित्व स्वखुषीने स्वीकारले**

द्रौपदीने अनिवार्य कामवासनेमुळे पंचपतित्व प्राप्त करून घेतले हा हीन आरोप खोटा असला, तरी प्राप्त पंचपतित्व तिने स्वीकारले व आजीवन संयमपूर्वक उत्तम निभावले यांत शंका नाही.

जेव्हां पिता व बंधू यांनी व्यासांच्या उपदेशानुसार द्रौपदीच्या पंचपतित्वाला आपला विरोध मागे घेतला, तेव्हा त्यांच्यावर पूर्ण श्रद्धा ठेवून तीही त्यासाठी तयार झाली. तिच्या पंचपतित्वाला पित्याच्या संमतीच्या मुळाशीं महर्षी व्यासांचा आशीर्वाद व समर्थन आहे याचाही प्रभाव तिच्या मनावर पडणें स्वाभाविक होतें.

द्रौपदीने आमरण आपल्या पंचपतित्वाविरूद्ध कधीही 'ब्र' देखील काढला नाही. क्वचित वेळी अतीव अंतःकरण भरून येऊन तिनें त्राग्याच्या भरांत साहजिकच कांही रोषपूर्ण उद्‌गार काढले. पण त्यांत पंचपतित्वामुळे माझी अशी विटंबना झाली असें तिच्या मुखांतून बाहेर पडले नाही. याउलट मला पाच शूर पति असतांही माझी इतकी दुर्दशा झाली याचे दुःख तिनें व्यक्त केले. वनवासाच्या प्रारंभी श्रीकृष्णांना ती रुदन करीत म्हणाली-

**पांडवानां प्रिया भार्या स्नुषा पाण्डोर्महात्मनः।। वनपर्व १२-१२०**
**कचग्रहमनुप्राप्ता सास्मि कृष्ण वरा सती**
**पंचानां पाण्डुपुत्राणां प्रेक्षतां मधुसूदन।।१२१**

"मधुसुदन कृष्णा, मी महात्मा पांडूची सून व पांडवांची प्रिय भार्या आणि विशुद्ध पतिव्रता असतांही, प्रत्यक्ष या पाच पांडवांच्या समक्ष माझे केस धरून खेचण्यांत आले!" असेच करुण उद्‌गार तिनें नंतरही पुनः काढले (उद्योग पर्व-८२-२२,२४). सत्यभामेला पतिव्रतधर्माचा उपदेश करतांनाही द्रौपदीने स्वतःचे



उदाहरण देतांना आपल्या पाच पतींचा सम्पूर्ण आदरानें उल्लेख केला (वनपर्व अध्याय-२३३).

**कौटुंबिक स्नेहाचा अत्युच्च आदर्श**

द्रौपदीचे पंचपतित्व जर महाभारतकारांच्याही दृष्टीनें समाजात अनुकरणीय नाही, तर त्याच्या द्वारे त्यांना कोणते प्रयोजन साधावयाचे होते? असे दिसते की त्या पंचपतित्वातून ते संयमित वैवाहिक जीवनाचा, कौटुंबिक स्नेहाचा व बंधुप्रेमाचा अत्युच्च आदर्श समाजासमोर ठेवू चाहतात. पाच पती असूनही द्रौपदीचे सारे जीवन संयमित राहिले; आणि एकच स्त्री पांच बंधूंची पत्नी असताही त्यांच्यामध्ये त्यामुळे कधीही विवाद निर्माण झाला नाही. बंधुप्रेमाचा याहून अधिक आदर्श काय असणार? स्वतः कर्णही हें जाणून दुर्योधनास म्हणतो.

**परस्परेण भेदश्च नाघातुं तेषु शक्यते**
**एकस्यां ये रतः पत्न्यां न भिद्यन्ते परस्परम्।। आदिपर्व २०१-६**

"सर्व मिळून एकाच पत्नीचे ठायी अनुरक्त असताही जे आपसात कलह करीत नाहीत, त्यांत कोणत्याही युक्तीने फूट पाडणे शक्य नाही."

मात्र, असे आदर्श आकाशातील ध्रुव ताऱ्याप्रमाणे असतात. तेथे प्रत्यक्ष पोचण्याचा विचार कोणी करीत नाही; पण ध्रुवावर दृष्टि ठेवून प्रवासी आपल्या मार्गाची इष्ट दिशा ठरवू शकतो. हरिश्चन्द्रानें स्वप्नातील वचनही खरे केले, आपण निदान जागृतावस्थेतील शब्द पाळावा इतकी प्रेरणा त्यापासून प्राप्त होते. पाच बंधूंची पत्नी असतांही द्रौपदी शुद्ध पतिव्रता व संयमी राहिली, आणि अन्य सवतींशी कलह न करता (वनपर्व २३३-१९) कौटुंबिक वातावरण सदैव प्रसन्न ठेवलें. यापासून कौटुंबिक संबंध प्रेमपूर्ण ठेवण्याची प्रेरणा मिळत नाही काय?

द्रौपदीच्या पंचपतित्वाला महाभारतकारांनी दिलेलें अद्‌भुततेचें कोंदण काढून तेथें सामान्य मानवी मनोव्यापारांची (वर चर्चित) चौकट बसवूं लागल्यास, ती घटना विकृत होऊन हा सारा आदर्शवाद कसा ढासळून पडतो पाहा. द्रौपदीच्या पंचपतित्वाचे मूळ पाण्डवांच्या अनिवार्य कामुकतेंत असते, तर (नारदसारख्यांनी कितीही नियम घालून दिले असते तरी), विवाहानंतर त्यांच्यामधे सुंदोपसुंदी माजली असती. बरें, द्रौपदीची अनिवार्य कामवासना हें त्या पंचपतित्वाचे कारण असतें, तर तिचे विवाहोत्तर जीवन असंयमित होऊन तिच्या आचरणामुळें पांडवांत कलह उत्पन्न झाला असता; आणि पांडवांना किंवा निदान त्यांच्यापैकी कांहींना तिच्याविषयी कालांतरानें घृणा उत्पन्न होऊन, शेवटपावेतो तिची जी

प्रतिष्ठा राहिली ती राहिली नसती. आणि तिचें पंचपतित्व कुन्तीने कोणत्याही स्वार्थी हेतूनें द्रौपदीवर लादलेलें असते, तर द्रौपदीला तिजविषयी तिरस्कार उत्पन्न होऊन तिचे कुन्तीशी शेवटपावेतो जे सम्पूर्ण प्रेमाचे संबंध राहिले (पाहा वनपर्व २३३-४०,४१ आश्रमवासिकपर्व १६-३०) ते राहिले नसते. सारांश, महाभारतकारांनी द्रौपदीच्या लोकविलक्षण पंचपतित्वाला पूर्वजन्मावर आधारित व्याससंदेशाची अद्भुत बैठक दिली आहे, त्यामुळेंच ते पंचपतित्व अनुकरणीय नसूनही परम आदरणीय व प्रेरणास्पद झाले आहे.

महाभारताची मुख्य भूमिका नीतीपर असून त्याची आमूलाग्र रचना सत्य, धर्म, संयम, सदाचार यांच्या प्रतिपादनार्थ आहे. महाभारतकारांनी हें या प्रचंड महाकाव्याच्या शेवटींही स्पष्ट केले आहे. दैवी गुणसंपत्तीची श्रेष्ठता व आसुरी गुणांची हीनता प्रस्थापित करणें हे आमच्या या विश्वप्रसिद्ध प्राचीन महाकाव्याचे प्रयोजन आहे. हें नीट ध्यानांत घेऊन यांतील विविध प्रसंगांचा, वर्णनांचा व वचनांचा कोठे सूक्ष्म रहस्यमयही असलेला वास्तविक आशय पाहणे इष्ट होईल. ❐



प्रकरण २३

# महाभारताची वयतालिका

महाभारतातील प्रमुख पात्रांच्या वयोमानाविषयी अभ्यासकांत बरीच जिज्ञासा आहे. येथे भीष्म व युधिष्ठिर यांची वयगणना विशेष तपशिलाने केली असून, त्या आधारे अन्यही स्त्रीपुरुष पात्रांची करता येईल.

या गणनेच्या मुळाशी असलेली एक महत्वाची धारणा अशी आहे. महाभारत युद्ध द्वापर व कलियुगांच्या संधिकालांत झाल्याचे म्हटले आहे. महाकवीने भीष्मपर्वाच्या प्रारंभी (अध्याय १०) संजय-धृतराष्ट्र संवादांत सत्ययुग, त्रेतायुग व द्वापरयुगांत आयुर्मर्यादा क्रमशः चार हजार, तीन हजार व दोन हजार वर्षे होती असे सांगून, कलियुगांतील आयुर्मर्यादा सांगितली नाही. पण शांतिपर्व अध्याय १०४ श्लोक २० मध्ये मानवी आयुष्य १०० वर्षे सांगितले आहे. हे ध्यानांत घेऊन, महाभारतकारांनी पांडवांचे जीवन अथपासून इतिपावेतो ज्या धर्मनिष्ठ पद्धतीचे वर्णन केलें आहे तें पाहतां, त्यांनी पांडवांचा इहलोकनिवास 'कुर्वन्नेवेह कर्मणि जिजीविषेत् शतं समाः' (ईश उपनिषद), 'जीवेम शरदः शतम्' 'शतायुर्वै पुरूषः', आदि वचनांनुसार मानला असावा. मात्र युधिष्ठिराने आपल्या सर्वात कनिष्ठ बंधूंचेंहि जीवन शंभर वर्षे पूर्ण होईपावेतो त्यांच्यासह स्वर्गारोहण केले नसते. हा दृष्टिकोण समोर ठेवून पुढील एकूण वयगणना केली आहे. भीष्म ईच्छामरणी होते, व पांडवांचे आजोबा असून कुरुक्षेत्रावरील युद्धापावेतो जीवंत होते.

या प्रकारे केलेल्या गणनेंत महाभारतकारांनी वर्णिलेल्या विविध घटनांचा काल सुसंबद्धरीत्या बसतो हें दिसून येईल. महाकवीने काही घटनांमधील कालांतर निश्चित वर्षात सांगितले आहे. अन्य ठिकाणी ते संदर्भ पाहून अनुमानित करता येते. या एकूण संदर्भात युद्धसमयी द्रोणाचार्यांच्या वयाचा स्पष्ट उल्लेख महत्त्वाचा आहे (क्रमांक ३४ व ३८).

आणखी एक खुलासा. महाभारतात श्रीकृष्ण व अर्जुन समवयस्क दर्शविले आहेत. देहत्यागसमयी श्रीकृष्णांचे वय एकशेपंचवीस वर्षे होतें असा

एक उल्लेख भागवत पुराणांत (११.६.२५) आला आहे. हें मानलें तर अर्जुनाचेंही वय स्वर्गारोहणसमयी १२५ (अगर १२६) येईल. कारण श्रीकृष्णांच्या महाप्रयाणानंतर लवकरच पांडवांनी स्वर्गारोहण केले. परंतु महाभारताच्या मौसलपर्वात (अध्याय ४) श्रीकृष्णांच्या देहविसर्जनाचे वर्णन असले, तरी त्यासमयी त्यांचे वय १२५ वर्षे असल्याचे म्हटलें नाही. पुढील गणनेनुसार श्रीकृष्णांचे अंतिम वय शंभर वर्षे येते. महाभारतानुसार पांडवांचे वय निश्चित करतांना भागवत पुराणांतील तो उल्लेख कसा अस्वीकार्य ठरतों हे लेखाच्या शेवटी स्पष्ट केलें आहे.

पुढील गणनेच्या तपशिलावर चर्चा होऊ शकेल. मात्र कोणतीहि एक घटना वेगळी विचारांत न घेतां एकूण महाभारताच्या कथानकाच्या संदर्भात पाहिली जावी. मूळ महाभारत एक अति विशाल, कूटमय पण एकंदरीत सुसंगत व सुसंबद्ध रचना आहे हें आतां स्पष्ट झाले आहे.

**१. भीष्म जन्म**

संदर्भ - आदिपर्व अध्याय ९८

यावेळी राजा शांतनुचे वय सुमारे १५+२४+८=४७ वर्षे असावे. त्याने युवावस्था (सुमारे पंधरा वर्षाचे वय) प्राप्त झाल्यानंतर, चोवीस वर्षे स्त्रीसंगाशिवाय घालविल्यावर त्याला पत्नीरूपाने गंगा प्राप्त झाली. आणि भीष्म त्यांचा आठवा पुत्र होता.

**स समाः षोडशाष्टौ व चतस्त्रो ऽ ष्टौ तथापराः**
**रतिमप्राप्नुवन् स्त्रीषु बभूव वनगोचरः ।।१००-२०**

'त्याने (राजा शांतनूने) स्त्रीसंगाशिवाय सोळा अधिक आठ (म्हणजे चोवीस), आणि पुनः वेगळी चार आणि आठ (म्हणजे बारा) वर्षे वनांत घालविली.' यांत एकूण ३६ वर्षाचा उल्लेख असला, तरी ती सलग नसून,'चतस्त्रोऽष्टौ' च्या संबंधांत 'अपराः' हा शब्द आला आहे. चोवीस वर्षे युवक शांतनूला गंगा प्राप्त होण्यापूर्वीची आहेत. आणि 'अपराः' बारा वर्षे शांतनूला भीष्मजन्मानंतर गंगा सोडून गेल्यावर सत्यवतीशीं त्याचा विवाह होण्यापावेतोची आहेत. या बारांतील आठ वर्षे गंगेने बालक भीष्माला आपल्याजवळ ठेऊन घेतले होते तीं आहेत. भीष्म आठ वर्षाचा झाला तेव्हां गंगा त्याला शंतनूकडे ठेवून परत गेली (क्रमांक २ पहा). आणि त्यानंतर आणखी चार वर्षानंतर शांतनूचा सत्यवतीशीं विवाह झाला (क्रमांक ३). या प्रकारे स्त्रीसंगाशिवाय शांतनूची मध्यंतरी पुनः गेलेली हीं बारा वर्षे होत.



**२. गंगा भीष्माला शांतनूकडे आणते;**
**भीष्म युवराज होतो.**

कालावंधि : ८ वर्षे; भीष्माचे वय:८ वर्षे

संदर्भ : आदिपर्व, अध्याय १००

भीष्म यावेळी 'कुमार' होता (१००-२५,३१). आणि चार वर्षानंतर (पाहा क्र.३) शांतनूने (सत्यवतीशी विवाह करण्याच्या इच्छेने) भीष्माला म्हटलें की, तू माझा सध्या एकमेव पुत्र असल्यानें संयोगवश तुझा मृत्यू झाल्यास माझा वंश संपुष्टांत येईल (१००-६४ ते ७१). अर्थात यावेळी भीष्माचे वय विवाहासाठी लहान होते. गंगा भीष्माला घेऊन शांतनूजवळ आली त्यावेळी भीष्माचे वय ३६ वर्षे होतें असे (वर उद्धृत श्लोक १००-२० चा भलताच अर्थ करून) कोणी म्हणतात, तें चूक आहे. तसें असतें तर आणखी चार वर्षांनी म्हणजे चाळीस वर्षे वयाच्या भीष्माला शांतनू वरील प्रमाणे म्हणाला नसता. आणखी असें की, भीष्माला शांतनूजवळ देत गंगा म्हणते कीं, यानें समस्त वेदाभ्यास व अस्त्रविद्या प्राप्त केली आहे; छत्तीस वर्षांच्या भीष्माची अशी प्रशंसा करण्यांत विशेषता नव्हती. (उलट आठ वर्षे वयाच्या आद्य शंकराचार्याबद्दल पुढील श्लोक पहा 'अष्टवर्षे चतुर्वेदी द्वादशे सर्वशास्त्रविद्। षोडशे कृतवान् भाष्यं द्वात्रिंशे मुनिरभ्यगात्'). तसेंच, भीष्माला शांतनूजवळ सोपविताना गंगेने 'गृहीत्वा दक्षिणे पाणौ तं कुमारम्' (१००-३१) 'त्या कुमाराचा उजवा हात धरून' त्याला शांतनूजवळ नेले असें महाभारतकार म्हणतात. हें छत्तीस वर्षे वयाच्या प्रौढाऐवजी आठ वर्षाच्या 'कुमारा' स लागू पडते. शेवटी, भीष्म यावेळी छत्तीस वर्षाचा असता, तर आणखी चार वर्षांनी (क्रमांक ३ पाहा) तो चाळीस वर्षाचा झाला असतांना, शांतनूने त्या चाळीस वर्षे वयाच्या अविवाहित भीष्माच्या लग्नाची आधी चिंता केली असती, कीं स्वतःच्या (सत्यवतीशी) लग्नाची? पण शांतनूने सत्यवतीशीं लग्नाची इच्छा केली तेव्हां भीष्म केवळ बारा वर्षांचा होता. आणि भीष्मजन्माचे वेळी शांतनूचे वय सुमारे ४७ वर्षे मानले आहे; तें ध्यानांत घेतां, सत्यवतीच्या विवाहासमयी भीष्माचे वय चाळीस वर्षे म्हटले तर सत्यवतीशी विवाह करतांना स्वतः शांतनु ४७+४० =८७ वर्षांचा म्हणावा लागेल; पण हे उघडच संभव नव्हते.

**३. भीष्मांची पितृसुखार्थ आजन्म ब्रह्मचर्याची व सिंहासनत्यागाची प्रतिज्ञा;**

**शांतनू - सत्यवती विवाह**

कालावधी : चार वर्षे (स्पष्ट उल्लेख, आदिपर्व १००-४५). भीष्माचें वय

- बारा वर्षे. संदर्भ - तोच

**४. चित्रांगद जन्म**

कालावधि : एक वर्ष

संदर्भ : आदिपर्व अध्याय १०१ श्लोक २

**५. विचित्रवीर्य जन्म**

कालावधि : दोन वर्षे. भीष्मांचे वयः १५ वर्षे

संदर्भ - आदिपर्व, अध्याय तोच श्लोक ३

**६. शांतनू मृत्यू : भीष्म चित्रांगदाला राजा करतात.**

कालावधि : ९ वर्षे. भीष्मांचे वय :२४ वर्षे

संदर्भ : आदिपर्व, तोच अध्याय श्लोक ४,५

चित्रांगदाचे वय अकरा वर्षे; विचित्रवीर्याचे नऊ वर्षे. यावेळी चित्रांगद 'अप्राप्तयौवन' होता; कारण पुढे मृत्युसमयीहि (पाहा क्रमांक ७) तो 'अप्राप्तयौवन' होता.

**७. चित्रांगद मृत्यु; भीष्म विचित्रवीर्यास राजा करतात.**

कालावधि : चार वर्षे. भीष्मांचे वय : २८ वर्षे

संदर्भ : आदिपर्व अध्याय १०१

राजा चित्रांगदाने गंधर्वाशी 'तीन वर्षे' युद्ध केल्यावर (१०१-८) तो त्यांत मारला गेला. यावेळीं तो 'अप्राप्तयौवन' होता. (९५-५०). विचित्रवीर्याचें वय तेरा वर्षे; तो 'अप्राप्तयौवन' (१०१-१२) व 'बाल' (१०२-१) होता.

**८. विचित्रवीर्य विवाह**

कालावधि : सात वर्षे. भीष्मांचे वय : ३५ वर्षे.

विचित्रवीर्यांचे वय : वीस वर्षे

संदर्भ : आदिपर्व अध्याय १०२

विचित्रवीर्य विवाहसमयी 'सम्प्राप्तयौवन' (१०२-२= ९६-२) व तरुण (१०२-७०) होता. त्याच्या विवाहासाठी भीष्मानें काशिराजकन्या, अंबा, अंबिका व अंबालिका, यांना स्वयंवरमंडपातून हरण करून आणले. त्या सख्या बहिणी होत्या असा उल्लेख नाही. अंबिका व अंबालिका 'श्यामे' (तरुणी) होत्या (१०२-६७). अंबालिकेचें वय सुमारे चौदा व अंबिकेचे पंधरा वर्षे असावे. अंबा या दोहींपेक्षा ज्येष्ठ होती (१०२-६०); ती सुमारे सोळा वर्षाची असावी. तिचाही विचित्रवीर्याशी विवाह लावण्याचा भीष्माचा विचार होता. (पण तसे झाले नाही); यावरून विचित्रवीर्य सुमारे वीस वर्षाचा असावा.

येथे भीष्मांच्या वयासंबंधात आदिपर्व अध्याय १०२ मधील पुढील श्लोकांवर



विचार आवश्यक आहे.

**एकाकिनं तदा भीष्मं वृद्धं शान्तनुनन्दनम्।।६।।**
**सोद्वेगा इव तं दृष्ट्वा कन्याः परमशोभनाः ।।**
**अपाक्रामन्त ताः सर्वा वृद्ध इत्येव चिन्तया ।।७।**
**वृद्धः परमधर्मात्मा वलीपलितधारणः**
**किं कारणमिहायातो निर्लज्जो भरतवर्षभः।।८।।**
**मिथ्याप्रतिज्ञो लोकेषु किं वदिष्याति भारत**
**ब्रह्माचारीति भीष्मो हि वृथैव प्रथितो भुवि।।९।।**
**इत्येवं प्रब्रुवन्तस्ते हसन्ति स्म नृपाधमाः ।**
**क्षत्रियांणा वचः श्रुत्वा भीष्मश्चुक्रोध भारत।।१०।।**

यात म्हटले आहे कीं, स्वयंवर मंडपात भीष्माला पाहून त्या राजकन्या हा 'वृद्ध' आहे या भावनेने त्याच्यापासून दूर झाल्या आणि तेथे जमलेले काही अधम वृत्तीचे राजेही ब्रह्मचारित्वाचें ढोंग करणारा हा 'वृद्ध' 'वलीपलितधारण' 'निर्लज्ज' अशी त्याची टिंगल करू लागले. यांत 'वृद्ध' म्हणजे उतारवयाचा 'म्हातारा' आणि 'वलीपलित-धारणः' म्हणजे ज्याच्या अंगावर सुरकुत्या (वळ्या) पडून केस पांढरे झाले आहेत, असा आशय घेऊन, काहीं जण या वेळी भीष्म म्हातारे झाले होते असे म्हणूं चाहतात. (व त्यात त्यांना वर क्रमांक २ च्या समयी भीष्माचे वय ३६ होते याची पुष्टि भासते).

भांडारकर संस्था हे श्लोक स्वीकारत नाही. पण ते स्वीकारावयाचे असले तरी त्यात पुढीलप्रमाणे आशय पाहता येईल. संस्कृतात म्हातारपणासाठी 'जरा' शब्द असून, 'वृद्ध' म्हणजे 'म्हातारा' असा एक अर्थ असला, तरी त्याचा मुख्य आशय एखाद्या विशिष्ट संदर्भात सामान्यापेक्षा अधिक वयाचा असा आहे. या संदर्भात वरील श्लोकांत भीष्मांच्या संबंधात आलेला 'एकाकिनं' शब्द महत्वाचा आहे. भीष्माच्या वयाचे, किंबहुना त्याहूनही जास्त वयाचे, राजे त्या स्वयंवर मंडपांत उपस्थित असतील; पण ते स्वतः च्या विवाहासाठी आले नसून, त्यांच्याबरोबर त्यांचे विवाहेच्छु तरुण पुत्रपौत्रादि आले असतील. परंतु भीष्मांनी विचित्रवीर्यास बरोबर न आणता ते एकटेच ('एकाकिनः') तेथे येऊन उपस्थित झाले. यामुळें त्या राजकन्यांना भीष्म स्वतःच्याच विवाहार्थ आले आहेत असें वाटले. आणि १५-१६ वर्षे वयाच्या कन्यांसाठी ३५-३६ वर्षाचा (धिप्पाड अंगकाठीचा) भीष्म 'वृद्ध' म्हणजे अधिक वयाचा वाटणे साहजिकच होते.

आता 'पलित' म्हणजे पांढरे केस असा एक अर्थ असला तरी 'टक्कल

पडलेला' असाही त्याचा अर्थ आहे. भीष्माच्या डोक्यावर क्वचित कोठे टक्कल पडलेले असेल; आणि त्यांचे दोन चार केस पांढरे झाले असतील. अथवा स्वतः भीष्मांना स्वयंवरांत एक प्रबळ प्रतिस्पर्धी समजून राजांनी (हस्तिनापुराहून सरळ वाराणसीस स्वयंवरमंडपात येऊन पोचलेल्या) भीष्मांच्या थकलेल्या चेहऱ्याची ही अतिशयोक्तीपूर्ण टिंगल केली असेल. ज्या भीष्मांनी आपली घोर प्रतिज्ञा पालन करीत, पित्याच्या मृत्यूनंतर सिंहासनाचा त्याग चालू ठेवून आपल्या सावत्र भावांना राजा केले, त्या भीष्मांवर शंका घेऊन त्यांची टिंगल उडविणाऱ्या त्या उपस्थित राजांना महाभारतकार यथार्थ रीत्या 'अधम' म्हणतात.

गंगा भीष्माला शंतनूकडे घेऊन आली त्यावेळी भीष्माचे वय वर स्पष्ट केल्याप्रमाणे आठ वर्षे होते हें पाहता, या स्वयंवरापावेतो भीष्म 'म्हातारे' असणे असंभव होते. शिवाय याची पुष्टि अशी की, या वेळी जर भीष्म म्हातारे असते तर आणखी सात वर्षांनी विचित्रवीर्य मरण पावल्यावर (क्रमांक ९). सत्यवतीने (वंश चालू ठेवण्यासाठी) विचित्रवीर्याच्या विधवांच्या ठायी नियोग प्रथेनुसार पुत्रोत्पत्ती करण्यासाठी भीष्मांना सूचना केली नसती.

**९. विचित्रवीर्य मृत्यू**

कालावधि : सात वर्षे (स्पष्ट उल्लेख, आदिपर्व १०२-७०): भीष्माचें वय : ४२ वर्ष

संदर्भ : आदिपर्व १०२-७१

विचित्रवीर्य पुत्रहीन मेला (९५-५२,१०३-८). सत्यवतीने वंश चालू ठेवण्यासाठी विचित्रवीर्याच्या विधवा पत्नीच्या ठायी नियोग प्रथेनुसार पुत्रोत्पत्ति करण्याची भीष्माला सूचना केली; पण भीष्मांनी आपल्या ब्रह्मचर्य प्रतिज्ञेच्या पालनार्थ तें नाकारले. सत्यवतीने यानंतर आपला विवाहपूर्व पुत्र कृष्णद्वैपायन व्यासाला यासाठी आमंत्रित केले; व्यासांनी तसे केले.

**१०. धृतराष्ट्र जन्म**

कालावधि : एक वर्ष. भीष्माचे वय : ४३ वर्ष

संदर्भ : आदिपर्व अध्याय १०५ (=१००). कंसात भांडारकर संस्थेच्या पाठानुसार अनुक्रमांक दिले आहेत.)

**११. पांडूचा जन्म**

कालावधि : एक वर्ष

संदर्भ : तोच

आणखी एक वर्षाने विदुर जन्म



**१२. कर्ण जन्म:**

कालावधि : सोळा वर्षे : भीष्माचे वय : ६० वर्षे

संदर्भ : आदिपर्व अध्याय ११०

यावेळी कुंती अल्पवयस्क 'कन्या' (कुमारी) होती (११०-८,१५).

**१३. पांडू-कुंती विवाह**

कालावधि : दोन वर्षे

भीष्माचे वय : ६२ वर्षे : पांडूचे वय : १८ वर्षे

संदर्भ : आदिपर्व अध्याय १११

यावेळी कुंती 'यौवन प्राप्त' होती (१११-२). या विवाहानंतर थोड्याच अवधीने पांडू - माद्री विवाह झाला (अध्याय११२).

**१४. पांडूचा पराक्रम व राज्यविस्तार**

कालावधि : दोन वर्षे

संदर्भ : आदिपर्व अध्याय ११२

**१५. पांडूस किंदम ऋषीचा शाप**

कालावधि : एक वर्ष

संदर्भ : आदिपर्व ११७

**१६. पांडूची कुंतीस अन्य कुणाकडून पुत्रप्रात्यर्थ सूचना**

कालावधि : तीन वर्षे : भीष्माचे वय : ६८ वर्षे

संदर्भ : अध्याय ११९

पांडूस शाप झाल्यावर तो वनवासी जीवन व्यतीत करू लागला; तेथे 'महताकालेन' (११९-४) त्याने तपस्याद्वारे ऋषींना प्रसन्न केले; आणि त्यांचे आशीर्वादपर वचन ऐकून त्याने कुंतीस अन्य कुणाकडून पुत्रप्रात्यर्थ सूचना केली.

**१७. युधिष्ठिर जन्म**

कालावधि : एक वर्ष : भीष्माचे वय : ६९ वर्षे.

पांडूचे वय : २५ वर्षे

संदर्भ : आदिपर्व अध्याय १२२ (=११४)

धृतराष्ट्राचे वय २६ व विदुराचें २४ वर्षे

**१८. भीम, अर्जुन, नकुल व सहदेव यांचे जन्म**

कालावधि : तीन वर्षे.

युधिष्ठिराचें वय (सहदेव जन्माचे वेळी) तीन वर्षे

संदर्भ : आदिपर्व अध्याय १२२, १२३ (=११४,११५)

पाण्डव एकेक वर्षाच्या अंतराने ('अनुसंवत्सरं') जन्मले.

**अनुसंवत्सरं जाता ते कुरूसत्तमाः**

**पाण्डुपुत्रा व्यराजन्त पञ्च संवत्सरा इव।।१२३-२२**

दुर्योधनाचा जन्म भीमजन्माच्या दिवशी (अर्थात युधिष्ठिर जन्मानंतर एक वर्षाने) झाला १२२-१९(=११४-१४). परंतु दुर्योधन गर्भावस्थेत तीन वर्ष होता - दोन वर्षे गांधारीच्या उदरांत (आदिपर्व ११४- १३=१०७-१२), आणि नंतर एक वर्षे एका कुंडात (११४-२३,२४=१०७ -२२,२३). अशा प्रकारे गर्भारंभाच्या दृष्टीने दुर्योधन युधिष्ठिरापेक्षा एक वर्ष मोठा, पण जन्मकालानुसार युधिष्ठिर एक वर्ष मोठा होता.

**जज्ञे क्रमणे चैतेन तेषां दुर्योधनो नृपः**

**जन्मतस्तु प्रमाणेन ज्येष्ठो राजा युधिष्ठिरः ।। ११४-२५ ( = १०७-२४)**

भीम श्रीकृष्णाहून ज्येष्ठ होता. (पाहा आदिपर्व २२०-४१=२१३-३७)

नकुलसहदेवांसाठी आदिपर्व ९५-६५(=९०-७६) मध्ये 'यमयोः' आणि १२३-१६ (=११५-१६) मध्ये 'यमौ' शब्द आले असून, त्यांचा अर्थ 'जुळे' असा घेतला जातो. याशिवाय नकुलसहदेवांच्या जन्मासंबंधात एकच आकाशवाणी झाली (१२३-१७,१८=११५-१७,१८); तिच्यात द्विवचन असून दोघांना उज्ज्वल आशीर्वाद दिला आहे. यावरूनहि ते जुळे असण्याची पुष्टि होते. परंतु (वर उद्धृत) श्लोक १२३-२२ च्या द्वितीय पंक्तीत पाच पांडवांची तुलना एकामागून एक येणाऱ्या पाच संवत्सरांशी केलेली पाहतां नकुलसहदेवांतहि एक वर्षाचे अंतर भासू शकते. भांडारकर संस्थेने ती पंक्ति गाळली आहे; पण प्रथम पंक्ती स्वीकारली असून, तेथील 'अपि' चा स्पष्ट संबंध द्वितीय पंक्तीशी आहे. ती पंक्ती स्वीकारूनही पुढील स्पष्टीकरण देता येईल. त्याकाळी कालगणनेसाठी पाच संवत्सरांचे एक 'युग' मानीत असत (पाहा शं. बा. दीक्षित, 'भारतीय ज्योतिषशास्त्र', पृष्ट २६); आणि त्यांतील प्रत्येक संवत्सराला वेगवेगळे नांव असे. यासाठी त्या श्लोकाचा आशय असा होऊ शकतो की, ज्याप्रमाणे एका युगांतील पाच संवत्सर एक एक वर्षाच्या अंतराने येत असले, तरी त्यांचे एकूण स्वरुप समान असते, तद्वत ते (पाच) पाण्डवपुत्र - तीन एकेक व दोन जुळे-एकेक वर्षाच्या अंतराने (एकूण चार वर्षात) जन्मले असले, तरी ('अपि') दैवी गुणांनी समान शोभिवंत होते. (मात्र माद्रीने एकाच मंत्राने उभय अश्विनेकुमारांना आवाहन केलें, तरी त्या दोघांनी एकाच कालावधीत तिच्या ठायी गर्भस्थापना करण्याची कल्पना असाधारण वाटू शकते, आणि तसे झालें



तरी त्यांतून जुळी अपत्येंच होणें आवश्यक नाही)

एकंदरीत पाहतां मी येथे नकुलसहदेवांना जुळे मानले आहे. त्यांत नकुल किंचित ज्येष्ठ व सहदेव कनिष्ठ होता. (१२३-२१=११५-२१)

**१९. पांडूचा मृत्यू ; बालक पांडवांसह कुंतीचे हस्तिनापुरी धृतराष्ट्राकडे आगमन**

कालावधि : दोन वर्षे

पांडूचें वय : २९ वर्षे. युधिष्ठिराचें वय : पाच वर्षे

संदर्भ : आदिपर्व, अध्याय १२४ ते १२६ (=११६ ते ११८)

यावेळी पांडव 'जातमात्रान्' नवजात होते. (१२५-३ =११७-३). मात्र पांडूच्या शवयात्रेंत तीं मुलेंही रडत जात होती (१२६-१६=११८-१६). यावरून नकुलसहदेवही निदान दोन वर्षाचे असावे. त्या बालकांचे वेदोक्त संस्कार हस्तिनापुरी आल्यावर झाले (१२७-१४=११९-१३).

**२०. पांडवांच्या बालक्रीडा आणि नंतर शस्त्रास्त्र शिक्षण; ते संपूर्ण झाल्यावर द्रौणांना गुरुदक्षिणा रूपात राजा द्रुपदावर पांडवांची यशस्वी स्वारी.**

कालावधि : तेरा वर्षे. युधिष्ठिराचें वय : ६ ते १८ वर्षे

संदर्भ : आदिपर्व अध्याय १२७ ते १३७ (=११९ ते १२८)

शिक्षणपूर्व बालक्रीडा सुमारे दोन वर्षे चालल्या असाव्या.

**धार्तराष्ट्रैश्च सहिताः क्रीडन्तो मुदिताः सुखम्**

**बालक्रीडासु सर्वासु विशिष्टास्तेजसाभवन्।। १२७-१५ (=११९-१४)**

युधिष्ठिर आठ वर्षाचा झाल्यावर कृपाचार्याजवळ शिक्षण प्रारंभ झाले. काही कालानंतर द्रोणाचार्य हस्तिनापुरी आले, व भीष्मांच्या आदेशावरून कौरवपांडवांना शस्त्रास्त्रशिक्षण देऊ लागले. (तपशील क्रमांक ३४ मध्ये).

**२१. हस्तिनापुरांत युधिष्ठिराला यौवराज्याभिषेक; पराजित द्रुपदाचा यज्ञ व त्यांतून धृष्टद्युम्न-द्रौपदीचा जन्म.**

कालावधि : एक वर्ष

संदर्भ : आदिपर्व अध्याय १३८ व १६६ (=१५५)

यौवराज्याभिषेकाच्या संबंधात एक वर्षाचा स्पष्ट उल्लेख

**ततः संवत्सरस्यान्ते यौवराज्याय पार्थिव**

**स्थापितो धृतराष्ट्रेण पाण्डुपुत्रो युधिष्ठिरः ।। १३८-१**

भांडारकर संस्था यौवराज्याभिषेकाच्या या श्लोकासह (गीता प्रेस आवृत्तीचा) संपूर्ण अध्याय १३८ वगळू चाहते. मात्र पुढे जाऊन, ज्यांत पौरजनांची युधिष्ठिराला

'राज्याभिषेक' करण्याची इच्छा व्यक्त झाली आहे. (पाहा क्रमांक २२) ते अध्याय १४० मधील श्लोक स्वीकारते. पण आधी यौवराज्याभिषेक झाल्याशिवाय राज्याभिषेकाची चर्चा कशी होणार? अध्याय १३८ एकूण कथनाशी उघडच सुसंगत आहे.

द्रुपदाच्या यज्ञासंबंधातही या एक वर्षाचा उल्लेख येतो-

**ततः संवत्सरस्यान्ते द्रुपदं स द्विजोत्तमः**
**उपयाजोऽ ब्रवीत् काले राजन् मधुरया गिरा।। १६६-१४ (=१५५-१४)**
**ज्येष्ठो भ्राता मम ...... १५ (=१५)**
**तं वै गच्छस्व नृपते स त्वां संयाजयिष्यति। २० (=१९)**

तद्नुसार द्रुपद उपयाजाच्या (याज नांवाच्या) भावाकडे गेला, व तो यज्ञ केला. त्याच्या यज्ञवेदीतून धृष्टद्युम्नाचा व द्रौपदीचा जन्म झाला (अध्याय १६६=१५५). धृष्टद्युम्नाचा देह जन्मतःच काहीसा प्रगल्भ होता. त्याने कवच किरीट धारण केले होते, आणि हातात खडग् व धनुष्यबाण घेऊन तो गर्जना करीत एकदम रथावर जाऊन बसला. (१६६-४०,४१=१५५-३८,३९)

अशाच प्रकारे द्रौपदीचे हि जन्मसमयीचे हे वर्णन पहा.

**कुमारी चापि पाञ्चाली वेदिमध्यात् समुत्थिता**
**सुभगा दर्शनीयाङ्गी स्वसितायतलोचना ।।४४(=४१)।।**
**श्यामा पद्मपलाशाक्षी नीलकुञ्चितमूर्धजा**
**ताम्रतुङ्गनखी सुभ्रूश्चारूपीनपयोधरा ।।४५।।**
**या बिभर्ति परं रूपं यस्या नास्त्युपमा भुवि।**
**देवदानवयक्षाणामीप्सितां देवरूपिणीम् ।।४७।।**
**तां चापि जातां सुश्रोणीं वागुवाचाशरीरिणी**
**सर्वयोषिद्वरा कृष्णा निनीषुः क्षत्रियान् क्षयम्।।४८।।**

यावरून धृष्टद्युम्नाप्रमाणे द्रौपदीचेहि शरीर यज्ञवेदीतून बाहेर येतेवेळी सुमारे आठ-नऊ वर्षाइतके वाढ झालेले मानणे उचित होईल. भांडारकर संस्था श्लोक ४५ ची द्वितीय पंक्ति ('जिची ताम्ररंगी नखे बाहेर आली असून भुवया सुंदर आणि स्तनभाग पुष्ट व मनोहर होता'), आणि श्लोक ४७ चीही द्वितीय पंक्ति ('देवतेसमान रूपधारी व जिला प्राप्त करण्याची इच्छा देव, दावन, यक्षही करू शकत होते') अधिकृत मानत नाही. यांत उद्देश हा असावा की, यज्ञातून बाहेर आलेली द्रौपदी नवजात शिशुसमान होती. परंतु धृष्टद्युम्नाच्या जन्मजात प्रगल्भ शरीरासंबंधी श्लोक त्या संस्थेने स्वीकारला असल्याने द्रौपदीच्या वर्णनातील त्या दोन ओळी नाकारणे सुसंगत होत नाही. याशिवाय,



नवजात द्रौपदीला श्लोक ४८ मध्ये 'सुश्रोणी' (सुंदर कटिप्रदेशाची) व 'सर्वयोषिद्वरा' (सर्व योषितांत, म्हणजे तरुणींत, श्रेष्ठ दिसणारी) म्हटले असून, तेही तिच्या त्या वेळेच्या शरीराची कल्पना देते.

**२२. पांडवांचा पराक्रम व राज्यविस्तार. त्यानंतर पौरजनांत युधिष्ठिराला राज्याभिषेक करावा अशी चर्चा. कौरवांना ईर्षा. वारणावतास लाक्षागृह निर्माण; कुंतीसह पांडवांचे तेथे प्रयाण.**

कालावधि : चार वर्षे. युधिष्ठिराचे वय : २० ते २३ वर्षे.

संदर्भ : आदिपर्व अध्याय १३८,१३९,१४०,१४३, (=१३२)

**२३. पांडवांचा लाक्षागृहांत एक वर्ष निवास; नंतर तेथून गुप्त पलायन**

कालावधि : एक वर्ष. स्पष्ट उल्लेख १४७-१(=१३६-१)

संदर्भ : अध्याय १४७ (=१३६)

**२४. पांडवांचे गुप्त भ्रमण; हिडिंब वध;राक्षसी हिडिंबेपासून भीमपुत्र घटोत्कच जन्म; एकचक्रा नगरीत बकवध; व्यासांच्या दोन भेटी; द्रुपदनगरात कुंभाराच्या घरी गुप्तवेषांत निवास.**

कालावधि : एक वर्ष.

संदर्भ : आदिपर्व अध्याय १५१ ते १६९ (=१३९ ते १५८), आणि १८२ ते १८४ (=१७४ ते १७६)

राक्षसींची गर्भधारणा नऊ महिने न होता त्या तत्काळ प्रसूत होतात (१४३-३६=१४३-३२)

**२५. द्रौपदी स्वयंवर व तिचा पांडवांशी विवाह; तेथे एक वर्ष निवास करून द्रौपदीसह हस्तिनापुरास परत आगमन**

कालावधि : एक वर्ष (स्पष्ट उल्लेख, आदिपर्व ६१-३१ = ५५-२२)

संदर्भ : आदिपर्व अध्याय १८५ ते २०६

स्वयंवरसमयी द्रौपदीचे वय जन्मकालानुसार सुमारे आठ वर्षाचे असले, तरी वर सांगितल्याप्रमाणे जन्मतःच तिचे शरीर कांहीसे प्रगल्भ असल्याने यावेळी पांडवांशी विवाहयोग्य तरुणी दिसत होती.

**२६. धृतराष्ट्राच्या आदेशानुसार पांडवांचे इंद्रप्रस्थास वेगळे राज्यस्थापन. द्रौपदीसंबंधी पांडवांचा आपसांत नियम.इंद्रप्रस्थात सुखाने निवास.**

कालावधि : सात वर्षे. युधिष्ठाराचे वय : २७ ते ३३ वर्षे.

तो नियम असा होता,

**द्रौपद्या नः सहासीनामत्योन्यं यो ऽ भिदर्शयेत्**
**स तौ द्वादश वर्षाणि ब्रह्मचारी वने वसेत्।। २११-२९(= २०४-२८)**

आणि असा नियम करून पांडवांनी इन्द्रप्रस्थास सुखानें राज्य करीत निवास केला.

**एवं ते समयं कृत्वा न्यवसंस्तत्र पाण्डवाः**
**वशे शस्त्रप्रतापेन कुर्वन्तोऽन्यान् महीक्षिताः ।।२१२-१ (=२०५-१)**

**२७. अर्जुनाचा बारा वर्षे स्वदेश त्याग, त्यात हरिद्वारला उलूपीशी समागम, मणिपुरला चित्रांगदेशी विवाह व तीन वर्षे निवास; द्वारकेस सुभद्राहरण, विवाह व कांही काल निवास, शेवटी सुभद्रेसह इंद्रप्रस्थास पुनरागमन.**

कालावधि : बारा वर्षे (स्पष्ट उल्लेख - पुढे उद्धृत)
युधिष्ठिराचे वय : ३४ ते ४५ वर्षे
संदर्भ : अध्याय २१२ ते २२० (=२०५ ते २१३)

अशा प्रकारे पांडवांचा इन्द्रप्रस्थास 'दीर्घकाल' (सात वर्षे) निवास झाला असता एका ब्राह्मणाच्या गायी कोणी चोरल्या.

**अथ दीर्घेण कालेन ब्राह्मणस्य विशाम्पते**
**कस्यचित् तस्करा जन्हुः केचिद् गा नृपसत्तम ।। ५ (=५)**

त्या गायी सोडविण्या करता धनुष्यबाण घेण्यासाठी अर्जुन आत गेला असतां, तेथे युधिष्ठिराबरोबर द्रौपदी बसली होती म्हणून अर्जुनाद्वारे अपरिहार्यपणे द्रौपदीसंबंधीच्या उक्त नियमाचा भंग होऊन, गायी सोडविल्यानंतर बारा वर्षे वनवास करण्यासाठी युधिष्ठिराचा आदेश घेऊन अर्जुन निघाला-

**सोऽ भ्यनुज्ञाय राजानं वनचर्याय दीक्षितः**
**वने द्वादशा वर्षाणि वासायानुजगाम ह।। २१२-३५ (=२०५-३०)**

स्वतः अर्जुन बारा वर्षाचा उल्लेख करून उलूपीस म्हणतो-

**ब्रह्मचर्यमिंद भद्रे मम द्वादशवार्षिकम्**
**धर्मराजेन चादिष्टं ......।। २१३-२१ (=२०६-२१)**

आणि यावर उलूपी उत्तर देते-

**परस्परं वर्तमानान् द्रुपदस्यात्मजां प्रति**
**यो नो ऽ नुप्रविशेमोहात् स वै द्वादशवार्षिकम् ।।२१३-२५**
**वने चरेद् ब्रह्मचर्यामिति वः समयः कृतः**
**तदिदं द्रौपदीहेतोरन्योन्यस्य प्रवासनम् ।।२६**
**कृतवांस्तत्र धर्मार्थमत्र धर्मो न दुष्यति ।२७ (=२०६-२५,२६)**

मात्र हा ब्रह्मचर्याचा नियम केवळ द्रौपदीच्या संबंधात होता हे यात महाभारतकारांनी उलूपीच्या मुखाने स्पष्ट केले आहे. या कालात अर्जुनापासून उलूपीला इरावान व चित्रांगदेला बभ्रुवाहन पुत्र झाला.



येथे एक खुलासा आवश्यक आहे. आदिपर्व अध्याय ६१ मध्ये संपूर्ण महाभारताचा अति संक्षिप्त सारांश सांगताना हा काल 'संवत्सरं पूर्ण मासं एकं' म्हटला आहे. (६१-४२= ५५-३२). पण याचा आशय 'एक वर्ष एक महिना' नसून 'पूर्ण बारा वर्षे' असा आहे. संस्कृतमध्ये 'मास' शब्द प्रतीकरूपाने 'बारा' या संख्येसाठीही वापरला जातो. (याच प्रमाणे 'शर' म्हणजे पाच, व 'अग्नि' म्हणजे तीन असे संख्यावाचक सांकेतिक अर्थ अनुशासन पर्व १७७-२६ मध्ये आले आहेत). म्हणून 'एकं पूर्ण मासं' म्हणजे 'पूर्ण बारा' हा अर्थ होतो. तो काल बारा वर्षे होता हे वरील अनेक श्लोकांतून स्पष्ट आहे, आणि मणिपुरांत तीन वर्षे निवास (२४१-१६=२०७ -२३), द्वारकेत सुभद्रेशीं विवाहानंतर एक वर्ष व काही दिवस (२२०-१३=२१३-१३), आदि तपशील एकूण एक वर्ष एक महिन्यात असंभव आहे. आणि याशिवाय (देशत्यागाचे) 'बारावे' वर्ष समाप्त झाल्यावर अर्जुन (सुभद्रेसह) इन्द्रप्रस्थास परत आला असें पुढील पंक्तींत स्पष्ट म्हटलें आहे, 'पूर्णे तु द्वादशे वर्षे खाण्डवप्रस्थमागतः' (आदिपर्व २२०-१४=२१३-१३). गीता प्रेसने 'संवत्सरं पूर्ण मासं एकं' चा अर्थ 'पूरे बारह वर्ष और एक मास' केला आहे, तोही बरोबर नाही; 'मासं एकं' वेगळे केले तर 'संवत्सरं पूर्ण' म्हणजे केवळ एक वर्ष होईल.

**२८. श्रीकृष्णांचे इंद्रप्रस्थास आगमन, अभिमन्यु जन्म, अर्जुनास गांडीव धनुष्य प्राप्ति, खांडववनदहन, अर्जुनापासून द्रौपदीस पुत्रजन्म.**

कालावधि : एक वर्ष
संदर्भ : आदिपर्व अध्याय २२० ते २३३ (=२१३ ते २२५)

द्रौपदीचे पाच पुत्र व अभिमन्यु यांचे जन्मकाल पुढीलप्रमाणे निश्चित होतात.

१) द्रौपदीचे पाच पुत्र (पांडवांप्रमाणेच) एक एक वर्षाच्या अंतराने झाले.

**एक वर्षान्तरास्त्वेते द्रौपदेया यशस्विनः**
**अन्वजायन्त राजेन्द्र परस्परहितैषिणः ।।२२०-८६ (=२१३-७९)**

२) ते प्रथम युधिष्ठिरापासून आणि नंतर भीम, अर्जुन, नकुल व सहदेवापासून या क्रमानें झाले हे सांगणे नकोच महाभारतांत त्यांचा उल्लेखहि याच क्रमानें आहे. (२२०-७८ ते ८५ =२१३-७१ ते ७८)

३) या पाचही पुत्रांची हत्या महायुद्धाचे अंती अश्वत्थाम्याने केली; त्यावेळी ते अविवाहित होते, आणि पांडवांचा वंश चालविणारा केवळ अभिमन्यु उरला. (आदिपर्व ९५-८२)

४) द्रौपदीपासून झालेला अर्जुनपुत्र (श्रुतकर्मा/श्रुतकीर्ति?) अभिमन्युपेक्षा लहान होता. अन्यथा विराटकन्या उत्तरेशी विवाहार्थ अर्जुनानें अभिमन्यूऐवजीं त्याचे नांव सुचविले असते; निदान प्रथम त्याचा विवाह अन्यत्र झाल्याशिवाय अभिमन्यूचा विवाह झाला नसता.

५) अर्जुन देशत्याग संपवून इन्द्रप्रस्थास परतल्यावर त्यानें एक 'महान कर्म' केल्यानंतर त्याच्या द्रौपदीपुत्राचा जन्म झाला-

**श्रुतं कर्म महत् कृत्वा निवृत्तेन किरीटिना**
**जातः पुत्रस्तथेत्येवं श्रुतकर्मा ततोऽ भवत् ।। आदिपर्व २२० -८३**
**(=२१३-७६)**

हे 'महत् कर्म' खांडववनदहन होते. खांडववनदहनाकरितां अग्नीनें अर्जुनासाठी वरुणाकडे गांडीव धनुष्य मागतानांहि म्हटले-

**कार्यंच सुमहत् पार्थो गाण्डीवेन करिष्यति**
**.... तन्ममाद्य प्रदीयताम् ।। २२४-५ (=२१६-४)**

६) या सर्वावरून हा निष्कर्ष निघतो. अर्जुनाच्या त्या देशत्यागाच्या अकराव्या वर्षाच्या आरंभाच्या सुमारास युधिष्ठिरानें द्रौपदीशी समागम केला; आणि बाराव्या वर्षाच्या आरंभी भीमानें केला. या क्रमाने अर्जुन देशत्यागाहून इन्द्रप्रस्थास परतल्यावर त्यानें द्रौपदीशी समागम केला व त्या द्रौपदीपुत्राचा जन्म खांडववनदहनानंतर झाला. मात्र खांडवदहनाचे पूर्वी इन्द्रप्रस्थास अभिमन्यूचा जन्म झाला; त्यावेळी श्रीकृष्णही तेथे आले होते. (आदिपर्व२२०-७१). सुभद्रेची गर्भधारणा इन्द्रप्रस्थास येण्यापूर्वी द्वारकेस झाली होती असे दिसते.

याप्रमाणे अर्जुन द्रौपदीपासून बारा वर्षे दूर राहून परतल्याबरोबर त्याला तिच्याशी समागम करता यावा, व द्रौपदीसंबंधांत पांडवांचा परस्पर क्रम कायम राहावा, म्हणून अर्जुनाच्या देशत्यागाची दहा वर्षे होईपावेतो अन्यही पांडवांनी तिच्या बाबतीत ब्रह्मचर्य पाळले !

या गणनेप्रमाणें खांडवदाहाचे वेळी अर्जुनाचे वय ४५ येतें. परंतु कांहीजण (उदाहरणार्थ डॉ. दप्तरी, पूर्वउल्लेखित p.51) उद्योग पर्वांतील पुढील श्लोकाचा आधार घेऊन तें वय तेहतीस वर्षे मानू चाहतात- अर्जुनाच्या शौर्याची प्रशंसा करीत धृतराष्ट्र संजयास म्हणतो-

**एकान्तविजयस्त्वेव श्रूयते फाल्गुनस्य ह**
**त्रयस्त्रिंशत्समाऽऽहूय खांडवे ऽ ग्निमतर्पयत्।।५२-१०**

यांत 'समा' शब्द वेगळा मानून त्याचा अर्थ 'वर्षे' असा करीत, त्याला 'त्रयंस्त्रिंशत्' शी जोडून खांडवदाहाचे वेळी अर्जुनाचे वय ३३ मानले जातें.



पण यापूर्वी अर्जुनाचा बारा वर्षे वैयक्तिक वनवास (क्र.२७) आणि त्यापूर्वी पांडवांचा इन्द्रप्रस्थ निवास (क्र.२६) आदि पाहतां, खांडवदाहाचे वेळी त्याचे वय ३३ वर्षे म्हटले, तर द्रौपदी स्वयंवराचे वेळी त्याचें वय केवळ १५ (व नकुलसहदेवांचे चौदा वर्षे) येईल ! हें संभव नाही. वस्तुतः गीता प्रेस आवृत्तीप्रमाणें (व भांडारकर संस्थेप्रमाणेही) वरील श्लोकांतील शब्द 'समाहूय' असा आहे; आणि त्याचा अर्थ 'आव्हान देऊन' असा आहे. अर्जुनानें खांडवदाहापूर्वी तेहतीस देवांना आव्हान केलें होते.

**२९. श्रीकृष्ण द्वारकेस परत जातात; मयासुरद्वारा सभा निर्माण;नकुल-द्रौपदी पुत्र जन्म; नारद द्वारा राजसूय यज्ञार्थ प्रेरणा; श्रीकृष्णांचे पुनः आगमन;जरासंध वध; श्रीकृष्णांचे द्वारकेस प्रयाण ; द्रौपदी- सहदेव पुत्रजन्म;पांडवांचा चारी दिशांना विजय.**

कालावधि : सहा वर्षे. युधिष्ठिराचे वय : ४७ ते ५२ वर्षे

संदर्भ : सभापर्व, अध्याय १ ते ३२

सभानिर्मितीस चौदा महिने लागले-

**ईदृशीं तां सभां कृत्वा मासैः परिचतुर्दशैः**
**निष्ठितां धर्मराजाय मयो राजन् न्यवेदयत्।। सभापर्व ३-३७**

नकुल - सहदेवांच्या द्रौपदीपुत्रांसंबंधी खुलासा वर क्र. २८ मध्ये केला आहे. पांडवांच्या वनवासापूर्वी (किंबहुना राजसूय यज्ञापूर्वी) त्यांच्या पुत्रांचे उपनयन संस्कार झाले होते; पाहा आदिपर्व श्लोक २२०-८७; नकुल- सहदेवांच्या पुत्रांचे उपनयन संस्कार कदाचित राजसूय यज्ञाचे वर्षी झाले असतील (क्र.३०).

**३०. पांडवांचा राजसूय यज्ञ. श्रीकृष्ण, व्यास आदींचे आगमन. शिशुपाल वध, श्रीकृष्ण द्वारकेस परत जातात.**

कालावधि : दोन वर्षे

संदर्भ : सभापर्व, अध्याय ३३ ते ४६

राजसूय यज्ञाचा काल दोन वर्षे निश्चित आहे. (पाहा.Kane,'History of Dharmashastra' Vol II p.p. 1214-23; vol III p.962; आणि शतपथ ब्राह्मण पंचम कांड). राजसूय यज्ञ समाप्त झाल्यावर कांही विशिष्ट पाहुणे परत जात असतां द्रौपदीपुत्र व अभिमन्यु पांडवांतर्फे त्यांच्याबरोबर सन्मानपूर्वक राज्याच्या सीमेपवेतो गेले (सभापर्व ४५-४९). प्रस्तुत गणनेप्रमाणें त्यांतील सर्वात मोठ्यांचे वय त्यावेळीं सुमारे सहा वर्षे होतें.

**३१. दुर्योधनास ईर्षा; हस्तिनापुरास द्यूतसभानिर्माण. पांडवांना द्यूतार्थ आमंत्रण; द्यूत; द्रौपदीवस्त्रहरणाचा प्रयास ; अनुद्यूत.**

कालावधि : तीन महिने

संदर्भ : सभापर्व अध्याय ४७ ते ८१.

द्यूतसभानिर्माण 'प्राज्ञाः दक्षाः सहस्त्रशः शिल्पिनः' यांनी 'त्वरित' 'अल्पेकालेन' 'आशु चक्रुः' (५६-१९,२०) केलें. द्यूताची (आणि वनवास प्रारंभाची )तिथी ज्येष्ठ शुक्ल एकादशी होती हें प्रकरण ३ मध्ये सिद्ध केले आहे.

**३२. पांडवांचा (द्रौपदीसह) बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास.**

कालावधि : तेरा वर्षे, युधिष्ठिराचे वय : ५४ + १/४ ते ६७ + १/४ वर्षे

संदर्भ : वनपर्व व विराट पर्व

या तेरा वर्षाचा स्पष्ट उल्लेख सभापर्व अध्या ७६ मध्ये असून त्याशिवायहि अनेक उल्लेख आहेत. या तेरा वर्षाची तपशिलवार गणना मी प्रकरण ४ मध्ये दिली आहे. पांडवांनी अधिक मास समयाची सूक्ष्म गणना करून वैशाखोत्तर द्वितीय अधिक मास वद्य सप्तमी ही तेराव्या सौर वर्षाची अंतिम तिथी निश्चित केली; आणि तदनुसार वद्य अष्टमीला अर्जुन कौरवांसमोर गोग्रहण युद्धात प्रकट झाला.

**३३. गोग्रहण युद्ध. अभिमन्यु - उत्तरा विवाह. पांडवांचे इन्द्रप्रस्थ राज्य परत करण्यास दुर्योधनाचा नकार. शान्तिप्रयास व युद्धाची तयारी.**

कालावधि : सहा महिने

संदर्भ : उद्योगपर्व.

खांडवदाहापासून (क्र.२८) गोग्रहणयुद्धा पावेतो सुमारे बावीस वर्षे गेली होती. (पाहा विराटपर्व ४३-६ व त्याचे प्रकरण १९ मध्ये केलेले विवेचन.)

**३४. गीतोपदेश. महायुद्ध. शौचपालन. हस्तिनापुरी युधिष्ठिरास राज्याभिषेक. भीष्मोपदेश. भीष्मनिधन. पुनः काही दिवस शौचपालन.**

कालावधि : तीन महिने. युधिष्ठिराचे वय : ६८ वर्षे.

संदर्भ : भीष्मपर्व, द्रोणपर्व; कर्णपर्व ; शल्यपर्व; स्त्रीपर्व; शातिपर्व; अनुशासनपर्व; आणि आश्वमेधिक पर्व अध्याय १ते१४.

युद्धारंभाची व म्हणून गीतोपदेशाची (गीतजयंतीची) वास्तविक तिथि (मार्गशीर्ष शुक्ल एकादशी नसून) कार्तिक अमावास्या आहे; युद्धांत प्रत्यक्ष लढाईचे दिवस अठरा असले, तरी लढाई एकदिवसा आड झाल्याने एकूण युद्धदिवस पस्तीस होते; अंतिम भीम-दुर्योधन गदयुद्ध शल्यवधाच्याच दिवशी 'अपराण्ह' समयी न होतां, दुसरे दिवशी झाले; शरशय्येवरून भीष्मोपदेश पाच दिवस झाला; आणि भीष्मनिधन तिथि (माघ शुक्ल अष्टमी नसून) माघ पौर्णिमा आहे; इत्यादि वर पूर्व प्रकरणांत स्पष्ट केले आहे.



युद्धांत मृत्युसमयी अभिमन्यूचे वय सोळा वर्षे होतें असे आदिपर्व ६७-११७,११८ मध्ये सुचविले आहे. भांडारकर संस्थेने ते श्लोक प्रमाणित मानले नाहीत. आणि या गणनेतही वर अभिमन्यूच्या जन्माचा व वयाचा जो उल्लेख आला आहे, तो पाहता त्याचे वय मृत्युसमयी सुमारे बावीस वर्षे येते; याचा अधिक खुलासा प्रकरण १९ मध्ये केला आहे.

युधिष्ठिर जन्माचे वेळी भीष्मांचे वय ६९ वर्षे मोजले असल्याने (क्रमांक १७) निधन समयी ते (६९+६८ =) १३७ वर्षे होते. ते इच्छामरणी होते. युद्धसमाप्तीनंतर पांडवांनी गंगातीरी एक महिना शौचपालन केले (शांतिपर्व १-२). आणि भीष्मनिधनानंतरी पुनः काही थोडे दिवस शौचपालन केले (आश्वमेधिक पर्व १४-१४). युद्धसमयी द्रोणांचे वय ८५ वर्षे होते असा स्पष्ट उल्लेख आहे-

**आकर्णपलितः श्यामो वयसाशीतिपंचकः**
**रणे पर्यचरद् द्रोणो वृद्धः षोडशवर्षवत् ।। द्रोणपर्व १२५-७३**
**(=१०१-६९)**

"श्यामवर्ण असून केस कानापावेतो पांढरे झालेले असा पंचांशी वर्षे वयाचा वृद्ध द्रोण एखाद्या सोळा वर्षाच्या तरुणासमान रणभूमीवर संचार करीत होता." येथे क्वचित कोणी 'अशीतिपंचकः' चा अर्थ (८०x५) 'चारशे' वर्षे करतात तो उघडच कांहीतरीच आहे. हाच श्लोक पुनः १९३-४३ (=१६५-१०३) मध्ये आला आहे; आणि याशिवाय अध्याय १९२ मध्येंही संजय धृतराष्ट्रास सांगतो-

**आकर्णपलितः श्मामो वयसाशीतिपंचकः ।। द्रोणपर्व १९२-६४**
**त्वत्कृते व्यचरत् संख्ये स तु षोडशवर्षवत्। ६५ (=१६५-४९)**

मात्र द्रोणांच्या वयासंबंधात पुढील खुलासा आवश्यक आहे. युद्धांत निधनसमयी त्यांचे वय ८५ वर्षे होते, तर हस्तिनापुरास त्यांनी कौरवपांडवांना शिक्षण देणे पूर्ण केले (क्रमांक २०) त्यावेळी द्रोण (८५-५०=) ३५ वर्षांचे असावेत. कारण मी युधिष्ठिराचे वय शिक्षणसमाप्ती समयी अठरा वर्षे व युद्धसमयी ६८ वर्षे (म्हणजे पन्नास वर्षांनी अधिक) मानले आहे. परंतु महाभारतांत पांडवांचे शिक्षण पूर्ण होऊन जनतेसमोर रंगभूमीवर त्यांच्या शस्त्रविद्येच्या केलेल्या प्रदर्शनाचे समयी द्रोणाचार्यांचे असे वर्णन आले आहे-

**ततः शुक्लांबरधरः शुक्लयज्ञोपवीतवान्**
**शुक्लकेशः सितश्मश्रुः शुक्लमाल्यानुलेपनः।।** आदिपर्व १३३-१९ (=१२४-१७)

यांत द्रोणांना 'शुक्लकेशः' (केस पांढरे झालेले) म्हटले आहे. पण युद्धसमयी द्रोणांच्या वयाचा वरील स्पष्ट उल्लेख, आणि शिवाय त्यांचे एकंदर प्रारंभिक जीवन, पाहतां ते यावेळी अगदी म्हातारे असू शकत नाही.

द्रोण व राजकुमार द्रुपद सहाध्यायी व बालमित्र होते (आदिपर्व १३०-४३,४४ आणि १६५-६,७). त्यावेळी द्रुपदानें द्रोणाला मी राजा झाल्यावरही मैत्री चालू ठेवीन असे वचन दिले होतें (१३०-४६-४७). पुढे द्रुपद राजा झाला. इकडे द्रोण निर्धन राहिले. द्रोण द्रुपदाचे वचन स्मरून त्याच्या दरबारी गेले. पण तेथे त्यांचा घोर अपमान झाला. उन्मत्त द्रुपदाविरूद्ध प्रत्यक्ष स्वतः कांही न करता, शस्त्रविद्येत आपले काही शिष्य तयार करून त्यांच्याद्वारे त्याला धडा शिकवावा, या उद्देशाने द्रोण फिरता फिरता हस्तिनापुरास आले; तेथे त्यांचे शालक कृप हस्तिनापुरच्या राजकुमारांना शिक्षण देण्यासाठी नियुक्त होते. भीष्मांच्या आवाहनावरून द्रोणांनी राजकुमारांना उच्च शस्त्रास्त्रविद्या शिकविण्यास प्रारंभ केला. हा घटनाक्रम पाहता ते वरीलवेळी विशेष म्हातारे असू शकत नव्हते.

त्यांचा पुत्र अश्वत्थामाही कौरवपांडव राजकुमारांबरोबर शिक्षण घेऊ लागला (आदिपर्व १३१-१५ते२०). अर्थात त्याचे वय कौरवपांडवांच्या वयाच्या जवळपास असावे. याही दृष्टीने द्रोण यावेळी फार म्हातारे असू शकत नव्हते. मात्र अश्वत्थामा युधिष्ठिरापेक्षा दोनतीन वर्षांनी मोठा असावा. कारण स्वतः द्रोणांनी शिक्षण देण्यास प्रारंभ करण्यापूर्वी काही थोडे दिवस अश्वत्थामा आपले मामा कृपाचार्यांच्या देखरेखीत (एखाद्या वरिष्ठ वर्गाच्या विद्यार्थ्याप्रमाणे) कौरवपांडवांना धनुर्विद्येत काही मार्गदर्शन करीत असे. (१३०-१४,१५)

सारांश एकूण पाहता श्लोक १३३-१९ मधील 'शुक्लकेशः'चा आशय द्रोणांचे (कानांजवळचे) काही केस पांढरे दिसू लागले होते, असा घेता येतो. येथे केवळ शुक्लकेशः म्हटले आहे. पण पुढे युद्धसमयी वय ८५ वर्षे दाखवून, 'आकर्णपलितः' (वर उद्धृत, म्हणजे 'कानापावेतो केस पांढरे झालेले' म्हटले आहे. आता शुक्लकेशः बरोबर 'सितश्मश्रुः' असेही म्हटले आहे, त्याचा अर्थ कांही जण 'दाढी पांढरी झालेली' असा करतात. पण 'सित' चा अर्थ 'श्वेत' (पांढरा) असला, तरी अन्य अर्थ 'बद्ध' असाही आहे. (पहा भागवत पुराण ७-६-११, आणि बृहदारण्यक उपनिषद ३-९-२६, ४-२-४, ४-४-२२,४-५-१५). म्हणून सितश्मश्रुः चा अर्थ ज्यानें आपली दाढी (मोकळी सोडली नसून) बांधली - गुंडाळली आहे असा होऊ शकतो.

**३५. हस्तिनापुरांत युधिष्ठिराचे राज्य. अश्वमेध यज्ञ. धृतराष्ट्राचे गांधारी**



**व कुंतीसह वनवास गमन.**

कालावधि : १५ वर्षे (स्पष्ट उल्लेख)

युधिष्ठिराचे वय : ६९ ते ८३ वर्षे

संदर्भ : आश्वमेधिक पर्व अध्याय ६२ ते ९०

आश्रमवासिक पर्व अध्याय ३ ते १९

धृतराष्ट्र- गांधारीची सादर सेवा करीत पांडवांनी हस्तिनापुरात पंधरा वर्षे राज्य केले. या दरम्यान त्यांनी अश्वमेध यज्ञ केला. (आश्वमेधिक पर्व). पंधरा वर्षाचा स्पष्ट उल्लेख (आश्रमवासिक पर्व)-

**पाण्डवाः सर्वकार्याणि सम्पृच्छन्ति स्म तं नृपम्**
**चक्रुस्तेनाभ्यनुज्ञाता वर्षाणि दश पञ्च च ।।१६**

पंधरा वर्ष पूर्ण झाल्यावर धृतराष्ट्राने हस्तिनापूर सोडून वनांत जाण्याचे ठरविले-

**ततः पञ्चदशे वर्षे समतीते नराधिपः ।।३-१२**
**राजा निर्वेदमापेदे भीमवाग्बाणपीडितः । १३**

'अशाप्रकारे (हस्तिनापुरला पांडवांजवळ राहून) पंधरावे वर्ष पूर्ण झाल्यावर राजा धृतराष्ट्राला भीमाच्या वारंवार टोचून बोलण्यामुळे वैताग आला;' (व त्याने वनात जाण्याचे ठरविले). धृतराष्ट्र, गांधारी व कुंती यांच्याबरोबर विदुर व संजयही वनांत राहू लागले (आश्रमवासिक पर्व १९-१८).

**३६. पांडवांची वनांत धृतराष्ट्र, गांधारी व कुंतीस भेट. विदुराचा देहत्याग**

कालावधि : एक वर्ष (स्पष्ट संकेत)

युधिष्ठिराचे वय : ८४ वर्षे

संदर्भ : आश्रमवासिक पर्व, अध्याय २१ ते ३६

पांडवांच्या या भेटीच्या वेळी व्यासही तेथे आले; गांधारी व्यासांना म्हणते-

**षोडशेमानि वर्षाणि गतानि मुनिपुङ्गव**
**अस्य राज्ञो हतान् पुत्रान् शोचतो न शमो विभो।।**

आश्रमवासिक पर्व २९-३८

'मुनिश्रेष्ठा, या राजाला (धृतराष्ट्राला) मेलेल्या पुत्रांबद्दल शोक करता करता सोळा वर्षे होऊन गेली आहेत. पण अद्याप याच्या मनाला शांति प्राप्त होत नाही.' या १६ वर्षांपैकी १५ हस्तिनापूरात गेली होती (क्रमांक ३५); अर्थात हस्तिनापूर सोडून आता वनांत एक वर्ष झाले होते. या वर्षाचा संकेत

पुढे उधृत श्लोक ३९-२५ मध्येही आहे (क्रमांक ३७)

या भेटीसाठी पांडव धृतराष्ट्राकडे आले असता, तेथून कांहीसें दूर एकांत स्थानी युधिष्ठिराच्या समक्ष विदुराने देहत्याग केला (अध्याय २६).

या भेटीच्या वेळी ऋषींना पांडवांचा परिचय करून देताना संजय अर्जुनाला 'श्यामो युवा वारणयूथपाभः' म्हणतो (२५-७). यावेळी अर्जुनाचे वय ८१ वर्षे होते. म्हणून येथे हा 'युवा' शब्द वेगळा न घेता तो 'वारणयूयपाभः' ला जोडून 'हत्तीच्या तरुण कळपनायकासमान कांतीचा' असा आशय उचित होईल. याच वेळी संजय द्रौपदीलाही 'मध्यं वयः किंचिदिवस्पृशन्ती' म्हणतो. (२५-९). तिचे वय यावेळी ६४ वर्षे होते. म्हणून यातील 'इव' या शब्दाचा 'जणू अद्याप मध्य वयाच्या प्रारंभी अशा शरीरकांतीची' असा आशय इष्ट होईल. हा प्रसंग द्रौपदीसह पांडवांच्या स्वर्गारोहणाच्या केवळ सतरा वर्षे पूर्वीचा आहे (पहा क्रमांक ३७ व ३८). म्हणून यावेळी अर्जुन शब्दशः युवा व द्रौपदी 'मध्यं वयः किंचित् स्पृश्यन्ती' असणे संभव नाही.

**३७. धृतराष्ट्र गांधारी व कुंती यांचा वनात मृत्यु.**

कालावधि : दोन वर्षे (स्पष्ट उल्लेख)

युधिष्ठिराचे वय : ८५, ८६, वर्षे

संदर्भ : आश्रमवासिक पर्व, अध्याय ३७ ते ३९

वैशंपायन राजा जनमेजयास सांगतात-

**द्विवर्षोपनिवृत्तेषु पाण्डवेषु यदृच्छया**

**देवर्षिर्नारदो राजन्नाजगाम युधिष्ठिरम् ।। ३७-१**

'राजा, पाण्डव (धृतराष्ट्रादीना भेटून) परतल्यावर दोन वर्षे गेल्यानंतर योगायोगाने देवर्षि नारद युधिष्ठिराकडे आले,' (व त्यांनी धृतराष्ट्र, गांधारी व कुंती वणव्यांत जळून मेल्याची वार्ता सांगितली). वैशंपायन आणखी सांगतात.

**एवं वर्षाण्यतीतानि धृतराष्ट्रस्य धीमतः**

**वनवासे तथा त्रीणि नगरे दश पञ्च च ।।३९-२५**

**हतपुथस्य संग्रामे ...... । २६**

'अशा प्रकारे त्याचे पुत्र युद्धात मरण पावल्यानंतर बुद्धिमान धृतराष्ट्राने (हस्तिनापूर) नगरात पंधरा वर्षे आणि वनात तीन वर्षे व्यतीत केली.' या तीन वर्षांपैकी एक वर्ष युधिष्ठिरादींच्या भेटीपूर्वी झाले होते. (क्रमांक ३६); शेष दोन वर्षे त्या भेटीनंतर गेली. या तीन वर्षांचा महाभारतकारांनी आणखीही एक उल्लेख केला आहे. धृतराष्ट्राने वनांत तपस्या सूरु केल्यावर इन्द्राने नारदास म्हटले, "वर्षाणि त्रीणि शिष्टानी राज्ञोऽस्य परमायुषः" (२०-३२) 'धृतराष्ट्राचे



आयुष्य पूर्ण होण्याला आता तीन वर्षे उरली आहेत.'

याप्रमाणे महायुद्धानंतर अठरा वर्षांनी धृतराष्ट्राचा मृत्यु झाला. निधनसमयी त्यांचे वय एकशे बारा (२६+८६) वर्षे होते.

**३८. द्रौपदीसहित पाण्डवांचे स्वर्गारोहण**

कालावधि : आणखी सतरा वर्षे (स्पष्ट संकेत)

युधिष्ठिराचे वय : १०३ वर्षे

संदर्भ : मौसल पर्व, महाप्रस्थानिक पर्व, स्वर्गारोहण पर्व

यावेळी महायुद्धानंतर ३५ वर्षे होऊन ३६ वें लागण्याचा स्पष्ट उल्लेख,

**षट् त्रिंशे त्वथ सम्प्राप्ते वर्षे कौरवनन्दनः**

**दर्दश विपरीतानि निमित्तानि युधिष्ठिरः ।। मौसल पर्व १-१**

या पस्तीस वर्षातील अठरा वर्षे धृतराष्ट्राच्या मृत्यूपावेतो गेली होती. (क्रमांक ३५,३६,३७); आणि शेष सत्रा त्यानंतर गेली. यावेळी भीमाचे वय १०२ वर्षे, अर्जुनाचे वय १०१ वर्षे नकुलसहदेवांचे शंभर वर्षे, व द्रौपदीचे ८४ वर्षे होते.

याच्या कांही समयापूर्वीच बलराम व श्रीकृष्णांनी देहविसर्जन केले होतें. दारुकाने हस्तिनापुरास जाऊन पांडवांस ती वार्ता सांगितली, आणि अर्जुन द्वारकेस आला. (मौसल पर्व अध्याय ४,५). अर्जुन भेटल्यावर वसुदेवानेंही देहत्याग केला. अर्जुनाने वसुदेव, श्रीकृष्ण, बलराम आदींची अन्त्येष्टि क्रिया केली; व द्वारकेस सहा दिवस राहून तो सातव्या दिवशी (श्लोक ७-१२) तेथील स्त्रियांना व शेष पुरूषांना घेऊन इन्द्रप्रस्थास आला. अर्जुनानें इन्द्रप्रस्थास त्या यादव स्त्रीपुरूषांच्या स्थायी निवासाची व्यवस्था करून, श्रीकृष्णाचा पणतू वज्र याला इन्द्रप्रस्थाचा राजा केले. (मौसल पर्व अध्याय ६,७). तेथून अर्जुन व्यासाश्रमास गेला. व्यासांनी म्हटलें कीं, आतां तुमचाही इहलोकत्यागाचा समय आला आहे (८-३२,३६). तदनुसार अर्जुन हस्तिनापुरास गेला व युधिष्ठिरादींना हें सर्व सांगितले. पांडवांनी परीक्षिताला हस्तिनापुराचा सम्राट करून, द्रौपदीसह स्वर्गारोहणार्थ प्रयाण केले (महाप्रस्थानिक पर्व अध्याय १). हा सारा घटनाक्रम आणि निधनसमयी अर्जुनाचे वय १०१ वर्षे होतें, हें पाहतां श्रीकृष्णांनी इहलोकीं शंभर वर्षे निवास केला असे दिसून येते.

शेवटी भागवत पुराणांतील श्रीकृष्णांच्या १२५ वर्षे वयाच्या उल्लेखाविषयी खुलासा करतो. जर तदनुसार स्वर्गारोहणसमयी अर्जुनाचेंही अंतिम वय १२६, व म्हणून युधिष्ठिराचे १२८ वर्षे मानले, तर सर्व पांडवांच्या वयांत २५ वर्षांची वृद्धि करावी लागेल. पण क्रमांक २७ ते ३८ चे कालावधि महाभारतानुसार

निश्चित असून, त्यांत कोठेही पंचवीस वर्षे जोडणे शक्य नाही. फार झाल्यास क्र.२६ च्या इन्द्रप्रस्थ निवासांत ती जोडावी लागतील. पण यामुळे युद्धसमयी युधिष्ठिराचे वय ९२ वर्षे येऊन. त्यावेळी द्रोणांचे महाभारतात स्पष्ट म्हटलेले वय (क्रमांक ३४) ८५ वर्षे युधिष्ठिरापेक्षा कमी राहील हे अर्थातच असंभव आहे. आणि याशिवाय तसे केल्याने प्रथम पुत्रजन्मसमयी द्रौपदीचे वय (तीस ऐवजी) पंचावन वर्षे, आणि सुभद्राविवाहाचे वेळी अर्जुनाचे वय सुमारे ७०-७१ मानावे लागेल !

खरे म्हणजे, भागवत व महाभारत या दोन ग्रंथात पांडवांच्या कथेसंबंधात काही मतभेद आहेत. भागवत पुराणानुसार (स्कन्ध १ अध्याय १३) यादव कुल नष्ट होऊन श्रीकृष्णांनी इहलोक त्यागल्यानंतर धृतराष्ट्र (विदुराच्या सूचनेवरून) वनांत गेला; कुंती त्याच्याबरोबर गेली नाही; आणि वनांत केवळ पाच दिवस काढल्यावर धृतराष्ट्र मरण पावला. या उलट महाभारतानुसार यादवविनाश व श्रीकृष्ण निर्याण होण्याच्या एकोणीस-वीस वर्षे पूर्वी धृतराष्ट्र वनांत गेला (क्रमांक ३५). कुंतीही त्याच्याबरोबर गेली, आणि वनांत तीन वर्षे घालविल्यावर धृतराष्ट्राचा गांधारी व कुंतीसह अंत झाला (क्रमांक ३६,३७). भागवतपुराणानुसार यादवविनाश समयी अर्जुन द्वारकेस होता व तेथे सात महिने राहिला (स्कन्ध १ अध्याय १४). याउलट महाभारतानुसार (वर सांगितल्याप्रमाणे) अर्जुन त्या विनाशानंतर द्वारकेस पोचला व तेथे केवळ सात दिवस राहिला. भागवतानुसार विदुर महायुद्धसमयी तीर्थयात्रेवर होता; महाभारतांत असा उल्लेख नसून, शल्यवधाच्या दिवशी विदुरही हस्तिनापुरांत उपस्थित दाखविला आहे (शल्यपर्व २९-८८ ते १०४). आणि दुर्योधनमृत्यूनंतरही धृतराष्ट्राशी विदुराचा विस्तृत संवाद कथन केला आहे (स्त्रीपर्व, अध्याय २ ते ७).

या दोन महाकाव्यातील आणखी एक परस्परविरोध फार लक्षवेधक आहे. महाभारतकार म्हणतात की, (वनपर्व अध्याय २१) हस्तिनापुरांत द्यूत झालें त्या दिवशी श्रीकृष्ण द्वारकेसमीप शाल्वाशीं लढत असतां, शाल्वाच्या मायाप्रयोगाने स्वतः श्रीकृष्ण क्षणभर मोहित व भ्रमित झाले. पण या संबंधात भागवतकार लिहितात की, 'काही ऋषी असें म्हणतात, पण ते विसरतात की, योगेश्वर श्रीकृष्णांवर कोणाचीही माया चालू शकत नाही' (१०-७७-३०ते३२).

यावरून दिसून येते की, महाभारत व भागवत भिन्न कर्त्यांनी रचले असले पाहिजेत; आणि महाभारतानुसार पांडवांचे वय निश्चित करतांना भागवत पुराणांतील श्रीकृष्णांच्या अंतिम वयाचा उल्लेख बंधनकारक मानण्याचे कारण नाही. याशिवाय भागवत पुराणांतील त्या श्लोकाचे काही पाठभेद



आहेत काय याचाही शोध इष्ट होईल. आणि विष्णुपुराणात (५-३७-१७ ते २०) श्रीकृष्णांचे वय महाप्रयाणसमयी १२५ वर्षे म्हटले नसून 'वर्षाणामधिकं शतं' (इहलोकनिवास शंभर वर्षांहून अधिक होऊन गेला होता) इतकेच म्हटले आहे, व हे आपल्या गणनेशी जुळते. ❐

